# राजा राममोहन राय.

लेखक

श्रीयुत बी. बी. केसकर.

प्रकाशक

मनोरंजन छापखान्याचे मालक,

गिरगांव-मुंबई.



किंमत ०-१२-०.] [सन १९१९.

# उपोद्घात.

" He ( Raja Rammohun Roy ) was at once a social Reformer, he was the founder of a great religious movement, and he was a great politician. These three activities were combined in him in such a way, that they put to shame the performances of the best among us at the present time. ............. Anybody, who wants to know what true patriotism is, had better study the evidence that he gave and the letters he wrote to men in power over sixty years ago-long before our era of Congress meetings and Conferences."

—RANADE ( in 1896 ).

आपल्या देशांत आज अनेक प्रकारच्या चळवळी चालू आहेत. कांहीं आगंतुक कारणांमुळें कित्येक चळवळी मंदावल्या आहेत, तथापि राजकीय, सामाजिक, औद्योगिक, धर्मविषयक वगैरे विषयांकडे कित्येक सुशिक्षितांचें लक्ष्य लागलें आहे. प. वा. गोपाळराव गोखले यांच्या मृत्युनंतर हिंदुस्तानाच्या एका टोंका- पासून तों दुसऱ्या टोंकापर्यंत, बादशहापासून तों रंकापर्यंत, परदेशांतील अनेक परिचित मुत्सद्द्यांपासून तों त्यांची ओळख नसून त्यांच्या कर्तृत्वाची कमीअधिक माहिती असणारांपर्यंत सर्वांनीं एकरवानें त्यांच्या ज्या देशसेवेचें महत्त्व गाइलें त्यांच्या ज्या स्वार्थ- त्यागाचा गौरव केला, त्या देशसेवेचें व स्वार्थत्यागाचें उगमस्थान कोणी पहावयाला जाईल, त्याला बंगाल्यांतील एका थोर पुरुषानें सत्यां

देशसेवेचा, खऱ्या स्वार्थत्यागाचा, खऱ्या विचारस्वातंत्र्याचा व खऱ्या विचारौदार्याचा पहिला धडा घालून दिला असें आढळून येईल. महाराष्ट्रांत राजा राममोहन राय यांच्याविषयीं असावी तशी व तितकी माहिती नाहीं. न्या. मू. रानडे, सर रामकृष्ण भांडारकर, आणि सर नारायण चंदावरकर यांनीं राममोहन राय यांच्या चरित्रासंबंधानें सुशिक्षित लोकांस थोडीबहुत माहिती करून दिली आहे; मुंबई, पुणें, अहमदाबाद, इंदुर येथील प्रार्थना व ब्राह्मसमाज राममोहन राय यांची पुण्यतिथि ( तारीख २७ सप्टेंबर ) पाळीत असतात; परंतु त्या वेळीं राजा राममोहन यांच्या सर्वांगिक चरित्राचें फारसें विवेचन होत * नसल्यामुळें, त्यांच्या एकंदर देशसेवेविषयीं महाराष्ट्रांतील सुशिक्षितांनाहि नीटशी कल्पना नसते, असा अनुभव आहे. राममोहन यांनीं केलेल्या देशसेवेची माहिती प्रत्येक सुशिक्षित तरुणाला असणें अत्यंत अगत्याचें आहे. परंतु मराठी भाषेंत राजा राममोहन यांचें एकहि चरित्र उपलब्ध नाहीं. सन १८७४-७५ सालीं श्रीयुत भास्कर हरि भागवत यांनीं राममोहनाचें एक त्रोटक चरित्र प्रसिद्ध केलें होतें; पण तेंहि आतां उपलब्ध नाहीं, व त्या पुस्तकासंबंधानें आजच्या पिढीला कांहीं माहितीहि नाहीं. अशा स्थितींत श्रीयुत केसकर यांनीं लिहिलेलें हें राजा राममोहन यांचें चरित्र श्रीयुत मित्र प्रसिद्ध करीत आहेत, याबद्दल ते स्तुतीला पात्र आहेत. राममोहनाचें मिस कॉलेट यांनीं प्रथम लिहिलेलें व बाबू हेमचंद्र सरकार यांनीं सुधारून वाढविलेलें जसें चरित्र आहे, किंवा बंगालीमध्यें बाबू नगेंद्रनाथ चट्टोपाध्याय यांनीं लिहिलेलें जसें अत्यंत विस्तृत व परिपूर्ण चरित्र आहे, तसा हा चरित्रग्रंथ आहे, असें जरी म्हणतां

* Of his political activities I shall not say anything from this platform.—M.G. Ranade.

घ्यावयाचे नाहीं, तरी या चरित्रामध्यें राममोहनसंबंधाची बहुतेक सर्व उपलब्ध माहिती साररूपानें दिलेली आहे. अनेक चरित्रग्रंथ, व्याख्यानें आणि लेख यांच्या आधारानें पुष्कळ मेहनत घेऊन श्रीयुत केसकर यांनीं हें चरित्र तयार केलें असल्यामुळें यांतील सर्व माहिती अत्यंत विश्वसनीय आहे. दुसरें, ज्यांनीं अद्यापि उपरोक्त इंग्रजी चरित्रग्रंथ वाचलेला नाहीं, किंवा ज्यांनां तो अगर बंगाली चरित्रग्रंथ कळणें शक्य नाहीं, ते जर या पुस्तकामध्यें राममोहन रायाचें ग्रथित केलेलें चरित्र वाचतील, तर त्या थोर पुरुषाच्या एकंदर देशसेवेची त्यांनां कल्पना झाल्यावांचून राहणार नाहीं. आतां वर देशसेवेचा व देशसेवेसाठीं स्वार्थत्यागाचा पाया राममोहन राय यांनीं घातला, असें आह्मीं ह्मटलें आहे, तें किती सार्थ आहे तें येथें थोडक्यांत दाखविणें अगत्याचें आहे.

आज देशहितासाठीं ह्मणून ज्या ज्या चळवळी सुरू आहेत,त्या सर्वांनां राममोहन रायांनीं कमी अधिक प्रमाणानें प्रारंभ केला, असें त्यांच्या चरित्रावरून दिसून येतें. हें कितपत खरें आहे तें पहाण्यासाठीं प्रथम आपण शिक्षणविषयक चळवळ घेऊं. आज या देशेनें जे कोणीं देशहित साधीत आहेत, त्यांनां हें कार्य हातीं घ्यावयास राममोहन रायांच्या चळवळीनें समर्थ केलें. कारण, ज्या वेळीं प्रथम इंग्रजी शिक्षणाला हिंदुस्तानामध्यें प्रारंभ करणें हितकर आहे किंवा कसें या प्रश्नालाच प्रारंभ झाला, त्या वेळीं राजा राममोहन यांनीं इंग्रजी शिक्षणाचा प्रसार शक्य तितका झाला पाहिजे,सरकारनें हें काम हातीं घेतलें पाहिजे अशाविषयीं फार मोठा पुढाकार घेतला; इतकेंच करवून ते थांबले नाहींत.मिशनरी लोक ब्रिटिश राज्याची या देशांत स्थापना झाल्यानंतर आले असते व त्यांनीं आपल्या धर्मप्रसाराच्या कामाला सुरुवातहि केली असती; परंतु राममोहन रायांनीं त्यांनां शिक्षणाचा प्रश्न हातीं

ण्यावयास लाविलें, हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. इंग्रजी शिक्षणाच्या प्रसाराचें बरेंचसें श्रेय नेहमीं ख्रिस्ती मिशनरी लोकांनां देण्यांत येत असतें, आणि त्यांत वावगें कांहीं नाहीं; परंतु हिंदी लोकांच्या शिक्षणाकडे त्यांचें प्रथम लक्ष्य त्यांच्या अज्ञानाबद्दल कळवळा येऊन लागलें नसून, राममोहनांनीं त्यांनां प्रोत्साहन दिलें आणि मग ते हें काम करावयाला पुढें आले, असा खरा प्रकार आहे. आमच्या चरित्रनायकानें आणखीहि निराळ्या दिशेनें उद्योग केला. शिक्षणाचा प्रसार व्हावा असा त्यांचा मोठा हेतु असल्यामुळें हिंदु मुलांसाठीं इंग्रजीमध्यें फुकट शिक्षण मिळावें म्हणून त्यांनीं स्वतः एक शाळा स्थापिली, आणि दरमहा एका शिक्षकाला दीडशें रुपये व दुसऱ्याला सत्तर रुपये पगार त्यांनीं बहुतेक आपली पदरमोड करून दिला. ते स्वतः कांहीं त्या वेळीं श्रीमान् नव्हते, तरी पण त्यांनीं ही शाळा कित्येक वर्षेपर्यंत उत्तम रीतीनें चालविली, व पुढें महर्षिपदाला पावलेल्या देवेंद्रनाथ ठाकूरसारख्यांचें प्राथमिक शिक्षण याच शाळेंत झालें. राममोहनांच्या शाळेचा विशेष हा होता, कीं, तेथें नीति व धर्मशिक्षण देण्यांत येत असे. म्हणजे इंग्रजी शिक्षणाला प्रारंभ करण्याला ते कारण झाले, त्याच्या प्रसाराला त्यांनीं प्रोत्साहन दिलें, स्वतः शाळा स्थापून त्यांनीं इतरांनां मार्ग दाखविला आणि इंग्रजी शिक्षण देतांना धर्मशिक्षण देणें अवश्य आहे, हेंहि त्यांनीं स्वतःच्या उदाहरणानें दाखवून दिलें.

एवढ्यावरून त्यांनीं मातृभाषेची हेळसांड केली, असा समज त्यांच्या चरित्राची माहिती नसणाराचा होण्याचा संभव आहे. पण, आज बंगाली भाषेमध्यें उत्तमोत्तम ग्रंथ आहेत म्हणून त्या भाषेचा गौरव करण्यांत येत असतो, त्याचेंहि सर्व श्रेय राममोहन रायांनां आहे. त्यांच्या वेळीं बंगाली गद्य वाङ्मय नव्हतेंच. कितीहि बिकट विषय

असला तरी आपल्या मातृभाषेच्या द्वारें त्याचें लोकांना ज्ञान करून देतां येणें शक्य आहे, हें त्यांनीं स्वतःच्या उदाहरणानें स्पष्ट करून दाखविलें. उपनिषदासारख्या संस्कृत ग्रंथांचें त्यांनीं बंगालींत भाषांतर केलें, स्वतः बंगालींत निबंध लिहिले, संभाषणें केलीं, व्याख्यानें दिलीं, एवढेंच नव्हे, तर व्याकरण, भूगोल, भूमिति अशा विषयांवर त्यांनीं स्वतः लहानलहान पुस्तकेंहि लिहिलीं. आज वर्तमानपत्रांचा आपल्या देशांत पुष्कळ प्रसार झाला आहे; पण त्या बाबतींतहि राममोहनच अखिल हिंदुस्तानाचे मार्गदर्शक होते. १८१९ सालीं त्यांनीं **'संवाद कौमुदी'** नांवाचें बंगाली पत्र सुरू केलें, व त्याच्या द्वारा सगळ्या बंगाल देशामध्यें विचारक्रांति सुरू केली. आह्मांला वाटतें हेंच देशी भाषेंत निघालेलें पहिलें वृत्तपत्र असावें.

त्यांनीं अशा प्रकारें मातृभाषेचा पुरस्कार घेतला, इंग्रजी शिक्षणाच्या प्रसाराला ते कारण झाले, आणि हें करीत असतां संस्कृत भाषेचाहि त्यांनीं उद्धार केला. त्यांच्या वेळीं निदान बंगाल्यांत तरी संस्कृत भाषेचें ज्ञान पंडितांमध्येंहि केवळ तात्पुरतेंच असे. * पुष्कळसे ग्रंथ पंडित ह्मणविणारानां मुखोद्गत असत; परंतु अर्थप्राविण्याविषयीं सर्वत्र शून्य ! वेदांतावर निर्भीडपणें चर्चा करून आपल्या मताची

---

* १८९६ सालीं कलकत्त्याला राममोहन राय यांची सार्वजनिक रीतीनें पुण्यतिथि पाळण्यांत आली. त्या वेळीं पंडित कलिवर वेदांतवागीश यांनीं मोठ्या कळकळीचें भाषण करून सांगितलें, कीं,

" A great boon had been conferred on the country by Raja Ram Mohan Roy in reviving the study of Vedant Philosophy in Bengal and acknowledged in feeling terms how he was himself indebted to the Raja's writings on the subject......."

श्रेष्ठता स्थापित करणारे वेदशास्त्रसंपन्न तेथें नव्हतेच! अशा वेळीं जरी इंग्रजी शिक्षणाचा प्रसार करण्यासाठीं राममोहन स्वतः अंगमेहनत करून झटत होते, बंगाली भाषेमध्यें त्यांची ग्रंथरचना सुरू होती, तरी संस्कृत भाषेचें अज्ञान, संस्कृत भाषेंतील उत्तमोत्तम ग्रंथांचें अज्ञान, पुरातन उदात्त विचारांचें अज्ञान पाहून संस्कृत भाषेचें ज्ञान अधिक प्रमाणानें लोकांना झालें पाहिजे असें त्यांनीं प्रतिपादिलें, व १८२६ सालीं स्वतः वेदांत कॉलेज नांवाची संस्था स्थापिली. या संस्थेसाठींहि ते स्वतः दर महिन्याला फार मोठी रक्कम खर्चीत असत.

सामाजिक सुधारणेविषयीं आमच्या ठिकाणीं जी थोडीबहुत जागृति दिसत आहे, तिचें उगमस्थानहि राममोहन रायच होत! राममोहनांच्या मृत्यूनंतर सतीची चाल सरकारनें बंद केली, तरीपण त्याची सर्व तयारी त्यांनीं पूर्वी केली होती. त्या बाबतींत त्यांनीं पुष्कळ वादविवाद केले, संभाषणें केलीं, सभा भरविल्या, अर्ज केले, पण यश आलें नाहीं, म्हणून आपल्या प्रयत्नांत कांहीं माघार घेतला नाहीं. त्या बाबतींत त्यांना दोन्ही बाजूंनीं तयारी करावयाची होती. त्या वेळीं लोकांनीं धर्म बुडेल ही ओरड सुरू केलीच होती, तेव्हां त्यांची समजूत घालणें व सतीची चाल बंद करणें यांत धर्मबाह्य कांहीं नाहीं असें त्यांना दाखवून देणें, व लोकांच्या या बागुलबोवाला भीक घालणाऱ्या सरकारची समजूत घालणें, असें दुहेरी काम त्यांना करावें लागलें, व तें त्यांनीं केलेंहि. म्हणजे लोकांचीं मनें युक्तिप्रयुक्तीनें वळविणें, सतीच्या निषेधाला शास्त्रांचा विरोध नाहीं असें दाखविणें, व सरकारची मदत मिळविणें, इतकीं कामें त्यांनीं एकट्यांनीं केलीं. आमच्या प्रांतीं सतीच्या चालीनें फारसा धुमाकुळ केव्हांच माजविलेला नव्हता. परंतु राममोहन

रायांनीं केलेल्या अर्जावरून, आणि प्रसिद्ध केलेल्या पुस्तकांवरून असें दिसून येतें, कीं, तेथें सालिना सहाशें विधवांना सती जावें लागे ! सती जाणाऱ्या स्त्रिया सर्वच आपखुषीनें जात नसत. कित्येक आपखुषीनें जात, पण बहुतेकींस त्यांच्या इच्छेच्या विरुद्ध सती जावें लागे. कित्येक बाया जळत्या चितेंतून परत येण्याचा प्रयत्न करीत, पण त्यांनां मारूनमुटकून पुनः चितेमध्यें ढकललें जाई ! कोणाला बांधून घेऊन मग चिता पेटवावी लागे ! अशा प्रकारें ही चाल अनर्थ करीत असतां व माणुसकीला काळिमा लावीत असतां आमचे लोक धर्म बुडाला, धर्म बुडाला ही ओरड करूं लागले, व तटस्थ राहण्याचा विडा उचलेलें दयाळू सरकार धर्मांत हात कसा घालावा ह्मणून अडून बसलें ! पण, राममोहन रायांनीं या सर्वांनां जागें केलें, व त्याबरोबर आणखी दुसऱ्या कित्येक अमानुष चालींविरुद्धहि चळवळ करून त्याहि बंद करविल्या. * सामाजिक बाबतींत अशा प्रकारच्या चालींविरुद्ध चळवळ करून ते थांबले नाहींत; किंवा सामाजिक सुधारणेच्या उदार तत्त्वांचा उपदेश करून आपली इतिकर्तव्यता झाली असेंहि त्यांनां वाटलें नाहीं. आज लोकांनां परदेशगमन अगदीं स्वल्प झालें आहे. लोकमतहि पुष्कळ अनुकूल झालें आहे. परंतु १८३० सालीं राममोहन रायांनीं विलायतेला जाण्यासाठीं प्रयाण केलें, त्या वेळीं सर्व देश त्यांच्या विरुद्ध होता. त्यांनीं लोकांनां परदेशमनाचा मार्ग दाखविला, आणि लोकच्छलाची कांहींहि क्षिति बाळगिली नाहीं. दुसरें,

* "Satee-burning was not the only horror men inflicted on themselves, but men and women used to drown themselves, jump from lofty precipices into the waters below and meet with death in a hundred other forms. If there is credit due to any man for having turned the national current in the right direction in this matter, that credit is due to Raja Ram Mohan Roy."—M. G. Ranade.

स्त्रियांचें अज्ञान, त्यांना वाईट रीतीनें वागविणें, त्यांच्यासंबंधानें अनादर, एकाच वेळीं कितीतरी लग्नें करणें, अगर एकीची राख स्मशानांतून उचलण्यापूर्वीच दुसरी स्त्री करणें, सतीच्या चालीच्या तडाख्यांतून सुदैवानें अगर दुर्दैवानें वांचलेल्या विधवांची विपन्नावस्था, इत्यादि अनेक विषयांसंबंधानें त्यांनीं अनेक प्रकारें चळवळ केली व लोकांमध्यें जागृति उत्पन्न करून त्यांना या विषयासंबंधानें विचार करण्यास प्रवृत्त केलें. तसेंच प्रचलित जातिभेदाविरुद्धहि त्यांनीं चळवळ करून हा जातिभेद कशी राष्ट्रहानि करीत आहे, तें त्यांनीं लोकांच्या नजरेला आणून देण्याचा प्रयत्न केला. *

सारांश, राममोहनांच्या चरित्राचें जे आस्थापूर्वक अवलोकन करितील त्यांच्या हें लक्ष्यांत येऊन चुकेल, कीं, सामाजिक बाबतींत त्यांनीं जी चळवळ केली ती न्याय, नीति, विवेक आणि सहृदयता या तत्त्वांवर केली. त्यामुळें अमुकअमुक सुधारणांसंबंधानें थोडेबहुत हातपाय हालविले, कीं, पुरे, आतां त्यापुढें जाण्याची आवश्यकता नाहीं, असें प्रतिपादण्याची त्यांना आवश्यकता वाटली नाहीं. विधवाविवाहाच्या चळवळीचा पुढाकार त्यांनीं घेतला नाहीं हें कसें झालें, अशी त्यांच्यासंबंधानें थोडीशी शंका कोणीकोणी काढतात. पण, एक तर एकाच व्यक्तीचें सर्व विषयांकडे सारख्या प्रमाणानें लक्ष्य असणें शक्य नाहीं; आणि दुसरी गोष्ट अशी, कीं, विधवांच्या विपन्नावस्थे कडे राजाचें लक्ष्य लागलेलें नव्हतें, असेंहि नाहीं. १८२१

* The distinction of castes introducing innumerable divisions and subdivisions among them has entirely deprived them of patriotic feeling and the multitude of religious rites and ceremonies and the laws of purifications have totally disqualified them from undertaking any difficult enterprise.

—The Raja in 1828.

सालीं निराधार विधवांच्या पोषणासाठीं एक स्वतंत्र फंड असावा अशी सूचना त्यांनीं आपल्या '**संवादकौमुदी**'द्वारें केली होती, आणि विलायतेहून परत आल्यानंतर ते विधवाविवाहाचा प्रश्न हातीं घेऊन त्यासंबंधानें लोकांमध्यें जागृतिहि करणार होते; परंतु त्यांचा अंतच परदेशीं झाल्यामुळें त्यांच्या मनांतला हेतु तसाच अपुरा राहून गेला.

हिंदुस्तानांतील सनदशीर राजकीय चळवळीला राजा राममोहन यांनींच प्रारंभ केला, ही गोष्टहि त्यांच्या चारित्रावरून व्यक्त होत आहे ! आणि आमच्या आजच्या राजकीय चळवळींतील निदान कांहीं पुढाऱ्यांनां तरी ही गोष्ट उत्तम प्रकारें अवगत आहे. वर रावसाहेब रानडे यांचें त्यांच्यासंबंधाचें मत दिलेंच आहे हिंदुस्तानची सेवा करूनकरून वृद्ध झालेल्या बाबू सुरेंद्रनाद्र बानर्जी यांनीं एका प्रसंगीं असें म्हटलें, कीं,

"Let it be remembered that Ram Mohan was not only the founder of the Brahma Samaj and the pioneer of Social Reform in Bengal, but he was also the Father of the Constitutional agitation in India.–राममोहन हे ब्रह्मसमाजाचे संस्थापक, किंवा बंगाल्यांतील सामाजिक सुधारणेच्या चळवळीचेच आद्यप्रवर्तक होते असें आपण समजूं नका, तर सनदशीर राजकीय चळवळीचे ते प्रथम जनक होत."

राजा राममोहन राय यांनीं राजकीय चळवळीला प्रारंभ करण्यापूर्वी लोकांच्या ठिकाणीं आपल्याला कांहीं बाबतींत हक्क आहेत, व त्यांच्याविषयीं सरकारपाशीं मागणी करणें या आपल्या अधिकारांतील गोष्टी आहेत, याची जागृति मुळींच नव्हती. सरकारच्या पुढें योग्य रीतीनें आपल्या तक्रारी ठेवल्या असतांना त्यांची दाद

लागते ही कल्पनाच कोणाला नव्हती ! ही जाणीव लोकांमध्यें राममोहनांनीं प्रथम उत्पन्न केली. ह्मणजे या बाबतींत त्यांनीं अर्धें काम करून ठेविलें.

आपल्या वयाच्या २२ व्या वर्षीं त्यांनीं इंग्रजी शिकावयाला प्रारंभ केला. परंतु १८१४ सालापर्यंत त्यांच्या सार्वजनिक चळवळीला प्रारंभ झाला नव्हता. तिला प्रारंभ झाल्यानंतर त्यांनीं इंग्रजीमध्यें जीं भाषणें केलीं, जे लेख लिहिले, जे वादविवाद केले, जे अर्जांचे खलिते तयार केले, ते ऐकून, वाचून इंग्रज लोकांनींहि तोंडांत बोटें घालावीं, व अशा प्रकारें उत्तम इंग्रजी भाषेमध्यें आह्मांलाहि आपले विचार इतक्या व्यवस्थित रीतीनें मांडतां यावयाचे नाहींत, असें ह्मणावें ! १८२३ सालीं गव्हरनर जनरल मि. ॲडम यांनीं वर्तमानपत्रांच्या हक्कांवर गदा घालण्याच्या विचारानें, सरकारच्या परवानगीवांचून कोणींहि वर्तमानपत्र काढूं नये असें फर्मान सोडलें. याविरुद्ध राममोहन यांनीं एक अर्ज पाठविला. त्याबद्दल त्यांची सर्वत्र वाहवा झाली; पण सरकारनें मुळींच दाद घेतली नाहीं ! हा अर्ज फेटाळून लावल्यानंतर राममोहन स्वस्थ बसले नाहींत. त्यांनीं राजेसाहेबांनां एक अर्ज सादर केला. त्यासंबंधानें लिहितांना मिस कॉलेट यांनीं "One of the noblest pieces of English to which Ram Mohun put his hand" असें ह्मटलें. एका इंग्रज बाईनें अर्जाच्या खलित्याच्या उत्तमत्वासंबंधानें असे उद्गार काढले, पण त्या ( अर्जा )लाहि वाटाण्याच्या अक्षता मिळाल्या असें पाहून सरकारच्या या अन्यायी वर्तनाबद्दल आपली पूर्ण नापसंती दाखविण्यासाठीं त्यांनीं 'मिरत–एर–अखबार' या नांवाचें आपलें पत्र बंद करून टाकलें !

अशा प्रकारें इंग्लंडास जाईपर्यंत व तेथें गेल्यानंतर मरेपर्यंत त्यांनीं आपल्या देशाच्या लोकांच्या हक्कांसाठीं सारखी चळवळ सुरू

ठेविली होती. ते उगाच कांहीं तरी लिहावयाचें ह्मणून लिहीत नसत. तर प्रथम सर्व सामग्रीचा उत्तम रीतीनें संचय करून मग त्यांचा मारा सुरू होत असे! त्यामुळें त्यांच्या अर्जांतील मागण्या जरी सरकारनें मान्य केल्या नाहींत, तरी त्यांची माहिती चुकीची आहे, असें त्यांनां कधीं ह्मणतां आलें नाहीं! प्रजेच्या ज्या ज्या मागण्या व हक्क यांविषयीं राममोहनांनीं चळवळ केली त्यांपैकीं पुष्कळ मागण्या व हक्क आज प्रजेला मिळाले असून आजचे पुढारी त्यांनीं दाखविलेल्याच मार्गाचें अनुसरण करीत आहेत.

राजा राममोहन रायांनीं ब्राह्मसमाजाची स्थापना केली, ह्मणून ब्राह्म व प्रार्थना समाजाचे सभासद त्यांची दरसाल मोठ्या निष्ठेनें पुण्यतिथि पाळतात. त्यामुळें राममोहनांनीं ब्राह्म समाजासंबंधानें केलेल्या कामगिरीची सुशिक्षितांनां जितकी माहिती आहे, तितकी त्यांनीं बाकीच्या सर्व चळवळींचा पाया कसा घातला यासंबंधानें नाहीं, ह्मणून त्या सर्व चळवळींसंबंधानें वर इतकें विवेचन आह्मीं केलें. तथापि राममोहनांचें सर्व लक्ष्य धर्मविषयक चळवळींत गुंतलेलें होतें. धर्माला त्यांनीं आद्यस्थान दिलें होतें. त्यांनां सर्व प्रकारच्या चळवळी हव्या होत्या. देशाची उन्नति सर्व बाजूंनीं झाली पाहिजे हें तत्त्व त्यांनींच प्रथम पुढें आणिलें; तथापि धर्म हा सर्व चळवळींस पायाभूत झाला पाहिजे, असें त्यांनां वाटत असे, ह्मणून त्यांनीं धर्माला प्राधान्य दिलें. यासाठीं त्यांनीं अत्यंत परिश्रम केले; निरनिराळ्या प्रकारच्या लोकांशीं वादविवाद केले; अनेक लहानमोठे ग्रंथ लिहिले; अनेक धर्मांचें, धर्मग्रंथांचें मनन केलें; उपनिषदांचा चांगला अभ्यास करून प्रचलित हिंदुधर्माचें स्वरूप व पूर्वीचें शुद्ध स्वरूप यांतलि अंतर लोकांच्या निदर्शनाला आणून दिलें. अनेक शतकें भलतेच विचार, भलतेच आचार यांचें प्राबल्य फार वाढल्यामुळें मूळच्या शुद्ध स्वरूपाला कालिमा लागला

आहे तो धुऊन टाकण्यासाठीं त्यांनीं अहर्निश खटपट केली. त्यांची वादविवाद करण्याची शक्ति इतकी कांहीं असामान्य असे, कीं, सर्वांना त्यांच्यापुढें हात टेंकावे लागत! ख्रिस्ती मिशनरी येवोत, मौलवी येवोत, पंडित येवोत, सर्वांशीं वाद करून, परमेश्वर एक आहे, आह्मी सर्व त्याचीं बालकें आहोंत, आह्मांमध्यें कोणत्याहि प्रकारचा भेदभाव राखण्याची आवश्यकता नाहीं, तें परमेश्वराला प्रिय नाहीं व त्याचें मानसिक भजनपूजन करणें हा आमचा धर्म आहे, असें त्यांनीं स्थापित करावें आणि या तत्त्वांचा प्रसार करण्यासाठीं त्यांनीं ब्राह्मसमाजाची स्थापना केली. त्या वेळीं त्यांनां कशा अडचणी आल्या, त्यांनां कसा लोकच्छळ सहन करावा लागला, सत्यासाठीं लहानपणापासून राममोहन कसे भांडले, व अंतीं त्यांच्यांशीं वादविवाद करणारेहि त्यांचे अनुयायी कसे झाले, याची अत्यंत मनोरंजक व बोधपर हकीकत या चरित्रामध्यें आलीच आहे.

राममोहन यांचा करारीपणा त्यांच्या सत्यप्रीतीला साजण्यासारखा होता. त्यांची सत्यप्रीति, स्वतंत्रवृत्ति, निर्भीड स्वभाव, पवित्र आचरण आणि अंगचा विनम्रपणा, त्यांचें औदार्य, त्यांचें कोमल मन, त्यांचा शांत स्वभाव यांमुळें ते पुढें पुढें सर्वांनां प्रिय झाले. सरकारदरबारांत त्यांची मानमान्यता झाली. त्यांच्या विचारांची योग्यता सरकार जाणूं लागलें, व त्यांच्याशीं सल्लामसलत करण्याची सरकारच्या मोठमोठ्या अधिकाऱ्यांनां व गव्हरनर जनरलसारख्यांनासुद्धां आवश्यकता वाटूं लागली. पण राममोहनांनीं सरकारपुढें कधींहि लांगूल-चालन केलें नाहीं. त्यांच्या पुढेंपुढे करून त्यांनीं आपल्या स्वाभि-मानाचा उपमर्द कधींहि केला नाहीं. एकदां लॉर्ड वुइल्यम बेंटिंग यांजकडून त्यांनां बोलावण्यासाठीं त्यांचा ए. डी. सी. आला अस-तांना "मला गव्हरनर जनरलकडे येण्याची कांहींएक आवश्यकता

दिसत नाहीं, मी सरकारी नोकरींतून मुक्त झालों आहें व आतां धर्माची सेवा करीत आहें, असा माझा नम्र निरोप आपण आपल्या साहेबांनां कळवा," असा जबाब त्यांनीं दिला! आणि मग "आपण भेटीचा योग दिल्यानें 'मि. वुइल्यम बेंटिंग' यांनां फार आनंद होईल," असा उलटपावलीं त्याच ए. डी. सी.नें जेव्हां निरोप आणिला, तेव्हां "मी मोठ्या संतोषानें आपल्या भेटीला येईन,"असा उलट जबाब राममोहन यांनी कळविला!

त्यांच्या करारी स्वभावासंबंधानें आणखी एक गोष्ट येथें नमूद करण्यासारखी आहे. राममोहन रायांचा व ख्रिस्ती मिशनरींचा ज्या वेळीं जंगी वाद चालू होता, त्या वेळीं राममोहनांचीच प्रत्येक वेळीं सरशी होत होती, हें त्यांच्या प्रतिपक्षांसहि कबूल करावें लागे. राममोहनांचे कित्येक लेख इंग्रजींत प्रसिद्ध होत, पण ज्या छापखान्यांत त्यांचे लेख छापले जात तो मिशनरींचा होता, आणि त्या वेळीं दुसरा इंग्रजी छापखानाच नाहीं हें पाहून, मिशनरींनीं राममोहनांचे लेख आपल्या छापखान्यांत छापण्याचेंच नाकारलें! पण, त्यानें राममोहनांचा उत्साहभंग बिलकूल झाला नाहीं! त्यांनीं ताबडतोब स्वतःच्या मालकीचा इंग्रजी छापखाना घातला व तेथें आपले लेख छापून वाद सुरू केला, आणि मिशनरींनां आपण किती स्वावलंबी आहों त्याची खात्री पटवून दिली!

असो. अशा प्रकारें ज्यांनीं आपला करारीपणा दाखविला, असामान्य स्वार्थत्यागाचा धडा घालून दिला, देशसेवेसाठीं आपला देह अंतकाळपर्यंत झिजविला, इंग्रजी शिक्षणाला उत्तेजन द्यावयाला जे कारण झाले, मातृभाषेविषयीं बहुजनांच्या ठिकाणीं प्रेम व आदरभाव ज्यांनीं जागृत केला, संस्कृत भाषा आणि जुनें तत्त्वज्ञान यांचें ज्यांनीं पुनरुज्जीवन केलें, स्त्री व पुरुष यांच्यांतील कृत्रिम भेदभाव

अन्यथा होत असें दाखवून त्यांनां समान हक्क आहेत असें ज्यांनीं प्रतिपादिलें, सामाजिक व राजकीय सुधारणामंदिरांचा पाया ज्यांनीं घातला, अशुद्ध धर्मविचार व धर्माचार यांच्या जागीं ज्यांनीं शुद्ध धर्मविचार व शुद्धधर्माचार स्थापित करण्याचा प्रयत्न केला, सारांश, ज्यांनीं हिंदुस्तानांतील खऱ्या नवयुगाला प्रारंभ केला, त्या महात्मा राजा राममोहन राय यांच्या चरित्राचें आस्थापूर्वक मनन करण्याची वाचकांनां विनंति करून, त्यांची सत्यनिष्ठा, धर्मनिष्ठा, स्वदेशसेवेची उत्कटेच्छा, करारीपणा, स्त्रीजातीवरील प्रेम व आदर इत्यादि गुण वाचकांत संचरोत अशी परमेश्वरापाशीं विनम्रभावें प्रार्थना करितों.

मुंबई, ता. १ मे,
१९१५.

द्वारकानाथ गोविंद वैद्य,
संपादक, सुबोधपत्रिका.

## प्रथम परिच्छेद.

## परिचय.

# राजा राममोहनराय.

## प्रथम परिच्छेद.

### प्रकरण पहिलें.

## हिंदुस्तानची परिस्थिति.

आमचा चरित्रनामक जन्माला आला, त्या वेळीं सर्व हिंदुस्तान, मुख्यतः बंगालदेश, मूर्तिपूजेच्या भयंकर शृंखलेनें जखडला गेला होता. धर्माच्या उदात्त तत्त्वांचा ऱ्हास होऊन सर्वत्र भलभलत्या अविचारांचें प्राबल्य माजून राहिलें होतें. लहान मुलें आपल्या मृत मातेच्या शवाला देखील जशीं चिकटून रहातात, त्याप्रमाणें निर्जीव प्रकारच्या धर्मसमजूतींकडे लोकांचा फार ओढा होता. भटभिक्षुकांचें सर्वत्र बंड माजून राहिलें होतें. ते स्वतः अज्ञानी असून आपल्याबरोबर जनसमूहालाहि अज्ञानी बनविण्याचा प्रयत्न करीत असत. पुष्कळ पौराणिक गोष्टी रचण्यांत आलेल्या होत्या,व त्यांवर लोकांचा विश्वास खिळून बसलेला होता आणि धर्माविषयींच्या खोट्या कल्पना माजून राहिल्या होत्या. सती जाणें, आईनें पहिल्या मुलाला गंगेमध्यें फेंकून देणें, किंवा जगन्नाथाच्या रथाखालीं चिरडून मरणें, या गोष्टी त्यावेळीं मोठ्या पुण्यजनक समजल्या जात असत. बंगाल्यांत भागीरथीच्या उभय तीरांवर उभें राहिल्यास धाडधाड पेटत असलेल्या

चिता, अनाथ, असहाय विधवांना जिवंतपणींच स्वीकारून त्यांच्या देहांचें भस्म करीत असल्याचे अत्यंत भयंकर व करुणास्पद देखावे नित्य दिसत असत. जिकडेतिकडे नानाप्रकारच्या तामसी दैवतांचा सुळसुळाट माजून राहिला होता, व त्यांना संतुष्ट करण्याकरितां बकरीं, कोंबडीं, रेडे वगैरेंचे बळी दिले जात असत. मुसलमानी राष्ट्र लयास गेलेलें होतें. तें चालविण्याला मराठ्यांमध्यें दम उरला नव्हता. ईस्ट इंडिया कंपनी प्रांतामागून प्रांत काबीज करीत चालली होती; तथापि इंग्रज लोकांचें लक्ष्य अजून व्यापार व द्रव्यसंचय यांच्याकडेच मुख्यतः लागून राहिलेलें होतें. मुसलमानी राज्यपद्धतिच अजून अमलांत होती. सतीची क्रूर चाल बंद करण्याचा प्रयत्न केल्यास त्यायोगानें एतद्देशीयांच्या धर्मांत ढवळाढवळ केली असें त्यांना वाटेल, व त्यामुळें कंपनीच्या राज्यसत्तेला धक्का बसेल, या धास्तीनें अजून कोणीहि गव्हरनर जनरल तीमध्यें हात घालण्यास धजत नसे. सरकारचें लक्ष्य शिक्षणाकडे फारसें लागलेलें नव्हतें. संस्कृत, आरबी व फारशी शिकविणाऱ्या शाळांशिवाय दुसऱ्या शाळा फारशा अस्तित्वांत नव्हत्या.

बहुजन समाज जातिभेदादि बाह्यबंधनें व अनेक देवदेवतां संबंधाच्या वेडगळ कल्पना यांच्या पगड्यांत सांपडून अवनत स्थितीप्रत चालला होता. हिंदुधर्माची स्थिति फार शोचनीय झाली होती. धर्मज्ञान हें केवळ शास्त्री, पंडीत आणि भटभिक्षुक यांच्यांतच जणूं गुरफटून राहिलें होतें, व त्यासंबंधानें शाब्दिक काथ्याकूट करण्यांतच हे लोक आपली इतिकर्तव्यता समजत असत. जात्यभिमानानें हल्लींप्रमाणेंच श्रेष्ठ वर्गाचे समजले जाणारे लोक इतर लोकांना आपल्यापेक्षां नीच समजून त्यांनां खरें धर्मसाधन शिकवीत नसत. इंग्रजी शिकलेल्या लोकांपैकीं कांहींचा स्वधर्मावरून विश्वास उडालेला होता,

पण त्यांना परधर्मांतील रहस्यहि कळलें नव्हतें. असे लोक खाण्यापिण्याची मुळींच आडकाठी न धरतां मांसाहार आणि मद्यपान यथेच्छ करीत असत. सारांश, बहुजनसमाज सर्व प्रकारें अज्ञानांधकारांत खितपत होता.

देव स्थूलशरीरधारी मनुष्यरूपानें अवतार घेतो अशा समजुतीनें, त्याच्याठायां भौतिक हस्तपाद मनुष्य आरोपित होता व तदनुसारें मूर्तिपूजा प्रचारांत आली होती. त्या देवाला भक्ष्य पाहिजे, पेय पाहिजे, त्याला शयन करण्याला मंचक पाहिजे, त्याला स्त्री पाहिजे, अशा कल्पना निघून सर्वथा मनुष्याचें हीनरूपच देवाच्या ठायीं लोक कल्पीत होते. कर्मठपणा व धर्माचा शुष्कपणा चोहींकडे माजून राहिला होता. जिकडेतिकडे अहंपणा आणि मत्सरादि विकारांचें प्राबल्य माजून राहिलें होतें. देशामध्यें सर्वत्र अनेक धर्मपंथ उत्पन्न झाले होते.

**पीत्वा पीत्वा पुनः पीत्वा यावत्पतति भूतले ।**
**उत्थायच्च पुनः पीत्वा पुनर्जन्म न विद्यते ॥**

या शाक्तपंथाच्या ह्मणण्याप्रमाणें, व

**यावज्जीवं सुखं जीवेदृणं कृत्वा घृतं पिबेत् ।**
**भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः ॥**

या चार्वाकाच्या ह्मणण्याप्रमाणें खरोखरच स्थिति झालेली होती. यास्क मुनींनीं

**स्थाणुरयं भारहारः किलाभूदधीत्य वेदं न विजानाति योऽर्थम् ।**

ह्मटल्याप्रमाणें वेदाचें अध्ययन करणारांची स्थिति भार वाहणाऱ्या खांबाप्रमाणें झाली होती. ह्मणजे अचेतन पदार्थांप्रमाणें ते केवळ

वेदपाठक बनले होते. वेदग्रंथांतील व पुराणांतील सर्व दिव्य रहस्य लुप्तप्राय होत चाललें होतें.

याप्रमाणें पूर्वीच्या ऋषींनीं प्रतिपादिलेल्या उन्नत तत्त्वांचा ऱ्हास होत असतांना एक चकचकीत तारा बंगाल देशामध्यें उदित झाला. आपल्या चरित्राचे नायक राजा राममोहनराय हाच तो तारा होय.

प्रकरण दुसरें.

# पूर्वपीठिका.

**यदा यदाहि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥**

अर्थात्, ज्या ज्या वेळीं अधर्म वाढतो, धर्माची पर्वा लोकांनां रहात नाहीं, त्या त्या वेळीं पतितांचा उद्धार करण्याकारितां परमेश्वराच्या थोरथोर विभूति जगांत येतात, व त्यांच्यामध्यें विशेष धर्मबळ, धर्मतेज उत्पन्न करण्याला परमेश्वर कारणीभूत होतो. तो आपल्या प्रियभक्तांच्या बुद्धीला विशेष प्रेरणा देऊन त्यांच्याद्वारें सर्व जगाला तारण्याला कारणीभूत होतो. या श्रीकृष्णांच्या द्वारें व्यासांनीं काढलेल्या उद्गारांची जणूंकाय सत्यताच पटविण्याला, धर्माचें पोषण करून त्यामध्यें नवीन जोम उत्पन्न करण्याला व धर्मभेद आणि वृथाभिमान नष्ट व्हावा, यासाठींच जणूं काय राममोहनाचा जन्म ता. २२ मे सन १७७२ रोजीं बंगालमधील हुबळी जिल्ह्यांतील राधानगर शहरीं वंद्योपाध्याय नांवाच्या कुलीन राऱ्ही ब्राह्मणघराण्यामध्यें झाला.

या वेळीं बंगाल प्रांतावर पाश्चात्यांच्या समागमामुळें सुधारणेचा परिणाम बराच झालेला होता. प्लासीच्या लढाईनंतर या प्रांतामध्यें ब्रिटिश राज्याचा पाया अधिक भक्कम झालेला होता. ही वेळ म्हणजे पाश्चात्यांचा हिंदुस्तानाशीं संयोग झाल्यामुळें जी क्रांति व्हावयाची तिची सुरुवात होय. शेंकडों वर्षें जी जागृति झाली नव्हती ती दिसूं लागली होती. देशाची निद्रा संपून तो जागृत होऊन नव्या दिवसाच्या अरुणोदयाला नुकतीच सुरुवात झाली होती.'

# राजा राममोहनराय.

मुर्शिदाबादेच्या नबाबानें राममोहनाचा पणजा वंदोपाध्याय कृष्णचंद्र याला राय राय अशी बहुमानाची पदवी दिली होती. पुढें त्यांतील एक राय शब्द जाऊन राममोहनच्या घराण्याला वंशपरंपरा राय या पदवीनें लोक संबोधूं लागले. कलकत्ता येथील गार्डन नांवाच्या आपल्या एका युरोपियन मित्राला राममोहनानें आपल्या पूर्वजांविषयीं जें पत्र लिहिलें आहे, त्याच्या पहिल्या प्याऱ्यामध्यें तो ह्मणतोः—

"माझे पूर्वज कुलीन ब्राह्मणवर्गापैकीं असून ते अति पुरातन काळापासून भिक्षुकवृत्ति करून उदरनिर्वाह करीत असत; पण माझा पांचवा पूर्वज यानें मात्र १४० वर्षांपूर्वीं पारमार्थिक धंदा सोडून इहलोकींचें सुख आणि वैभव यांचा स्वीकार केला. त्याच्या वंशजांनींहि आतांपर्यंत त्याचेंच अनुकरण केलेलें आहे. राजदरबारीं इतरांप्रमाणें कधीं कधीं यांनां मोठा मान मिळाला आहे, तर कधीं कधीं त्यांचा अपमानहि झालेला आहे. कधीं कधीं यांनां स्वीकृत कार्यामध्यें यश आलें आहे, तर कधीं कधीं अपयश येऊन दुःखहि झालें आहे. कधीं श्रीमंत तर कधीं गरीब याप्रमाणें यांचें स्थित्यंतर होत गेलें आहे. पण माझ्या मातुल घराण्यांतील वंशजांनीं आपला जो उपाध्येपणाचा धंदा तो आतांपर्यंत कायम चालू ठेविला आहे. ऐहिक डामडौलाला भुलून महत्वाकांक्षेला बळी पडण्यापेक्षां, शांतपणें भिक्षुकवृत्ति करून उदरनिर्वाह करणें त्यांनां बरें वाटतें."

राममोहनाच्या घराण्यांत हें वृत्यंतर औरंगजेब बादशहाच्या कारकीर्दींत झालें. हा बादशाहा मोठा मुत्सद्दी, पराक्रमी होता खरा, परंतु महंमदी धर्माचा मोठा अभिमानी आणि पक्षपाती असल्यामुळें हिंदुधर्माला आणि हिंदुधर्माधिकाऱ्यांनां तो फार पीडा देत असे. यावरून हें वृत्यंतर स्वेच्छेनें झालें, किंवा या जुलमामुळें झालें तें बरोबर समजत नाहीं. या दिवसापासून पुढें राममोहनाच्या

घराण्यांतील पुरुषांनीं मोठमोठीं कामें केलीं, पदव्या भोगिल्या, आणि राजकारणी पुरुषांनां प्रायः जीं सुखदुःखें अनुभवावीं लागतात तीं त्यांनीं सर्व अनुभविलीं.

कृष्णचंद्र याचें मुळचें राहण्याचें ठिकाण मुर्शिदाबादेजवळील शांकश खेड्यामध्यें होतें. तो तहशीलदार असल्यामुळें त्याला वारंवार कृष्णनगर शहरीं जावें लागे. या ठिकाणीं अभिराय गोस्वामी ह्मणून वैष्णव धर्माचा एक विद्वान् प्रचारक राहत असे, व तेथेंच गोपीदास ठाकूर किंवा कृष्णाजी नांवाचें देऊळ होतें. प्रपंचांतील व्यवहारांत मनाला जेव्हां जेव्हां शीण वाटे, तेव्हां तेव्हां कृष्णचंद्र या देवळांत जाऊन देवाची मनोभावानें पूजा करी, व त्या साधूबरोबर धार्मिक विषयांवर संभाषण करी. त्यायोगें त्याच्या मनाला शांतिलाभ होत असे. असें होतांहोतां कृष्णनगर शहर त्याला फारच आवडूं लागलें. म्हणून कृष्णनगराजवळील जें राधानगर त्या ठिकाणीं येऊन त्यानें वसति केली.

कृष्णचंद याला अमरचंद हरिप्रसाद व व्रजविनोद असे तीन मुलगे होते. व्रजविनोदाला नबाब सुराजउद्दवला याच्या दरबारांत मोठ्या दर्जाची नोकरी होती. लोकांमध्येंहि त्याला बराच मान असे. त्या वेळच्या श्रीमंत लोकांप्रमाणें तो पैशाचा लोभ धरीत नसे. ईश्वरावर व सर्व मनुष्यमात्रावर प्रेम करणें हें त्याच्या आयुष्यांतील एक मुख्य ध्येय होतें.

या वेळीं बंगाल देशामध्यें वैष्णवपंथ आणि शाक्तपंथ असे दोन धार्मिक पंथ प्रचारांत होते. या दोन पंथांमध्यें मोठें वैमनस्य असून एक पंथ दुसऱ्याला पाण्यांत पाही. राम मोहनाचे वंशज वैष्णव पंथाचे होते; परंतु त्याच्या मातुलगृहांतील मंडळी शाक्तपंथाची होती. हा संबंध थोडा चमत्कारिक दिसतो; पण त्याचा उलगडा पुढीलप्रमाणें आहे:—

त्या वेळीं कुलीन ब्राह्मणांनां सर्वांपेक्षां श्रेष्ठ समजून त्यांचा दर्जा फार वरिष्ठ प्रकारचा मानिला जात असे. कुलीन ब्राह्मणवर्गांपैकीं नसलेले असे अन्य-वर्गीय ब्राह्मण इतर बाबतींत केवढेहि नांवाजलेले असोत; कुलीनांशीं शरीरसंबंध ठेवण्यामध्यें त्यांनां भूषण वाटे. श्रीरामपूर जवळील छतरा येथील शामभट्टाचार्य हा शाक्त असून भंग-कुलीनांपैकीं होता. त्या वेळेच्या लोकांचा तो धर्मगुरु असून त्याची कीर्ति दूरवर पसरलेली होती. व्रजविनोद याच्या एका मुलाला आपली एक मुलगी द्यावी, असा पुष्कळ दिवसांपासून त्याचा मानस होता; परंतु अशा प्रकारचें नातें जडणें म्हणजे जवळजवळ अशक्य गोष्ट आहे, असें समजून त्याला आपला मानस पुष्कळ दिवस उघड करितां आला नाहीं. शेवटीं योग्य संधि प्राप्त झाली. व्रजविनोद मृत्युशय्येवर पडला व त्या वेळच्या हिंदु चालीप्रमाणें त्याला गंगेच्या तीरावर आणिलें. त्याचा सुस्वभाव लक्ष्यांत आणून शामभट्टाचार्य त्याच्याकडे गेला, आणि अनेक विषयांवर बोलतांबोलतां त्यानें त्याच्यापासून एक वचन मागून घेतलें. व्रजविनोद हा निर्मळ अंतः-करणाचा असल्यामुळें शामभट्टाचार्यांचा हेतु कोणत्याहि प्रकारें वाईट नसेल, असें समजून त्यानें त्याला गंगेची शपथ घेऊन तें वचन दिलें. शामभट्टाचार्यानें नंतर व्रजविनोदाला आपला मनोदय कळवून म्हटलें "माझ्या एका मुलीचें लग्न तुमच्या एका मुलाशीं व्हावें, अशी माझी फार इच्छा आहे; तेव्हां आपण दिलेलें वचन आतां पुरें करावें!"

हें ऐकून व्रजविनोदाला फार आश्चर्य वाटलें. परंतु त्याच्या-सारख्या धार्मिक मनुष्यानें वचनभंग केला नाहीं! त्यानें ही गोष्ट आपल्या सातहि मुलांनां कळवून त्यांचा मानस विचारिला. परंतु पांचवा मुलगा रामकांत याच्याशिवाय दुसऱ्या कोणींहि ती गोष्ट कबूल केली नाहीं. आपल्या पांचव्या मुलानें आपल्या आज्ञेला

मान देऊन वचनभंगाच्या पातकांतून आपल्याला मुक्त केलें, हें पाहून व्रजविनोदाला अत्यंत समाधान वाटलें, व त्यानें त्या मुलाला आशीर्वाद दिला. कांहीं दिवसांनीं रामकांताचें लग्न शामभट्टाचार्यांची मुलगी तारणीदेवी इच्याबरोबर झालें. ती पांचव्या मुलाची बायको ह्मणून तिला फूलबौ असें ह्मणतां ह्मणतां पुढें फूलठाकुराणी नांवानें ती प्रसिद्धीस आली. ती जरी शाक्तकुळांत जन्मली होती, तरी तिचें लग्न झाल्यावर तिला वैष्णवधर्माची दीक्षा देण्यांत आली. न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे यांचे या प्रसंगींचे पुढील उद्गार किती यथार्थ आहेत!

" ह्मणजे शाक्ततेज व वैष्णवतेज आपला विरोध विसरून एक जीव झालीं, आणि त्यापासून राममोहन हा थोर पुरुष जन्मास आला. या महात्म्याला जें कार्य साध्य करावयाचें होतें, त्याचें हा वैष्णव व शाक्त मातापित्यांचा संयोग हें एक सूचकच होय ! "

राधागोविंद नांवाचें त्यांचें गृहदैवत असे. प्रातःकाळीं उठल्याबरोबर या दैवताला फुलें अर्पण करणें, हें या घराण्याचें पहिलें कर्तव्य असे. त्या वेळचे लोक आपल्या प्रामाणिक समजुतीप्रमाणें वागत असत. प्रत्येक कुटुंबाची उपास्य देवता निरानिराळी असे, व त्या कुटुंबांतील मंडळीचें त्या देवतेवर निस्सीम प्रेम असे.

प्रथम रामकांत याला मुर्शिदाबादेचा नबाब सुराजउद्दवला याच्या दरबारामध्यें नोकरी होती; पण तो नबाब इतका दुष्ट होता, कीं, आपल्या हिंदुरयतेचीं घरें जाळून टाकणें, मनुष्यांनीं भरून चाललेल्या नौका बुडविणें, आणि कधीं कधीं गरोदर स्त्रियांना—ज्याचें वर्णन केलें असतां अंगावर रोमांच उभे राहतील—अशा प्रकारचीं वेदनाकारक दुःखें देणें, असल्या गोष्टींत त्याला आनंद वाटत असे! रामकांताचा मुर्शिदाबादेच्या दरबारामध्यें अपमान झाल्यामुळें, व

दरबारांतील वरिष्ठ अमलदारांशीं त्याचें न पटल्यामुळें, त्यानें आपल्या नोकरीचा राजीनामा दिला. नंतर राधानगरजवळील बरद्वानच्या राजाच्या मालकीच्या कांहीं मालमत्तेची व्यवस्था पाहाण्याच्या कामावर तो राहिला. तेथेंहि त्याची बरद्वानच्या महाराजाशीं वारंवार खडाजंगी उडूं लागली! यामुळें त्याला संसाराचा इतका वैताग आला, कीं, ऐहिक व्यवहारांतून त्यानें आपलें बहुतेक लक्ष्य काढून घेतलें, व आपला सारा वेळ तो ईश्वरभजनपूजनांत घालवूं लागला. तो मोठा प्रामाणिक असून पापभीरू होता.

त्याची पत्नी फूलठाकुराणी हिनेंहि त्याला या कामांत अत्यंत मदत केली. ती फार सद्गुणी व सत्वशील बाई असून फार व्यवहार-चतुर होती. आपल्या पतीला ती वेळोवेळीं प्रत्येक कामांत योग्य सल्लामसलत देत असे. तिला एक मुलगी व दोन मुलगे झाले. वडील मुलाचें नांव जगमोहन, व धाकट्याचें नांव राममोहन.

पुढें जीं माणसें विशेष प्रसिद्धीस आलीं, जगाच्या कल्याणास जीं अंशतः कारणीभूत झालीं, अशांचीं चरित्रें आपण लक्ष्यपूर्वक पाहिल्यास,एक गोष्ट आपल्या तात्काळ लक्ष्यांत येते.ती ही कीं,त्या त्या माणसांच्या थोरपणाचा व त्यांच्या मातांच्या गुणांचा फार निकट संबंध असतो. आमच्या चरित्रनायकामध्यें जे विशेष गुण होते, ते सर्व त्याला त्याची माता फूलठाकुराणी हिच्यापासूनच प्राप्त झाले होते, असें म्हटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं

फूलठाकुराणीसारख्या बुद्धिमती आणि धर्मपरायण स्त्रिया विरळाच दृष्टीस पडतात. फूलठाकुराणीला कोणत्याहि प्रकारचा मिथ्या अगर कुत्सित व्यवहार क्षणमात्र खपत नसे. या बाई अर्थात्च जुन्या विचारांच्या होत्या; पण त्यांचे नित्य नेम, त्यांची भक्ति, त्यांचें कडक धर्मानुष्ठान हीं सर्वांच्या ठिकाणीं त्यांच्याविषयीं

आदरभाव . जागृत करीत असत. वृद्धपणीं त्यांनीं जगन्नाथाच्या यात्रेला जावयाचा निश्चय केला. इतर जुन्या बायांप्रमाणें त्यांचाहि असा दृढविश्वास असे, कीं, देवदर्शनाला जावयाचें तर आपण कांहीं तरी कष्ट सोसले पाहिजेत. गाड्यांत बसून अथवा पालख्यांत मिरवणूक काढीत देवर्शनाला तें काय जावयाचें ? असा त्यांचा दृढविश्वास असल्यामुळें, चांगली सुस्थिति असतांहि, त्यांनीं आपल्याबरोबर कोणी दासदासी किंवा नोकरमाणूस घेतलें नाहीं. कोणा दासीला बरोबर घेतलें तर ती वाटेंत आपली सर्व प्रकारची काळजी घेईल, आपल्याला कांहीं कष्ट पडूं द्यावयाची नाहीं, ह्मणून कोणालाहि बरोबर न घेतां या बाईनीं पायींच जगन्नाथाची यात्रा केली. एवढेंच नव्हे, तर मृत्युपूर्वी या एक वर्षभर जगन्नाथाच्या मंदिरामध्यें दासी ह्मणून राहिल्या, व यांनीं सर्व प्रकारचें हलकेंसलकें काम केलें.

जी ही फूलठाकुराणी एका काळीं राममोहनावर अतिशय क्रुद्ध झाली होती, राममोहनानें प्रतिमापूजनाचा धिःकार केला ह्मणून जी त्याच्या गृहत्यागास कारण झाली होती, तीच फूलठाकुराणी अखेरीसअखेरीस एकदां राममोहनास ह्मणालीः—

" राममोहन ! बाबा, तुझेंच मत खरें आहे असें मला अंतीं वाटूं लागलें आहे. पण काय करावें ? आह्मी अबला, आणि मी तर आतां अगदीं वृद्ध झालेली. तशांतून प्रतिमापूजनास प्राधान्य देणारीं अनुष्ठानें करितांकरितां मी ह्मातारी झालें आहें. त्यांतच मला आतां एक प्रकारचें सुख वाटतें. त्यामुळें त्या मार्गाचा आतां माझ्यानें त्याग होणें नाहीं, इतकेंच. "

## प्रकरण तिसरें.

# शिक्षण.

राममोहन सुमारें पांच वर्षांचा झाला, तेव्हांपासूनच त्याच्या भावी थोरपणाचीं लक्षणें दिसूं लागलीं. एकदां वाचलेली किंवा ऐकलेली गोष्ट तो सहसा विसरत नसे. ज्ञान मिळविण्याची राममोहनाला इतकी उत्सुकता होती, कीं, एवढ्या लहान वयांतहि तो आपल्या आईबापांना सोडून, त्याचा वडील भाऊ जगमोहन दुसऱ्या गांवीं रहात होता त्याच्याबरोबर शिक्षणासाठीं गेला. अशी एक गोष्ट सांगतात, कीं, एके प्रसंगीं दूध न पिण्याविषयीं राममोहन हट्ट धरून बसला. कोणाच्यानेंहि त्याची समजूत म्हणून होईना! शेवटीं वडील भावानें त्याला दटावून सांगितलें, कीं 'तूं जर असा हट्ट धरून बसशील, तर तुला शाळेंतून काढून घरीं आईकडे पाठविलें जाईल!' आपण दूध न प्यालों तर आपल्या शिक्षणाचा मार्ग खुंटेल, अशी भीति वाटून राममोहनानें तें दूध गटकन् पिऊन टाकिलें!

बंगालमधील कोर्टाची भाषा त्या वेळीं फारशी असल्यामुळें राममोहनच्या बापानें खासगी रीतीनें त्याला फारशी भाषेचें शिक्षण देण्याला सुरुवात केली. पुढें कांहीं वर्षांनीं फारशी व आरबी भाषांचें पद्धतशीर शिक्षण मिळावें म्हणून त्याला पाटणा येथें पाठविलें. सांप्रत इंग्रजी भाषा आहे, त्याप्रमाणें त्या वेळीं संपात्ति आणि मानमान्यता मिळविण्यास या दोन भाषांचें ज्ञान आवश्यक समजलें जात असे. त्या वेळीं सरकारदरबारीं फारशी भाषा होती म्हणून राममोहन ती शिकला, आरबीवांचून फारशी लंगडी म्हणून तिचाहि त्यानें

अभ्यास केला, हें खरें; तथापि फारशींतील तत्त्वज्ञानपर काव्यांचा त्याच्या मनावर अत्यंत इष्ट परिणाम झाला. आरबी भाषेंतील युक्लिडचें भाषांतर, ॲरिस्टाटलच्या ग्रंथांचीं रूपांतरें, व कुराण यांचें त्यानें आस्थापूर्वक अध्ययन केलें होतें. त्याचा प्रतिमापूजनावरील विश्वास जावयाला हें अध्ययन कारण झालें असावें, असें ह्मणतात. तथापि अगदीं लहानपणापासून त्याची वृत्ति अत्यंत धार्मिक होती. हा विश्वास उडण्यापूर्वीं पूजाअर्चा करण्याकडे त्याचें अतिशय लक्ष्य असे. एवढेंच नव्हे, तर भागवताचा एक अध्याय वाचल्यावांचून तो पाणी देखील पीत नसे, असा त्याचा नित्यक्रम होता.

राममोहन आत्मचरित्रांत ह्मणतोः—"पूर्वजांच्या चालीस अनुसरून, व बापाच्या इच्छेवरून मीं फारशी आणि आरबी भाषांचा अभ्यास केला. मुसलमानी दरबारामध्यें राहणाराला या भाषा येणें अत्यावश्यक होतें. मातुल घराण्याच्या वहिवाटीला अनुसरून मीं संस्कृत भाषेचें व त्या भाषेमधील परमार्थविषयक ग्रंथांचें अध्ययन केलें."

त्या वेळेच्या चालीप्रमाणें राममोहनाचें लग्न अगदीं लहानपणींच झालें. पण त्याची पत्नी लवकरच निवर्तल्यावर त्याच्या बापानें त्याचें लग्न दुसऱ्या दोन लहान मुलींबरोबर एकएक वर्षाच्या अंतरानें करून दिलें! ह्मणजे अगदीं लहान वयांतच त्याचीं तीन लग्नें झालीं! त्याचें दुसरें व तिसरें लग्न अनुक्रमें १७८१ त व १७८२ त झालें.

राममोहनाचीं मातापितरें त्याच्या धर्मशिक्षणाची फार काळजी घेत असत. असें असतां पुढें प्रचलित धर्ममार्गाचा राममोहनानें त्याग केला, हें पाहून तत्संबंधानें एक विलक्षण आख्यायिका लोकांनीं जोडिली आहे, ती अशीः—

# राजा राममोहनराय.

एकदां वैष्णव झालेली फूलठाकुराणी राममोहनाला घेऊन पितृगृहीं गेली. तेथें राममोहनाचे आजोबा शिवपूजेंत गढून गेले होते. त्यांनीं राममोहनाच्या हातांत एक बेलाचें पान दिलें. राममोहनाला त्या बेलाच्या पानाचें काय करावयाचें तें कोठें ठाऊक होतें! त्यानें तें पान तोंडांत घातलें. हें पाहून आजोबा नातवावर अतिशय रागावले, व आपल्या मुलीच्याच शिकवणीवरून त्यानें आपला हा अपमान केला, असा त्यांनीं आपला समज करून घेतला. उलटपक्षीं, आपल्या पित्यानें आपल्या मुलाच्या हातांत बिल्वपत्र दिल्यानें त्यांनीं वैष्णवपंथाचा धिःकार केला, असें तिला वाटलें. बापाचें व मुलीचें भांडण जुंपलें, व क्रोधानें वेडा झालेला तो वृद्ध ह्मणाला "हा तुझा मुलगा तुझ्या पंथाला हात देईल असें समजूं नकोस! हा तर विधर्मी होणार खास! हा माझा शाप कालत्रयींहि खोटा होणार नाहीं!"

नंतर फूलठाकुराणी बापाच्या खूप पायां पडली, तेव्हां त्यानें सांगितलें, कीं, "एकदां बोललों तें बोललों! पण तुला एवढेंच सांगतों, कीं, तुझा हा मुलगा सरकारदरबारीं मोठी मानमान्यता पावणार आहे!"

फूलठाकुराणीनें घरीं आल्यानंतर हा सर्व वृत्तांत आपल्या यजमानांला सांगितला, व हें भावी अरिष्ट टाळण्यासाठीं लहानपणापासून मातापितरांनीं राममोहनाच्या धर्मशिक्षणाची फार काळजी घेतली; पण काय? अंतीं शापच कांहीं अंशानें खरा झाला, व फूलठाकुराणीनेंहि आपल्या मुलाचाच मार्ग सत्य, असें कबूल केलें.

फारशी व आरबी भाषांचें ज्ञान संपादन केल्यानंतर हिंदुधर्मशास्त्राचा अभ्यास करण्याकरितां संस्कृत भाषेचें मुख्य पीठ जें बनारस शहर तेथें राममोहनाच्या चौदाव्या वर्षी त्याच्या आईच्या इच्छेवरून त्याला पाठविण्यांत आलें. रेलवे सुरू होण्यापूर्वी काशीला जाणें ह्मणजे

फार मुष्किलीचें होतें. त्या पवित्र स्थळीं यात्रेकारितां जाण्यापूर्वी प्रथम मृत्युपत्र करून नंतर जावयाचें, अशी त्या वेळच्या हिंदु लोकांची वाहिवाट असे. एवढासा लहान मुलगा आपल्या प्रेमळ आईबापांना सोडून इतक्या लांब ज्ञानप्राप्तीकरितां गेला, यावरून राममोहनाला ज्ञानाची आवड किती होती, हें उघड दिसतें.

राममोहनाच्या या प्रवासाविषयीं, व काशीमध्यें संस्कृत शास्त्रांचें अध्ययन त्यानें कसें व कोठें केलें याविषयीं माहिती उपलब्ध नाहीं. जे विद्यार्थी त्या वेळीं काशीस अध्ययन करण्याकारितां जात, त्यांनां त्यांचे गुरु फुकट शिक्षण देत. एवढेंच नव्हे, तर त्यांच्या जेवणाखाण्याचीहि योग्य ती व्यवस्था आपल्याच घरीं करून मोठ्या दक्षतेनें त्यांची जोपासना करीत. अशाच एका पंडिताच्या हाताखालीं राममोहनाचें अध्ययन झालें असावें. थोड्याच वेळांत राममोहन सर्व शास्त्रांमध्यें, विशेषतः वेदशास्त्रामध्यें पारंगत झाला.

प्रकरण चवथें.

## गृहत्याग.

राममोहनाची बुद्धिमत्ता विलक्षण होती, त्याचप्रमाणें वाद-विवाद करण्याची हातोटी त्याला उत्तम प्रकारें साधली होती, हें त्याच्या पुढील चरित्रावरून लक्ष्यांत येतेंच. पण हा गुण त्याच्या ठिकाणीं १५–१६ वर्षांपासूनच दिसूं लागला होता. लहानपणीं तो आपल्या बापाप्रमाणेंच धर्मनिष्ठ होता. परंतु फारशी, आरबी व संस्कृत ग्रंथांचें अध्ययन केल्यानंतर त्याच्या विचारांत पुष्कळच चलबिचल झाली. धर्मसंबंधीं विषयावर त्याचा व त्याच्या वडिलांचा नेहमीं वाद व्हावा, आणि वडिलांनीं कांहीं ह्मटलें तरी याचा 'किन्तु,' 'परंतु' तयार असेच! त्यावर एकदां त्याचे तीर्थरूप अगदीं चिडून ह्मणाले "मीं कांहींहि ह्मटलें तरी त्यावर तुझा किन्तु आहेच! व माझ्या कल्पनेवर प्रतिकल्पना, विचारावर प्रतिविचार आहेतच. एकूण मला खोडून टाकावयाला तूं सदा उत्सुक असतोस!" याप्रमाणें बापलेंकाचें पटेनासें होऊन त्याच्या बापानें त्याला घराबाहेर हांकून दिलें.

डॉ. लँट कारपेंटर यांनीं, राममोहनाला गृहत्याग करावयाला निराळेंच कारण झालें, असें ह्मटलें आहे. वर ह्मटल्याप्रमाणें त्याचा आपल्या वडिलांशीं वादविवाद व्हावा; पण त्याचें समाधान ह्मणून होत नसे. त्यानें शंका विचारल्या असतांना वडिलांनीं दिलेलीं उत्तरें त्याला पटत नसत. ह्मणून तिबेटांत जाऊन तेथील धर्ममतें तरी पहावीं, असा विचार करून त्यानें गृहत्याग केला, त्याला घरांतून घालवून दिलें नाहीं, असें डॉ. लँट कारपेंटर ह्मणतात.

## गृहत्याग.

राममोहनानें प्रतिमापूजनाविरुद्ध फार कडक निबंध लिहिला ह्मणून त्याला घरांतून घालवून दिलें ही गोष्ट खरी नाहीं, व राममोहनाचें आत्मचरित्रपर पत्र हेंहि बनावट आहे, असें मिस कॉलेटबाईनें सिद्ध केलें आहे. राममोहनच्या सर्व चरित्रकारांनीं या बनावट पत्रावर विश्वास ठेवल्यामुळेंच असा प्रकार झाला, असें तिचें ह्मणणें आहे. परंतु हें पत्र बनावट आहे, असें आह्मांला वाटत नाहीं. असो.

राममोहनाला घराबाहेर हांकून दिलें, तरी त्यायोगें त्यानें आपलें धैर्य खचूं दिलें नाहीं. सर्व हिंदुस्तानभर प्रवास करण्याचा त्यानें निर्धार केला, व प्रवास करीत असतां निरनिराळया भाषा अवगत करून घेऊन त्यांमध्यें लिहिलेल्या निरनिराळया धर्ममतांची माहिती त्यानें मोठ्या आस्थेनें व मार्मिकतेनें मिळविली.

या पर्यटनामध्यें हिंदुस्तानच्या निरनिराळया भागांत कोणतीं निरनिराळीं धर्ममतें आहेत, त्यांचें लोकांवर किती वजन आहे, आणि त्यांपासून त्यांच्या आचारविचारांवर कसकसे परिणाम घडून येतात, हें जाणून घेण्याकडेच त्याचें विशेष लक्ष्य असे.

राममोहन सन १७८७ मध्यें तिबेटांत गेला. तीर्थयात्रा करण्याच्या इराद्यानें त्या वेळीं बरेच गोसावी, बैरागी दूरदूरचे प्रवास करीत असत. त्या बैराग्यांमध्यें बरेच तरुणहि असत. अशाच एकाद्या मंडळीची गांठ पडून राममोहन तिबेटमध्यें गेला असावा. तिबेट येथें असतांना राममोहनानें आपल्यावर एक संकट ओढवून घेतलें होतें. तिबेटांत लामाला प्रत्यक्ष परमेश्वराचा मान असतो. तो मेला तरी लहान बालकरूपीं लामा तेथें तयार होऊन त्यालाहि तितकाच मान असतो! हा प्रकार पाहून राममोहनानें कडक टीका केली. त्यावरून तिबेटी लोक फार चिडले, व राममोहनाच्या प्राणावर बेतली. हें वृत्त कांहीं

स्त्रियांनां कळलें. त्यांचा राममोहनावर लोभ असे, ह्मणून त्यांनीं राममोहनाची तिबेटांतून सुटका केली, असें त्याच्या बंगाली चरित्रांत ह्मटलें आहे.

मध्यंतरीं राममोहनाच्या आईच्या विनवणीवरून त्याच्या बापानें राममोहनाच्या शोधार्थ निरनिराळ्या शहरीं लोक पाठविले होते. राममोहन उत्तरहिंदुस्तानांतून येत असतां ते लोक त्याला भेटले, व त्याच्या बापाचा निरोप त्यांनीं त्याला कळविला. मातृ–पितृप्रेमामुळें राममोहनाचा कंठ सद्गदीत होऊन पहिल्या प्रसंगाची आठवण विसरून तो आपल्या बापाच्या घरीं सुमारें १७९०–९१ त गेला. राममोहनापासून यापुढें आपल्याला कोणत्याहि प्रकारचा त्रास होणार नाहीं, सुखानें कालक्रमणा करितां येईल, चार वर्षें आपल्या मुलास बरींच संकटें भोगावीं लागलीं, त्यामुळें त्याच्या विचारांमध्यें आतां पालट झाला असेल, व त्यामुळें आपल्या वाडवडिलांचा जो धर्म त्याविषयीं तो आतां खात्रीनें आदर दाखवील, असें त्याच्या वडिलांना वाटलें होतें. परंतु राममोहनानें एकदां जो मार्ग स्वीकारला होता, त्यापासून त्याला पराङ्मुख करण्याची कोणाचीहि प्राज्ञा नव्हती! देशांतील प्रचलित हिंदुधर्माविरुद्ध त्यानें चळवळ सुरू केली. त्यामुळें त्याच्या बापानें त्याला पुनः घराबाहेर हांकून दिलें! या वेळीं त्याला बापाकडून गुप्तरीतीनें मदत मिळत होती, असें ह्मणतात. राममोहन बनारस येथें असतांना त्याचें कुटुंबहि त्याच्या अवळच होतें, व येथेंच सन १८०० मध्यें त्याचा वडील मुलगा राधाप्रसाद जन्मला. या गोष्टीविषयीं राममोहन आत्मचरित्रांत लिहितोः—

"मूर्तिपूजा व अंधश्रद्धा या विषयांवर माझा व इतर ब्राह्मणांचा नेहमीं कडाक्याचा वाद होऊं लागला, व मी सती जाण्याच्या चालीसंबंधानें हरकत घेऊं लागलों, ह्मणून ते माझा द्वेष करूं लागले.

त्यांनीं आपलें वजन खर्च करून मला पुनः घराबाहेर काढण्याला माझ्या वडिलांना भाग पाडलें. मी घराबाहेर निघालों, तथापि माझ्या बापाकडून या वेळीं मला मदत होत होती. ”

राममोहनाचा एक चरित्रकार ह्मणतो, कीं, रामकांताचें त्याच्यावर अतिशय प्रेम होतें, व त्यामुळें त्याला घराबाहेर काढणें त्याच्या जिवावर येई. राममोहनाचीं धार्मिक मतें जरी त्याच्याविरुद्ध होतीं, तथापि तो त्याला घरामध्यें ठेवण्याला तयार होता. परंतु फूलठाकुराणीनें अत्याग्रह धरल्यावरून राममोहनाला घराबाहेर हांकून देणें त्याला भाग पडलें. मुलगा घराबाहेर पडल्यानंतर रामकांताच्या तोंडून पुढील उद्गार निघाले:—

“रामचंद्राला अयोध्या नगरींतून हांकून दिल्यामुळें दशरथाला दुःख होऊन तो ज्याप्रमाणें मृत्युमुखीं पडला, त्याप्रमाणेंच माझ्या रामाला मीं घराबाहेर हांकून लाविल्यानें माझी स्थिति होईलसें मला वाटतें !”

नवऱ्याची ही विपन्नावस्था पाहून आपल्या मुलाला परत घरीं बोलाविण्याविषयीं फूलठाकुराणीनें आपलें मत दिलें. फूलठाकुराणीसारख्या प्रेमळ व मृदु अंतःकरणाच्या मातेनें इतकी कठोरता दाखविली, हें थोडें चमत्कारिकच दिसतें; परंतु तिच्या अंगीं इतर सद्गुण असतांहि हिंदुधर्माविषयीं तिला इतका अभिमान वाटे, कीं, ती त्यायोगें वेडी बनून गेली होती!

१८०३ मध्यें रामकांत मृत्यु पावला, व नंतर लवकरच तिनें आपल्या मुलाला घरीं आणिलें. रामकांताची कांहीं मालमत्ता होती, तिची त्यानें मृत्युपूर्वी दोन वर्षे आधींच आपल्या सर्व मुलांमध्यें

सारखी वांटणी करून मृत्युपत्र करून ठेविलें होतें. परंतु, शास्त्रांचें अध्ययन करण्यामध्यें राममोहन इतका गढून गेला होता, कीं, त्याच्या वांट्याला आलेल्या मालमत्तेची व्यवस्था करण्यास त्याला फुरसतच मिळाली नाहीं. त्याची आईच ती सर्व व्यवस्था पहात असे.

प्रकरण पांचव.

# व्यवसाय व गृहस्थिति.

आपल्या वयाच्या २८ व्या वर्षीं राममोहनानें इंग्रजी शिकण्याला प्रारंभ केला; परंतु त्याचा बहुतेक वेळ हिंदु व मुसलमानी धर्मांच्या धार्मिक पुस्तकांचें निरीक्षण करण्यामध्यें जात असल्यामुळें त्याची इंग्रजी भाषेमध्यें व्हावी तशी प्रगति झाली नाहीं. या ठिकाणीं ही गोष्ट विसरतां कामा नये, कीं, इंग्रजी शिकण्याला जशीं साधनें सध्यां उपलब्ध आहेत, तशा प्रकारचें कोणतेंहि साधन राममोहनाच्या वेळीं नव्हतें. सन १७९६ सालीं त्यानें इंग्रजी शिकण्याला सुरुवात केली. वयाच्या २८ व्या वर्षीं त्याला साधारणपणें इंग्रजी बोलतां येऊं लागलें एवढेंच. लिहितां मुळींच येत नव्हतें!

पण पुढें थोड्याच वेळांत राममोहनानें त्या भाषेवर इतकें स्वामित्व मिळविलें, कीं, चांगल्याचांगल्या विद्वान् गृहस्थांवरहि त्यानें ताण केली. जेरेमी बेंथॅम यानें राममोहनाला एक पत्र पाठवून त्यांत ह्मटलें आहे, "तुमचें एक पुस्तक माझ्या वाचण्यांत आलें, त्यामुळें मला तुमच्या इतर पुस्तकांची माहिती झाली. त्या पुस्तकांतील इंग्रजी भाषेची शैली व जुळणी इतकी वाखाणण्याजोगी आहे, कीं, त्या पुस्तकावर आपलें नांव नसतें, तर हें पुस्तक एका जाड्या सुसंस्कृत इंग्रज गृहस्थानें लिहिलें आहे, असेंच मला वाटलें असतें!"

राममोहनानें नंतर सरकारी नोकरी पत्करली. प्रथम तो रंगपूर जिल्ह्यामध्यें मुलकी खात्यांत कारकून होता; परंतु पुढें आपल्या हुषारीनें शिरस्तेदार झाला. त्या वेळीं ह्मणजे १८०५ मध्यें रामगडचा

कलेक्टर जॉन डिग्बी हा असून तो विद्वानांचा मोठा चाहता असे. राममोहनाची व त्याची ओळख १८०१ मध्यें झालेली होती, व त्याच्याच सांगण्यावरून राममोहनानें नोकरी पत्करली, असें म्हणतात. राममोहनाचा दीर्घ व्यासंग पाहून त्याविषयीं त्याचें मत फार अनुकूल झालें. पुढें दोघांची मैत्री झाली आणि तो कलेक्टर आपल्या शिरस्तेदाराबरोबर धर्माचें अध्ययन करण्यांत आपला बराच वेळ घालवूं लागला. राममोहनाच्या विद्वत्तेविषयीं या साहेबाला फार आदर वाटत असे, व त्यानें त्याचे कांहीं ग्रंथ स्वतः प्रस्तावना लिहून सन १८१७ त लंडनमध्यें प्रसिद्ध केले आहेत.

डिग्बीसाहेब १८०८ मध्यें भागलपूरचे, व १८०९ मध्यें रंगपूरचे कलेक्टर झाले. त्यांच्याबरोबर राममोहनहि होता. राममोहनानें जरी सरकारी नोकरी पत्करली होती, तरी आपलें ध्येय तो कधींहि विसरला नाहीं. प्रत्येक दिवशीं संध्याकाळीं तो आपल्या घरीं ईश्वरोपासना करण्याकरितां मंडळी जमवीत असे. त्याच्या देशबांधवांकडून अर्थात्च त्याच्या या कृत्यामध्यें अडथळा येत असे. तथापि त्यानें प्रतिपादिलेलीं तत्त्वें कांहींजणांना पसंत पडलीं, व प्रथम कांहीं मारवाडी त्याला येऊन मिळाले. रंगपूरशिवाय राममोहनानें दुसऱ्या दोन जिल्ह्यांतहि शिरस्तेदारीचें काम केलें; परंतु राममोहन हा नोकरीची फारशी पर्वा करणारा नव्हता. आपल्या ध्येयाच्या आड जगिक व्यवहार येतो, म्हणून त्यानें सरकारी नोकरी सोडून दिली.

या वेळीं त्याची आई राधानगर शहराजवळील लांगूलपारा येथें येऊन राहिली होती. कांहीं दिवसांनीं तिचीं दोन अपत्यें मृत्यु पावलीं. त्यायोगें तिच्या मनाला जब्बर धक्का बसला. प्रचलित हिंदुधर्मापासून राममोहन पराङ्मुख झाला नसता, तर तिचें कांहींसें सांत्वन झालें असतें. सरकारी नोकरी सोडल्यानंतर आपल्या आईला भेट-

ण्यास राममोहन लांगूलपारा येथें गेला; परंतु आईच्या मनांतील तेढ कमी झाली नव्हती! अशा धर्मच्युत पुत्राचें मुखावलोकनहि नको, असें तिनें स्पष्ट बोलून दाखविलें, व राममोहन आलेला पाहून तिला त्याचा संताप आला. ती त्याला भेटूं देईना! परंतु तिजविषयीं राममोहनाची पूज्यबुद्धि इतकी जाज्वल्य होती, कीं, कांहीं झालें तरी मातेच्या पायांचें दर्शन घेण्याचा त्यानें निर्धार केला!

असा त्याचा निर्धार पाहून फूलठाकुराणीनें राममोहनाला निरोप पाठविला, कीं, आपला कुलदेव राधागोविंद याला तूं नमस्कार केल्याशिवाय मी तुला जवळ येऊं देणार नाहीं! असें म्हणतात, कीं, मातृप्रेमामुळें राममोहन गहिंवरला, व त्यानें राधागोविंदापुढें साष्टांग नमस्कार घातला! व असें म्हटलें, कीं, "मी माझ्या आईच्या देवाला नमस्कार करतों!"

कोणी म्हणतील, राममोहनानें अशा प्रकारचें आचरण करावयाला नको होतें. तो स्वतः एकेश्वरी मताचा इतका पुरस्कर्ता असून त्यानें मूर्तीपुढें साष्टांग नमस्कार घालावयाला नको होता. राममोहनाची तरफदारी करण्याची आमची इच्छा नाहीं; परंतु त्याला दोष देण्यापूर्वी त्या वेळेच्या विलक्षण परिस्थितीचा विचार करावयाला पाहिजे. त्या वेळीं त्याची आई दुःखसागरांत बुडालेली होती. तिचीं दोन आवडतीं मुलें निवर्तलीं होतीं, व तिचें समाधान करणें राममोहनाचें कर्तव्य होतें. त्यानें तिची आज्ञा जर पाळली नसती, तर तिला आणखी एक जबर धक्का बसला असता व त्याचा परिणाम फारच भयंकर झाला असता.

कांहीं वेळ त्याचें व त्याच्या आईचें पटलें. आपल्या आईची मर्जी संपादण्याकरितां राममोहन जरी आपली शिकस्त करीत असे, तरी आपल्या आयुष्यांतील कामगिरी—आपलें ध्येय तो विसरला नाहीं.

आपल्या देशबांधवांमध्यें चालू असलेल्या मूर्तिपूजेच्या प्रकाराचा तो अधिक जोरानें निषेध करूं लागला, व मूर्तिपूजेविरुद्ध लहानलहान पुस्तकें प्रसिद्ध करून धार्मिक विषयांवर त्या वेळच्या पंडितांबरोबर तो वाद-विवाद करूं लागला. त्यायोगें ते त्याचा द्वेष करूं लागले व एका सनातन, शाश्वत अशा देवाची पूजा करण्याचा जो त्याचा स्तुत्य हेतु त्याबद्दल चोहोंकडून त्याचा छळ होऊं लागला. यामुळें त्याच्या आईला फार संताप आला.

राममोहनाचा छळ करण्याची एक निराळीच क्लृप्ति त्याच्या एका वजनदार शेजाऱ्यानें लढविली. पहांटेस तो कांहीं लोक राममोहनाच्या घरीं पाठवीत असे, व कोंबड्याप्रमाणें आरवण्यास त्यांना सांगत असे, व संध्याकाळीं कोणाला न कळत गाईचीं हाडें तेथें फेंकीत असे. यायोगें तर त्याच्या आईचा संताप दुणावला. परंतु राममोहनानें तें सर्व निमूटपणें सहन केलें. एवढेंच नव्हे, तर उलट जे लोक त्याचा असा छळ करीत त्यांच्या तो उपयोगीं पडे.

राममोहनाची वागणूक नास्तिकपणाची वाटून, आणि शेजाऱ्यांच्या चिथावणीमुळें त्याच्या आईनें त्याला तिसऱ्यांदा घराबाहेर हांकून दिलें. या वेळीं त्याच्याबरोबर त्याच्या दोन बायका, त्याचा मुलगा व त्याच्या मुलाची बायको, एवढ्यांनां त्याच्याबरोबर घर सोडावें लागलें. कोणाला वाटेल, कीं, राममोहनाला दोन बायका होत्या, त्यावरून कुलीन ब्राह्मणत्वाचा पगडा त्याच्यावरहि बसलेला होता; परंतु अगदीं लहानपणीं आपल्या आइबापांची आज्ञा पाळण्या-करितां त्याला जें करावें लागलें, त्याबद्दल त्याला जबाबदार धरतां येत नाहीं. राममोहन बहुपत्निकत्वाच्या विरुद्ध होता.

या वेळीं राममोहन पूर्वीप्रमाणें परावलंबी स्थितींत नव्हता. मुलकी खात्यांत असतांना त्याला पगार चांगला मिळे, व नोकरी सोडल्या-

नंतर बाकीचें आयुष्य सुखानें घालवितां येण्याजोगी शिल्लक प्रामाणिकपणानें त्यानें मागें टाकली होती. अयोग्य मार्गानें त्याजकडे येणाऱ्या पैशाविषयीं तो अतिशय बेफिकीर असे, याविषयीं पुढील गोष्ट सांगतातः—

त्या वेळचा बरद्वानचा राजा तेजचंद्र याचा मुलगा प्रतापचंद्र मरण पावला. त्यायोगें त्या राजाला फार दुःख झालें. राममोहनाचा सर्वांत वडील मुलगा राधाप्रसाद त्या वेळीं बरद्वान येथें रहात असे. त्याचा चेहरा प्रतापचंद्राच्या चेहऱ्यासारखा होता. राधाप्रसादाला पाहून तेजचंद्राचें त्याच्यावर प्रेम जडलें, व त्याला त्यानें आपल्या घरीं येऊन रहाण्याला सांगितलें, आणि त्याला असें वचन दिलें, कीं, मी आपली अर्धी संपत्ति तुला आतां देतों, व बाकीच्या अर्ध्याची व्यवस्था तुजवर सोंपवितों. मागें सांगितलेंच आहे, कीं, त्या राजाशीं रामकांताचें बरें नव्हतें; यामुळें राममोहनालाहि त्या राजाविषयीं आदर वाटत नव्हता, ही गोष्ट राधाप्रसादाला माहीत होती. त्यामुळें त्यानें राजाला कळविलें, कीं, माझ्या वडिलांची परवानगी मिळाल्याशिवाय मला कांहींहि करितां येणार नाहीं. राजाचा हेतु त्यानें आपल्या बापाला कळविला; पण ही गोष्ट राममोहनाला मुळींच पसंत पडली नाहीं. त्यानें राधाप्रसादाला लिहून कळविलें, कीं, "अतःपर तूं जर त्या राजाकडे जाशील, तर मी तुझें तोंड पहाणार नाहीं!"

राममोहनानें एवढा पैसा संग्रहीं टाकला, याचें कारण असें, कीं, त्या वेळीं शिरस्तेदाराला पगार मिळून दुसरेंहि वेतन सरकारांतून मिळत असे. राममोहनानें काटकसरीनें पुष्कळ शिल्लक मागें टाकिली. ब्राह्मसमाजाचा इतिहास लिहितांना जी. एस् लिओनार्डसाहेब राममोहनाविषयीं ह्मणतातः—

# राजा राममोहनराय.

"१८१४ पर्यंत राममोहनानें रंगपूर, भागलपूर आणि रामगड या जिल्ह्यांत कांहीं वर्षें कलेक्टरचा दिवाण, आणि कांहीं वर्षें न्यायाधीश या नात्यानें नोकरी केली, त्यामुळें त्याला दिवाणजी ही पदवी मिळाली. पुढें तो दिल्लीच्या बादशहाचा वकील ह्मणून इंग्लंडाला गेला, तेव्हां बादशहानें त्याला 'राजा' हा किताब दिला. नोकरी करण्याचा त्याचा मुख्य हेतु ह्मणजे त्या वेळच्या इंग्रजी राज्यपद्धतीचें पूर्ण ज्ञान मिळवावें, आणि स्वतंत्र होण्याइतका पैसा मिळवावा, हा होता. त्याचा तो हेतु सिद्धीला गेला. नोकरी करून जमीनदार होऊन दर वर्षाला दहा हजार रुपये उत्पन्न येईल, इतका पैसा त्यानें मिळविला."

सन १७९३ सालीं लॉर्ड कार्नवालीसच्या कारकीर्दींत जमिनीचा कायम धारा ठरविण्याकारितां बंगालमधील सर्व जमिनीची मोजणी करण्याचें ठरलें. रंगपूर, दिनाजपुर व पूरणिया या जिल्ह्यांतील धारा ठरविण्याचें काम डिग्बी साहेबाकडे होतें. तें त्यानें तीन वर्षें करून इतका निःपक्षपातीपणा व न्यायीपणा दाखविला, कीं, सगळे लोक त्याची स्तुति करूं लागले; परंतु त्याचें खरें श्रेय त्याचा दिवाण राममोहनराय याजकडेच आहे. जमीनमहसुलाच्या कामांत राममोहन इतका प्रवीण होता, कीं, त्यानें सर्व जमिनीचा व त्यांच्या उत्पन्नाचा बरोबर अजमास केला. त्याला अमीनाच्या अप्रामाणिक कृत्यांविषयीं चांगली माहिती होती. त्यामुळें जरी त्यांनीं जमिनीविषयीं खोटे तक्त केले, तरी राममोहनानें त्यांचें कांहींएक चालूं दिलें नाहीं.

पूर्वीच्या आपल्या राहत्या शहराजवळ रघुनाथपुर गांवीं राममोहनानें एक घर बांधिलें. त्याच्यासमोर एक वेदी उभारून सर्व बाजूंवर "**ॐतत्सत् एकमेवाद्वितीयम्**" वगैरे उपनिषदांतील वाक्यें कोरून तेथें तो ईश्वराची उपासना करीत असे. प्रवासाल

जाण्यापूर्वी, किंवा परत आल्यावर, तो या वेदीला प्रदक्षिणा घालून नमस्कार करीत असे. त्याचा अवशेष भाग अजूनहि दिसत आहे. या वेदीला उद्देशून त्याची पत्नी उमादेवी हिनें एकदां त्याला विचारिलें "मग सर्वांत श्रेष्ठ व उत्कृष्ट धर्म आपल्याला वाटतो तरी कोणता ?"

पत्नीच्या या प्रश्नाला राममोहनानें पुढीलप्रमाणें उत्तर दिलें:—

"गाई निरनिराळया रंगांच्या असतात, परंतु त्यांच्या दुधाचा रंग एकच असतो. त्याप्रमाणें धर्माच्या बाबतींत निरनिराळया ऋषींचीं मतें निरनिराळीं असलीं तरी त्या सर्वांचें सार सत्यधर्माचें परिपालन व सद्धर्मानें आयुष्यक्रमण करणें हें एकच आहे !"

या ठिकाणीं त्याचा दुसरा मुलगा रामप्रसाद जो पुढें कलकत्ता येथें नामांकित वकील झाला, तो १८१२ मध्यें जन्माला आला. त्याचे दोनहि मुलगे त्याची दुसरी बायको श्रीमती देवी इजपासून झाले.

राममोहन मधुनमधून रघुनाथपूर येथील आपल्या घरीं जात असे. दिवसेंदिवस त्याच्या आईचा राग शांत होत गेला, व तिनें आपली चूक कबूल केली. फूलठाकुराणीनें लौकरच ओरिसा येथील ओढ्या जगन्नाथाच्या यात्रेला जाण्याची आपली इच्छा राममोहनाला कळविली. राममोहनानें तिच्या जाण्याची, खर्चाची वगैरे सर्व तजवीज करून दिली. जाण्यापूर्वी तिनें सर्व मालमत्ता आपला मुलगा व नातू यांच्यामध्यें वांटून दिली. एक वर्षभर कटक येथील जगन्नाथाच्या देवळांत झाडसारवण वगैरे देवसेवा करीत ती राहिली, व आपला वेळ भजनपूजनांत घालवून तेथेंच तिनें देह ठेविला, हें पूर्वी सांगण्यांत आलेंच आहे.

राममोहन कलकत्त्याला असतांना त्याच्या दुसऱ्या बायकोच्या आजाराची हकीकत त्याला कळली. त्यानें आपल्या वडील मुलाला

तिच्याकडे पाठविलें, व तिचा आजार वाढला, तर लागलीच आपणाला कळविण्याविषयीं त्याला सांगितलें. प्रेत जाळण्याची जी त्या वेळीं हिंदूंची पद्धत होती, ती राममोहनाला फार भयंकर वाटत असे. आपल्या आईच्या किंवा बायकोच्या तोंडामध्यें जळता विस्तव घालण्याची चाल अत्यंत अधमपणाची आहे, असें तो मानीत असे व तीबद्दल त्याला भारी वाईट वाटत असे. त्यानें आपल्या मुलाला अशी आज्ञा केली होती, कीं, यदाकदाचित् तुझी आई निवर्तली, तर तूं असा निंद्य प्रकार करूं नकोस!

नंतर ती लौकरच मरण पावली. आपल्या बायकोची मृत्युवार्ता ऐकून दुःखानें शोकाकुल होऊन हातपाय न गाळतां त्या वियोगामुळें त्यानें एक धडा घेतला, व बंगालीमध्यें त्या समयाला अनुसरून त्यानें एक गाणें रचलें. त्याचें मराठी भाषांतर एका कवीनें पुढील-प्रमाणें केलें आहेः—

**अंतकाळचा विचार करिं मनिं सावध होउनिरे मनुजा !**
**तरावया करिं साधन कांहीं आठविरे त्या नित्य अजा.**
**भेटाया तुज निजजन येतिल उमटेना ध्वनि पडेल वजा!**
**नयनिं देखुनी निजसुतदारा तळमळतां मनिं करिल इजा.**
**निराश होउनि सुहृद् मिळतिल करितिल हाहू आवाजा!**
**थंडगार तनु पडतां घेतिल नेत्रनाड हळुहळू रजा!**
**यास्तव सावध होउनि झडकरिं, धर्मपथानें चालत जा!**
**गर्वा सोडुनि सत्या अनुसर, उपदेशी मोहनराजा.**

श्रीमतीदेवी कृष्णनगर येथें सन १८२४ त मरण पावली. कांहीं दिवसांनीं राममोहन तेंथें गेला, व ज्या ठिकाणीं तिचा दहन-विधि झाला होता, त्या ठिकाणीं त्यानें तिच्या स्मरणार्थ एक समाधि बांधिली.

# द्वितीय परिच्छेद.

## समाजसेवा.

# द्वितीय परिच्छेद.

## प्रकरण पहिलें.

## सती.

राममोहनाच्या वेळीं हिंदु स्त्रिया सामाजिक गुलामगिरीमध्यें खितपत पडल्या होत्या. त्यांची स्थिति अत्यंत शोचनीय झालेली होती. समाजामध्यें त्यांचा दर्जा पुरुषांच्या मानानें अगदींच कमी लेखला जात असे. एकाद्या बाईचें चारित्र्य कितीहि पवित्र असो, तिच्यावर एकदां कां तिच्या नवऱ्याची इतराजी झाली, कीं, तिचे हाल विचारावयालाच नको! तिच्या घरामध्यें तिला सवत म्हणून दुसरी खात्रीनें यावयाचीच! तिच्या या दीनवाण्या स्थितीचें संरक्षण करण्याला कोणताहि कायदा अस्तित्वांत नव्हता. प्रत्येक विवाहित स्त्रीच्या हक्कावर केव्हां गदा बसेल, याचा मुळींच नियम नव्हता! त्यांत दुर्दैवानें जर का तिला वैधव्य प्राप्त झालें, तर मग तिच्या हालांना सीमाच नाहीं! आज सतीची चाल जरी बंद आहे, तरी बंगालमध्येंच कां, साऱ्या हिंदुस्तानामध्यें वर सांगितलेल्या स्थितीहून फारशी निराळी स्थिति नाहीं.

इ. स. १८२८ मध्यें नुसत्या कलकत्त्यामध्यें ३०९ स्त्रिया आपल्या नवऱ्यांबरोबर सती गेल्या. या एकाच गोष्टीवरून नवऱ्याच्या पश्चात् स्त्रियांची स्थिति काय होत असे, याची कल्पना होईल. स्त्रियांची ही हीनावस्था व मानखंडना पाहून राममोहनासारख्या कनवाळु

गृहस्थाच्या अंतःकरणामध्यें दया उत्पन्न झाली, व त्या दयेनें प्रेरित होऊन त्यानें त्यांची स्थिति सुधारण्याकरितां जे अटोकाट प्रयत्न केले, तितके प्रयत्न दुसऱ्या कोणीं केलेले ऐकिवांत नाहींत. स्त्रियांच्या कायदेशीर हक्कांचें रक्षण करण्याकरितां त्यांनां पुरुषांप्रमाणें शिक्षण मिळविण्याचा हक्क आहे, हें स्थापित करण्याकरितां त्यानें अतिशय परिश्रम केले. राममोहन प्रसिद्धीला येण्यापूर्वींच सती जाण्याच्या दुष्ट व घातुक चालीमुळें त्याच्या अंतःकरणांत मोठी दहशत बसली होती. तो इ. स. १८११ त रंगपूर येथें असतांना त्याचा भाऊ जगमोहन मरण पावला, व त्याची एक बायको त्याजबरोबर सती गेली. या बाईविषयीं राममोहनाच्या ठिकाणीं फार पूज्यबुद्धि होती.

" तूं सती जाऊं नकोस ! " अशी राममोहनानें तिची पुष्कळ विनवणी केली; पण व्यर्थ ! पुढें अग्नीच्या ज्वाळांनीं ती जेव्हां होरपळून गेली, तेव्हां किंकाळी फोडून चितेबाहेर येण्याचा तिनें प्रयत्न केला; पण तिच्या कर्मठ आप्तांनीं व भटांनीं बांबूच्या काठ्यांनीं तिला आंत ढकललें, व तिच्या आरोळ्या कोणाला ऐकूं येऊं नयेत म्हणून ढोलकीं वगैरे वाद्यें मोठमोठ्यानें वाजविलीं ! तिला वांचविण्याला राममोहन असमर्थ होता; पण त्याला तेव्हां या गोष्टीची अगदीं चीड येऊन त्याच्या मर्माला जबर धक्का बसला, व त्याच क्षणीं त्यानें शपथ घेतली, कीं, ही दुष्ट चाल बंद होईपर्यंत मी स्वस्थ म्हणून बसणार नाहीं !

गुलामांच्या झुंडींच्या झुंडी बाजारामध्यें विक्रीकरितां उभ्या असून त्यांच्या पाठींतून रक्ताच्या चिळकांड्या उडेपर्यंत त्यांनां चाबकाचे मार बसत आहेत, हा भयंकर देखावा पाहून ॲब्रहॅम लिंकनच्या हृदयाचें पाणी पाणी होऊन गुलामगिरी नष्ट होईपर्यंत स्वस्थ बसावयाचें नाहीं असा ज्याप्रमाणें त्यानें निश्चय करून तो शेवटाला नेला,

त्याचप्रमाणें,हा सतीचा हृदयद्रावक देखावा पाहून राममोहनानें निश्चय केला, व त्यानें तो आपल्या सर्व आयुष्यभर कायम ठेवून शेवटीं सिद्धिहि मिळविली. कलकत्त्याला आल्यानंतर ही सतीची दुष्ट चाल बंद करण्याकरितां त्यानें मोठी चळवळ सुरू केली व सती कायद्यानें बंद होईपर्यंत आपल्या प्रयत्नांत खंड म्हणून पडूं दिला नाहीं.

मध्यहिंदुस्तानाविषयीं लिहितांना सर जॉन मालकम म्हणतातः—

" आपल्या हिंदु रयतेचें मन न दुखवितां या चालीला आळा घालतां येईल तितका मुसलमान राज्यकर्त्यांनीं घालण्याचा प्रयत्न केला."

ही चाल बंद करण्याविषयीं सुप्रसिद्ध अकबर बादशहानें पुष्कळच परिश्रम घेतले. १८२४ च्या जानेवारीच्या एशिआटिक जर्नलमध्यें ह्मटलें आहे, कीं, " मुसलमानी राजांनीं ही चाल बंद करण्याचा प्रयत्न केला, व पेशवे तर स्वतः विधवांचीं मनें वळवून त्यांच्या उदरनिर्वाहाचीहि व्यवस्था लावून देत असत."

यूरोपिअन लोक हिंदुस्तानांत आले, तेव्हांपासून सतीची चाल बंद करण्याकरितां त्यांनीं कमीअधिक प्रमाणानें प्रयत्न केल्याचें दिसून येतें. फ्रेंच, डच, पोर्तुगीज या लोकांनींहि त्या दिशेनें मेहनत करून थोड्या अंशानें तरी या चालीला आळा घातला. या दुष्ट चालीमुळें इंग्रज गृहस्थांच्या दयार्द्र हृदयाला पाझर फुटत असे; पण इंग्रजी मुत्सद्दी मात्र प्रथमप्रथम या धार्मिक बाबतींत हात घालण्यापासून अलिप्त राहिले. कारण तसें केल्यास हिंदु धर्मामध्यें हात घातल्याचा आपणावर दोष येऊन त्यामुळें कंपनीच्या राज्याला कदाचित् धोका बसेल, असें त्यांनां वाटत असे. शेवटीं इंग्लंडमधील हॉऊस ऑफ कॉमन्स व ईस्ट इंडिया हॉऊसमध्यें परोपकारी गृहस्थांनीं खटपट करून

इ. स. १८२१ मध्यें एक ब्ल्यु बुक ( सरकारी पुस्तक ) तयार केलें. या पुस्तकावरून असें कळून येतें, कीं, राममोहन जन्मला त्या वेळीं म्हणजे १७७२ सालीं त्रिपत्ती येथील कॅप्टन टोमिन यानें सती जात असलेल्या एका बाईस चितेंतून ओढून एका सुरक्षित जागीं नेऊन ठेविलें. या त्याच्या कृत्यामुळें सर्व लोक खवळून जाऊन त्यांनीं त्याच्या-वर जोराचा हल्ला केला. ता. २८ जानेवारी १७८९ रोजीं शहाबाद येथील कलेक्टर एम्. एच्. ब्रूक यानें तेथील एका बाईला सती जाण्याला परवानगी दिली नाहीं, व त्या वेळचे गव्हरनर जनरल लॉर्ड कॉर्नवॉलीस यांना पुढील अर्थाचें पत्र लिहिलें:—

" कधींकधीं अशा गोष्टी घडून येतात, कीं, त्या वेळीं एकाद्या जिल्हाधिकाऱ्यानें कोणत्या प्रकारें वागावें याविषयीं सरकारी हुकूम संदिग्ध असतात. अशा वेळीं त्याच्या विवेकबुद्धीला योग्य वाटेल तेंच त्याला करणें भाग पडतें. अशाच प्रकारची एक हृदयद्रावक गोष्ट आज घडून आली आहे. एका हिंदु बाईच्या नातेवाईकांनीं तिला सती जाण्याला परवानगी मिळण्याबद्दल माझ्याकडे अर्ज केला ही चाल कलकत्ता व त्याच्या आसपासचा मुलूख येथें बंद केली आहे, व ती बंद करण्याला जीं कारणें पुढें करण्यांत आलीं, तींच कारणें कंपनीसरकारच्या इतर मुलुखांतहि लागू आहेत, असें वाटून मीं तो विनंतीअर्ज फेंटाळून लावला. हिंदु लोकांचे धर्मविधि आणि भोळ्या समजुती यांच्यामध्यें हात घालणें श्रेयस्कर नाहीं म्हणून त्या निमूटपणें मान्य करणें जरी भाग असलें, तरी पण अंगावर शहारे आणणारी जी गोष्ट तिला माझ्या ताब्यांतील मुलुखामध्यें माझ्यानें तशा प्रकारचा स्पष्ट कायदा असल्याशिवाय परवानगी देववत नाहीं! म्हणून मीं जें या बाबतींत केलें, तें सरकाराला पसंत आहे किंवा नाहीं, हें सरकारानें मेहेरबानीनें मला कळवावें."

यावर लार्ड कॉर्नवालिस यांचें असें उत्तर आलें, कीं, "तुह्मीं सती जाण्याला परवानगी दिली नाहीं, तें तुमचें आचरण सरकाराला पसंत आहे; पण तुह्मीं बलात्कारानें किंवा आपल्या अधिकाराच्या जोरावर या विधीला हरकत घ्यावी असा अधिकार तुह्माला देणें इष्ट आहे, असें सरकाराला वाटत नाहीं. कारण, या चालीला हिंदु शास्त्रांनीं परवानगी दिलेली आहे, व पूर्वीच्या येथील राज्य करणाऱ्या राजांनीं तिला हरकत घेतलेली नाहीं. तेव्हां सध्यांचें सरकार आतां ती चाल बंद करील, तर त्या चालीविषयीं हिंदूंची जास्तच आदरबुद्धि वाढून सतींची संख्या कमी होण्याऐवजीं जास्तीच होईल."

नंतर सोळा वर्षांनीं ह्मणजे १८०५च्या जानेवारीमध्यें अशाच प्रकारची दुसरी एक गोष्ट बिहारमध्यें घडून आली. तेथील कलेक्टर जे. आर. एल्फिन्स्टन यांनीं एका बारा वर्षांच्या विधवेला सती जाण्यास मनाई केली; परंतु अशा प्रकारची रानटी चाल बंद करण्या विषयीं एखादा कायदा अस्तित्वांत आहे कीं नाहीं, हें त्यांना माहीत नसल्यामुळें, आणि हिंदूंकडून दंगा होईल म्हणून, त्यां हें प्रकरण लॉर्ड वेलस्ली यांजकडे अभिप्राया[illegible] पाठविलें त्यांनीं ता. ५ फब्रुवारी १८०५ [illegible] निझामत अ[illegible]त यांच्याकडे एक पत्र पाठवून या चालीला [illegible]शास्त्रांची कित[illegible] अनुमति आहे, याची चौकशी करण्याची विनंती केली. [illegible] महिन्यांनीं त्या वरिष्ठ कोर्टानें एका मुख्य पंडिताचें या चालीविषयीं मत घेऊन त्यावर आपला अभिप्राय सादर करू[illegible] १८०५च्या जूनच्या ५ व्या तारखेला सतीच्या चालीला थोड्या अंशानें तरी आळा घालता येईल, अशा कांहीं गोष्टी सरकाराला सुचविल्या. परंतु ७ वर्षेपर्यंत त्या सूचनांचा कांहींएक विचार झाला नाहीं. ता. ३ आगस्ट १८१२ रोजीं बुंदेलखंडच्या कलेक्टरनें निझामत अदालत यांजकडे सतीच्या

चालीविषयीं आपण कोणत्या प्रकारचें धोरण ठेवावें, याविषयीं खुलासा विचारला असतां त्यानें तें पत्र लॉर्ड मोईरो–जे पुढें मॉर्किस ऑफ हेस्टिंग्ज झाले, त्यांच्याकडे पाठविलें. पुढें ८ महिन्यांनीं ह्मणजे १८१३ च्या एप्रिलच्या १७व्या तारखेला एक कायदा पास करण्यांत आला. त्यामध्यें असें ह्मटलें होतें, कीं, जी बाई सती जाण्याला तयार नाहीं, किंवा जिचें वय सोळा वर्षांच्या आंत आहे, किंवा जी गरोदर आहे, किंवा जिला अमली पदार्थ चारण्यांत आले आहेत, अशा बाईला सती जाण्याला कायद्यानें बंदी केली आहे. पुढें १८१५ च्या जानेवारी महिन्यांत त्या कायद्यामध्यें अशी दुरुस्ती करण्यांत आली, कीं, एकाद्या बाईस जर तान्हीं मुलें असलीं, तर तिलाहि सती जाऊं देऊं नये. पुढें १८१७ च्या जून महिन्यांत या कायद्यामध्यें आणखी कांहीं सुधारणा झाली.

वरील पत्रकावरून असें कळून येतें, कीं, एव्हांपासून मात्र ब्रिटिश अधिकारी या गोष्टीकडे विशेष आस्थेनें व कळकळीनें लक्ष्य देऊं लागले. १८१५ ते १८१८ पर्यंत एकंदर किती बाया सती गेल्या, त्याची नोंद सरकारानें ठेविली होती, ती पुढीलप्रमाणें:—

| प्रदेशाचें नांव. | | १८१५ | १८१६ | १८१७ | १८१८ | एकंदर. |
|---|---|---|---|---|---|---|
| कलकत्ता जिल्हा | | २५३ | २८९ | ४४२ | ५४४ | १५२८ |
| डाका | ,, | ३१ | २४ | ५२ | ५८ | १६५ |
| मुर्शिदाबाद | ,, | ११ | २१ | ४२ | ३० | १०४ |
| पाटणा | ,, | २० | २९ | ४९ | ५७ | १५५ |
| बनारस | ,, | ४८ | ६५ | १०३ | १३७ | ३५३ |
| बरेली | ,, | १५ | १३ | १९ | १३ | ६० |
| एकूण | | ३७८ | ४४१ | ७०७ | ८३९ | २३६५ |

सतीच्या चालीला सरकारानें आळा घालण्याविषयीं कांहीं नियम केल्यामुळेंच ही सतीची संख्या वाढत आहे असें समजून लॉर्ड हेस्टिंग्ज यांनीं १८१७ च्या सप्टेंबरमध्यें निझामत अदालत यांनीं केलेले कायदे कांहीं वेळ रद्द केले, व अधिक चौकशी करण्याविषयीं आपल्या अधिकाऱ्यांना हुकूम सोडले.

नंतर लोअर प्रॉव्हिन्सचे कामचलाऊ सुपरिंटेंडेंट ऑफ पोलिस डब्ल्यू युअर यांनीं आपल्या मुलुखांतील कलेक्टरकडून सहा प्रश्नांचीं उत्तरें मागविलीं. त्यांमध्यें हुगळीचे कलेक्टर एच्. ओकली यांनीं या बाबतींत फार आस्था दाखवून पुढील आशयाचीं उत्तरें पाठविलीं. ते ह्मणतातः—

"माझ्या जिल्ह्यामध्यें सतीचा आंकडा सर्वांत जास्त आहे, याचें कारण असें, कीं, कलकत्त्याचे व त्याच्या आसपासचे लोक इतर जिल्ह्यांतील लोकांपेक्षां जास्त बदफैली व दुराचारी आहेत. ते काली नामक देवतेचे उपासक आहेत. काली हें दैवत दारुबाजांचें व चोरांचें आहे, असें ह्मणण्याला हरकत नाहीं. इतर जिल्ह्यांतील मनुष्य कालीचा भक्त क्वचित् असतो. पण कलकत्त्यांतील बहुतेक लोक कालीचे भक्त आहेत. हे लोक सती जाणें हें धार्मिक कृत्य न समजतां एक प्रकारचा करमणुकीचा खेळ समजतात. या लोकांच्या दुराचारामुळेंच सतींची संख्या माझ्या जिल्यामध्यें जास्त आहे.

"पण या कारणाशिवाय सतींची संख्या जास्ती वाढण्याला दुसरींहि कारणें आहेत. १८१३च्या पूर्वी सतीच्या बाबतींत हात घालण्याला पोलिस अधिकाऱ्याला मुळींसुद्धां परवानगी नव्हती, व त्यावेळीं न्यायानें ह्मणा किंवा अन्यायानें ह्मणा, स्त्रिया सती जात असत; पण हिंदु लोकांना हें पक्कें माहित होतें, कीं, इंग्रजांना ही चाल मुळींच पसंत नाहीं, व होतां होईतों ही चाल बंद करण्याची ते आपली शिकस्त करतील.

पण आतां तो सर्व प्रकार बदललेला आहे. हा विधि शास्त्राप्रमाणें होत आहे कीं नाहीं हें पाहण्याचा, व होत नसल्यास बंद करण्याचा हुकूम पोलिसांनां सुटला आहे; ह्मणजे शास्त्रांची तरफदारीच करणारा हा सरकारचा कायदा आहे असें लोकांनां वाटून माझ्या जिल्ह्या-मधील सतींची संख्या सुमारें दुप्पट झाली आहे, यांत नवल नाहीं. ही चाल अजीबात बंद करणारा कायदा करण्याचें सरकारनें ठरविलें, तर त्याला सती जाणाऱ्या स्त्रियांच्या आप्तांकडून, त्यावरच उदरनिर्वाह चालविणाऱ्या भिक्षुकांकडून व दुराचारी लोकांकडून जोराचा विरोध उत्पन्न होईल, हें मला माहीत आहे. कसें झालें, तरी सरकारनें केलेला कायदा रद्द करावा."

वरील कलेक्टरचा अभिप्राय व अशाच अर्थाचे इतर कलेक्टरांचे अभिप्राय युअरसाहेबानें गव्हरनर जनरलकडे पाठवून दिले. तेव्हां त्यांनां निरुपायानें कायद्यामध्यें आणखी दुरुस्त्या करण्याचें बंद ठेवावें लागलें.

मध्यंतरीं सरकारचा अस्तित्वांत असलेला कायदा रद्द करण्या-विषयीं कलकत्त्याच्या रहिवाशांचा एक अर्ज सरकाराकडे गेला. त्या अर्जाला विरोध करणारा दुसरा अर्ज राममोहनानें व त्याच्या कांहीं मित्रांनीं १८१८ च्या आगस्ट महिन्यांत सरकाराकडे पाठविला. त्यामध्ये असें ह्मटलें होतें, कीं "स्त्रिया सती जातात त्या आपखुषीनें ह्मणून जात नाहींत. त्यांचीं मनें त्यांचे लोभी नातेवाईक स्वार्था-करितां वळवितात, हें आह्मीं स्वतः डोळ्यांनीं पाहिलें आहे. बिचाऱ्या स्त्रिया नवऱ्याच्या मृत्यूनें अगदीं होरपळून गेलेल्या असतात, व त्यांनां आपला जीव अगदीं नकोसा होतो, अशा वेळीं या कृत्याला त्यांची संमती ते बळेंच मिळवितात. एखाद्या स्त्रीला चितेच्या ज्वाळा सहन न होऊन ती बाहेर येत असतांना तिचे ते दुष्ट नातेवाईक तिला बांबूच्या

काठीनें आंत लोटतात. भूतदयेच्या दृष्टीनें हें कृत्य अगदींच निंद्य होय, व कोणत्याहि धर्मशास्त्राप्रमाणें हा खूनच होय !"

१८१८ नोवेंबरच्या ३० व्या तारखेला राममोहनानें A Conference between an advocate and an opponent of the practice of burning widows alive—सती जावें असें प्रतिपादन करणारा, आणि सती जाऊं नये असें मत असलेला, अशा दोन पक्षांमधील संवादासंबंधीं एक पुस्तक प्रसिद्ध केलें. १८२० च्या फेब्रुवारीच्या २० तारखेला त्याच नांवानें दुसरें एक संवादात्मक पुस्तक प्रसिद्ध केलें.

इंग्रजी शिक्षणामुळें व राममोहनासारख्यांच्या प्रयत्नांमुळें ही चाल आपोआप नाहींशी होईल, अशी समजूत करून घेऊन सरकारी अधिकारी कांहीं वेळ गप्प बसले; पण सन १८२५मध्यें सतीची संख्या जी पूर्वीच्या वर्षी ५७२ होती ती ६३९ झाली; ह्मणजे शेंकडा १० नें वाढ झालेली पाहून १८२६ च्या नोवेंबरमध्यें निझामत अदालत यांनीं या गोष्टीची पुनः चौकशी चालविली. स्मिथ नांवाच्या जज्जानें ती एकदम कायमची बंद करावी असा आग्रह धरिला, व रॉस नांवाच्या दुसऱ्या जज्जानें त्याला आपलें जोराचें अनुमोदन दिलें, आणि देशी सैन्यामध्यें त्यायोगें कोणत्याहि रीतीनें असंतोष उत्पन्न होणार नाहीं, असें प्रतिपादिलें. हा प्रश्न काउन्सिलपुढें आला, तेव्हां व्हाइस प्रेसिडेंट बेली यांनीं तारीख १३ जानेवारी १८२७रोजीं अशी शिफारस केली, कीं, दिल्ली, सागर, नरमडा, कुमान व रंगपूर या जिल्ह्यांमधील सतीची चाल कायद्यानें बंद करावी. १८२७ च्या मार्चच्या १ल्या तारखेला व्हाइस प्रेसिडेंट कोंबरमिअर यांनीं बेलीसाहेबाचें ह्मणणें मान्य करावें अशी आग्रहाची विनंति केली. पण लॉर्ड आमहर्स्ट यांनीं मार्चच्या १८ व्या तारखेला ती सूचना नापसंत केली.

" वर जे जिल्हे सांगण्यांत आले आहेत, त्यांमध्यें सती जाण्याचा प्रघात नाहीं, व त्यामुळें अशा प्रकारच्या कायद्यानें कांहींहि फायदा होण्याचा संभव नाहीं. ही चाल नष्ट होण्याला इंग्रजी शिक्षणाचा प्रसारच झाला पाहिजे. करितां आणखी कांहीं वर्षे वाट पाहणेंच श्रेयस्कर होईल, " असे त्यांनीं आपल्या ठरावामध्यें उद्गार काढले. पुनः जज्जांनीं व बेलीसाहेबानें मागणी केली; पण सतीच्या चालीच्या प्रतिकारार्थ कांहींएक न करितां लॉर्ड आमहर्स्ट विलायतेला निघून गेले.

त्यांच्या मागून लॉर्ड वुइलियम बेंटिंक आले. ते फार दृढ निश्चयाचे होते. एकादी गोष्ट करणें जरूर आहे असें त्यांना एकदा वाटल्यास ते ती केल्याशिवाय राहत नसत. ते जरी फार विद्वान् नव्हते, तरी त्यांना व्यवहारज्ञान फार चांगलें होतें. कांहीं वर्षे वाट पाहण्याला ते तयार नव्हते. त्यांनीं एकामागूनएक प्रयत्न चालू केले. प्रसंग पडल्यास सैन्याचा उपयोग करावा लागेल, हें ते जाणून होते. म्हणून सैन्याकडून आपणाला कितपत मदत होईल हें प्रथम त्यांनीं अजमावून पाहिलें. त्यांनीं एकंदर ४९ फलटणींतील अम्मलदारांकडे चौकशी केली, तेव्हां ४४ जणांनीं सतीची चाल बंद केली असतां सैन्यामध्यें मुळींच असंतोष उत्पन्न होणार नाहीं, असें स्पष्ट म्हटलें. सन १८२९ मध्यें निझामत अदालतमधील पांचहि जज्जांनीं ही चाल अजीबात एकदम बंद करावी, असें आपलें मत दिलें.

पोलिस सुपरिंटेंडेंटनीहि आपलें मत तसेंच दिलें. देशी लोकांचीं मनें मात्र अजून तयार झालेलीं नव्हतीं. तीं तयार व्हावीं, म्हणून गव्हरनर जनरलला राममोहनाची मदत अवश्य होती. राममोहनानें सारखी चळवळ सुरू करून हिंदु शास्त्रांमध्यें सतीच्या चालीला आधार नाहीं, हें दाखविण्याकरितां त्यांतील वचनें देऊन पुष्कळ लहानलहान पुस्तकें प्रसिद्ध केलीं व त्यांमध्यें सतीच्या चालीचा त्यानें

जोरानें निषेध केला. पुरावे देऊन त्यानें असें सिद्ध करून दाखविलें, कीं, विधवा आपल्या नवऱ्याच्या चितेवर जाळून घेण्याला तयार होतात, त्या नेहमीं स्वतःच्या खुषीनें होतात असें नाहीं. तर त्यांचे आपमतलबी आप्त त्यांना तसें करण्याला भाग पाडतात, हें होय. राममोहनाच्या या लिहिण्यामुळें लॉर्ड वुइलियम बेंटिंक यांचें या विषयाकडे लक्ष्य लागलें. या विषयावर राममोहनाशीं बोलण्याची त्यांना इच्छा होऊन आपल्या ए. डी. कांगबरोबर राममोहनाला येण्याविषयीं त्यांनीं निरोप पाठविला. त्यानें तो निरोप राममोहनाला कळविला;पण एवढ्या मोठ्या राजकर्त्यांच्या दरबारीं जाण्याची आपली मुळींच इच्छा नाहीं, असा राममोहनानें उलट निरोप धाडला !

असा विचित्र जबाब मिळतांच "राममोहनाकडे जाऊन तूं त्याला काय सांगितलेंस?" असें गव्हरनर जनरलनें आपल्या ए. डी. कांगला विचारलें.

" हिंदुस्तानचे गव्हरनर जनरल आपणाला भेटीला बोलावतात, असा मीं निरोप सांगितला," असें त्यानें कळविलें.

त्यावर " गव्हरनर जनरल नव्हे, तर मिस्टर वुइलियम बेंटिंक आपणांला भेटीला बोलावतात, असें पुनः जाऊन सांग," असें त्यानें ए. डी. कांगला पुनः सांगितलें.

तो निरोप ऐकून राममोहनानें ती विनंती मान्य करून तो भेटीला गेला. लॉर्ड बेंटिंक हे स्वतःच राममोहनाच्या घरीं आले होते, असेंहि कित्येकांचें ह्मणणें आहे. असो.

आपल्या नवऱ्याच्या चितेबरोबर स्वतःला जाळून घेण्याला विधवांच्या इच्छेविरुद्ध त्यांचे आप्तइष्ट त्यांचें मन वळवीत असत, असा आक्षेप घेणें हें कदाचित् कोणाला चमत्कारिक वाटेल; परंतु असें करण्याला काय कारणें आहेत, तीं स्पष्ट दाखवून राममोहनानें सर-

कारची खात्री केली. पुष्कळ वेळां असें घडतें, कीं, विधवा जीवंत असेपर्यंत तिच्या नवऱ्याच्या आपस्वार्थी आप्तांना मृताच्या मालमत्तेचा ताबा मिळत नसतो.ह्मणून विधवांचें मरण त्यांच्या स्वार्थाला इष्ट असतें. त्यामुळें ते ही गोष्ट साध्य करून घेण्याकरितां पुष्कळ क्लृप्त्या लढवीत. कांहींजण लोभी ब्राह्मणांनां धन देऊन त्यांच्याकडून विधवांनां असें सांगवीत, कीं, नवऱ्याच्या पाठीमागें जीवंत राहणें ह्मणजे नरकांत जाणें होय. नवऱ्याबरोबर सती जाण्यांतच जीविताचें सार्थक आहे, व त्यायोगें या जगामध्यें कीर्ति होऊन दुसऱ्या जगामध्यें खरें स्वर्गसुख अनुभवावयाला मिळतें. दुसरे कित्येकजण, विधवा ज्या वेळीं दुःखसागरांत बुडून गेलेल्या असत, नवऱ्याच्या मरणानें त्यांच्या दुःखाची परमावधि होत असे, स्वतःचें जीवित त्यांनां ओझ्यादाखल वाटून जीव द्यावा असें वाटे, त्या वेळीं त्यांची अनुमती मिळवीत असत. दुसरीं अशींच कित्येक उदाहरणें राममोहनानें सरकाराला दाखवून दिलीं, कीं, एकाद्या विधवेच्या पोटांत कांहीं अन्न नसतांना तिला भांग पाजीत व त्यामुळें तिला कैफ येऊन बेशुद्ध स्थितींत असतांना जीवंत जाळून घेण्याची त्या आपली इच्छा प्रदर्शित करीत.

सतीची चाल बंद करण्याविषयीं सरकारची व राममोहनाची खटपट चालू असतां कर्मठ हिंदूंनीं आपल्या \'**समाचार चंद्रिका**' नामक पत्रामध्यें अशा कायद्याविरुद्ध ओरडाओरड चालविली; पण '**संवादकौमुदी**' व '**वंगदूत**' या पत्रांमध्यें लेख लिहून राममोहनानें ती ओरड किती शुष्क आहे, हें लोकांच्या निदर्शनास आणून दिलें.

एवढेंच करून राममोहन थांबला नाहीं. तर तो व त्याचे मित्र यांनीं Vigilence Society नामक एक संस्था स्थापन केली.

कलकत्त्यामध्यें व आजूबाजूला एकादी स्त्री सती जात आहे, असें त्यांनां समजलें, कीं ते त्या ठिकाणीं जात व त्यांच्यावर कांहीं जुलूम होत आहे कीं काय, याची बारकाईनें चौकशी करीत.

राममोहनानें जीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं, व लॉर्ड बेंटिंक यांच्यापुढें जीं विधानें केलीं, त्यांवरून ही दुष्ट चाल बंद करण्याची सरकाराला आवश्यकता वाटून तारीख ४ डिसेंबर १८२९ त सतीची चाल बंद करण्याविषयींचा कायदा पास करण्यांत आला; त्यांत असें ह्मटलें होतें, कीं "ही चाल बेकायदेशीर आहे, व जे कोणी एकाद्या विधवेला—मग तिची इच्छा असो किंवा नसो सती जाण्याला मदत करतील ते न्यायाधीश ठरवील त्या शिक्षेला पात्र होतील, आणि जे कोणी बळजबरीनें तिला सती जाण्याला लावतील, त्यांनां कदाचित् फांशीची देखील शिक्षा सांगण्यांत येईल."

राममोहनानें १८२९ सालापर्यंत, ह्मणजे सतीची चाल बंद करणारा कायदा पास होईपर्यंत, अहोरात्र परिश्रम केले. हा कायदा पास झाल्यानंतरहि कांहीं दिवस त्याला बरेच श्रम करावे लागले. त्याच्या शत्रूंनीं १८३० च्या जानेवारीच्या १४ व्या तारखेला एक सभा भरवून, सतीची चाल बंद करणें ह्मणजे हिंदु धर्मामध्यें हात घालणें आहे, या सबबीवर ८०० जणांच्या सह्यांनिशीं लॉर्ड वुइलियम बेंटिंककडे अर्ज पाठविला. हिंदुशास्त्रामध्यें सतीच्या चालीला आधार नाहीं, हें राममोहनाचें मत जें सरकारालाहि पसंत पडलें होतें, तें खोटें ठरविण्याचा या अर्जाचा मुख्य हेतु होता. त्या अर्जामध्यें असें ह्मटलें होतें, कीं "राममोहनासारख्या गृहस्थांनां त्यांच्या पूर्वजांच्या धर्माची मुळींच चाड नाहीं. यूरोपिअनांबरोबर खाण्यापिण्याचा त्यांनां मुळींच विधिनिषेध नाहीं. तेव्हां त्यांच्यासारख्या लोकांवर सरकारानें विश्वास ठेवणें बरोबर नाहीं.

आमच्या धर्मशास्त्रांचा अर्थ करणें, या वादग्रस्त विषयांवर बोलण्याचा अधिकार पंडितांचाच आहे. तेव्हां त्यांचीं मतें घ्यावीं. ज्यांनां आपल्या पूर्वजांविषयीं बिलकूल अभिमान वाटत नाहीं, अशांचीं मतें घेणें बरोबर नाहीं. ”

असें ह्मणून सती जाणें ही धर्माची बाबत आहे, अशा अर्थाचें १२० पंडितांच्या साह्यानिशीचें एक पुरवणीपत्र त्या अर्जाला जोडलें होतें.

तशाच प्रकारचा दुसरा एक अर्ज ३४६ लोक आणि २८ पंडित यांच्या सह्यांनिशीं गव्हरनर जनरलकडे गेला; पण राममोहन त्याच पाळतीवर होता. नंतर दोनच दिवसांनीं ह्मणजे १८३० च्या जानेवारीच्या १६ व्या तारखेला कलकत्त्याच्या ३०० लोकांकडून व ८०० ख्रिश्चन लोकांकडून सरकारचें अभिनंदन करणारा दुसरा अर्ज राममोहनाच्या खटपटीनें पाठविण्यांत आला, व गव्हरनर जनरलचें अभिनंदन करून त्यांनां एक मानपत्र देण्यांत आलें. त्या मानपत्राचा मसुदा राममोहनानेंच तयार केला होता. त्याचा सारांश पुढील प्रमाणें:—

“ स्त्रीहत्या करणारे व आत्महत्येला प्रोत्साहन देणारे ह्मणून जो कलंक आमच्या नांवाला आजपर्यंत लागलेला होता, तो आपल्या उदार बुद्धीमुळें नाहींसा झाला आहे, व स्त्रीच्या जीवित्वाचें रक्षण करणारा कायदा आपण मोठ्या कृतज्ञताबुद्धीनें पास केला आहे, त्याबद्दल आह्मी कलकत्त्याचे रहिवाशी आपले मनःपूर्वक व मोठ्या, आदरभावानें आभार मानतों. आपल्या पश्चात् आपल्या विधवेनें इतर मनुष्याशीं संबंध ठेवतां कामा नये, अशी असूया मनांत धरून एतद्देशीय

राजांनीं स्त्रियांच्या हक्कांची पायमल्ली केली, व त्यांचें संरक्षण करणें हें जें त्यांचें कर्तव्यकर्म त्याकडे कानाडोळा करून नवऱ्याच्या पश्चात् स्त्रीनें सती जावें, अशा प्रकारची जुलमी पद्धत धर्माच्या नांवाखालीं अमलांत आणिली. विधवेचा अशा प्रकारें नाश होणें तिच्या लोभी व दुष्ट नातेवाईकांनां इष्टच आहे; पण या कृत्याला उपनिषदें, वेद, भगवद्गीता किंवा मनू यांची परवानगी नाहीं. पण दुसरे हलक्या दर्जाचे जे ग्रंथ त्यांतीलच वचनें हे लोभी नातेवाईक पुढें करितात, व विधवेच्या पातिव्रत्याविषयींच्या आपल्या संशयी स्वभावावर पांघरूण घालण्याचा प्रयत्न करितात. नवरा मेल्याबरोबर स्त्री दुःखानें जेव्हां अगदीं होरपळून गेलेली असते, व तिला सर्वत्र निराशा वाटूं लागते, अशा वेळीं तिचें मत घेऊन तिला तिच्या नवऱ्याच्या चितेला जखडून बांधतात, व तिनें चितेबाहेर येऊं नये ह्मणून मोठमोठालीं लांकडें तिच्यावर ठेवितात. हा त्यांच्यावर होत असलेला जुलूम सरकारानें नाहींसा केला, व सती जाण्याविषयींचीं जीं लुंगीसुंगी शास्त्रांतील वचनें तीं धाब्यावर बसविलीं, हें आह्मी आमचें भाग्य समजतों, व आह्मां स्त्रीपुरुषांचीं जीवितें ईश्वरी योजनेनेंच इंग्रज सरकारच्या हातीं गेलीं ह्मणून आह्मी त्याचे धन्यवाद गातों. अग्नीच्या ज्वाळा सहन न होऊन चितेबाहेर येऊन पळून गेलेल्या, किंवा तो भयानक देखावा पाहून आपला निश्चय सोडून दिलेल्या विधवांचीं उदाहरणें पुष्कळ आहेत, व अशींहि कांहीं उदाहरणें आहेत, कीं, त्यांचें करणें अनुचित आहे हें विधवांनां दाखवून

दिल्याबरोबर व त्यांनां मदत करण्याचें आश्वासन दिल्याबरोबर सती जाण्याचा त्यांचा निश्चय ढळलेला आहे अशा प्रकारची निंद्य चाल ब्रिटिश राजतत्त्वाच्या विरुद्ध आहे व ती त्यांच्या नांवाला काळीमा आणणारी आहे, ही गोष्ट लक्ष्यांत घेऊन स्त्रियांच्या हक्काचें रक्षण करणारा कायदा आपण केल्यामुळें आपण न्यायाला व भूतदयेला अनुसरून आपलें कर्तव्यकर्म बजाविलें आहे. या कायद्यामुळें आजपर्यंत स्त्रियांवर होत असलेला अनाचार बंद होईल, व शास्त्रांतील या विषयांवरील जीं उत्तमोत्तम वचनें मागें पडलीं होतीं, तीं उजागरीला येतील. न्यायाधिकारी हा कायदा सर्वत्र मोठ्या जारीनें अमलांत आणतील अशी आह्मांला आशा आहे. आपला मोठा हुद्दा लक्ष्यांत घेतां, आपल्या बहुमोल कामगिरीच्या मानानें कोणतेंहि पारितोषक अपुरें होणार आहे. तथापि आपल्या कृतज्ञतेबद्दल आह्मांला आंतून जी स्फूर्ति होत आहे, ती आह्मीं व्यक्त न केली तर आह्मी कृतघ्न व दोषी ठरूं, ह्मणून आपल्या या सतत टिकणाऱ्या अनुग्रहाबद्दल आह्मी आपल्याला हें जाहिर मानपत्र देत आहों. आमची आपल्याविषयींची कृतज्ञताबुद्धि थोड्या अंशानें तरी आह्मांला व्यक्त करितां येईल, असें आह्मांला वाटत नाहीं. या मानपत्राला आणखी ज्या पुष्कळांची संमति आहे, पण अज्ञानानें किंवा दुरभिमानानें जे आह्मांला येऊन मिळाले नाहींत, त्यांनां आपण क्षमा करून या मानपत्राचा स्वीकार करावा."

राममोहनच्या या कृत्यामुळें हिंदु समाजांत जिकडेतिकडे फार खळबळ उडून राहिली. सर्व बंगाल देश चवताळून गेला. दुसऱ्या

दिवशीं ह्मणजें १७ व्या तारखेला त्याच्या शत्रूंनीं त्या वेळच्या सोभाबाजार राजघराण्याचा पुढारी राजा राधा कांतदेव, के. सी. एस्. आय्, शब्दकल्पद्रुम या संस्कृत कोशाचा कर्ता, यांच्या अध्यक्षतेखालीं एक जाहीर सभा भरवून गव्हरनर जनरलनें तो कायदा रद्द करण्याचें नाकारलें ह्मणून इंग्लंडमधील अधिकाऱ्याकडे अर्ज करण्याचा ठराव पास केला. राममोहनाचा पाडाव करण्याकरितां जागच्याजागीं ११,२६० रुपये जमा झाले. त्याच वेळीं त्यांनीं धर्मसभा नांवाची संस्था स्थापन केली. मोठमोठे श्रीमान् व वजनदार जमीनदार या संस्थेचे सभासद झाले. या सभेनें पहिल्यानेंच एक मोठा पराक्रम केला, तो हा, कीं, सती जाण्याची चाल बंद करूं नये ह्मणून तिनें इंग्लंडच्या राजाला एक अर्ज पाठविला, व नंतर कोणी मनुष्य स्वधर्माचा त्याग करील, तर त्याच्या वडिलांच्या मालमत्तेवर त्याचा वारसा चालूं नये, असा कायदा असावा ह्मणून दुसरा एक अर्ज केला. मूर्तिपूजेचें ब्राह्मसभेपासून हरएकप्रकारें रक्षण करण्याचाहि उद्देश या धर्मसभेचा होता. या प्रतिकारामुळें राममोहनाचें धैर्य मुळींसुद्धां खचलें नाहीं. त्यानें लागलीच "The abstract of the arguments regarding the burning of widows considered as a religious right— सती जाणें हें धर्मसंमत आहे कीं काय याविषयीं दोनशब्द" नांवाचें पत्रक प्रसिद्ध केलें. त्यामध्यें तो ह्मणतोः—

" सतीच्या चालीचा पुरस्कार करणारे व तिचें खंडन करणारे या दोघांनींहि इतकीं पत्रें, पत्रकें आणि लेख स्वमतप्रतिपादनार्थ लिहिलीं आहेत, कीं, त्या चालीविषयीं खरी कल्पना साधारण मनुष्याला येणें कठिण आहे. ती व्हावी ह्मणून आजपर्यंत दोघांनींहि जीं विधानें केलीं आहेत, त्यांचा गोषवारा अगदीं थोडक्यांत या पत्रकामध्यें दिलेला आहे.

पहिला मुद्दा असा आहे, कीं, हिंदुशास्त्रामध्यें विधवांनीं आपल्या नवऱ्याच्या चितेमध्यें जाळून घेतलेंच पाहिजे, असा निर्बंध घातलेला आहे कीं काय ? अशा प्रकारची शास्त्राची आज्ञा नाहीं, असें सतीच्या चालीचा एकादा कट्टा कैवारीहि कबूल करील व ही गोष्ट विधवांच्या मर्जीवर आहे असें ह्मणेल. मनू ह्मणतोः—

**आसीतामरणात् क्षान्ता नियता ब्रह्मचारिणी ।**
**यो धर्म एकपत्नीनां कांक्षन्ती तमनुत्तमम् ॥**

ह्मणजे, विधवेनें मरेपर्यंत सर्व प्रकारच्या संकटांमध्यें क्षमा धारण करावी, नेहमीं ब्रह्मचर्यानें वागावें, अति उत्तम असा जो एकपत्नी धर्म त्याला अनुसरून वागावें.

याज्ञवल्क्याचेंहि असेंच मत आहेः—

**पितृमातृसुतभ्रातृश्वश्रूश्वशुरमातुलैः ।**
**हीना न स्यात् विना भर्त्रा गर्हणीयान्यथा भवेत् ॥**

ह्मणजे, विधवेनें आपला बाप, आई, मुलगा, भाऊ, सासू, सासरा किंवा मामा यांच्या देखरेखीखालीं रहावें. मग गतभर्तृका आहे ह्मणून कोणीहि तिच्यावर दोषारोपण करणार नाहीं.

दुसरी गोष्ट अशी, कीं, सतीच्या चालीच्या कैवाऱ्यांनीं सती जाणें हें विधवांचें कर्तव्य आहे, व त्यांनीं तें बजाविलेंच पाहिजे असें ह्मणण्याचें धाडस केल्यास, ज्या विधवा सती न जातां नीतीनें आपलें आयुष्य घालवीत आहेत त्यांच्या शीलाविषयीं संशय घेतल्यासारखें होईल.

नवऱ्याच्या पश्चात् सती जाणें, किंवा नीतीनें आयुष्यक्रमण करणें ही गोष्ट विधवेच्या मर्जीवर आहे, असें ठरल्यावर, दुसरा मुद्दा असा उत्पन्न होतो, कीं, दोनहि गोष्टी सारख्याच पुण्यकारक आहेत, किंवा एक दुसरीपेक्षां श्रेयस्कर आहे ? वेदामध्यें ह्मटलें आहेः—

**तस्मादुह पुरायुषः स्वकामी प्रेयात् ।**

म्हणजे, स्वर्गसुख मिळेल म्हणून जीविताचा नाश करूं नये.

विधवांनीं सदाचारानें वागावें असें मनू व याज्ञवल्क्य यांचें मत वर दिलेंच आहे; पण विधवांनीं सती जावें असें अंगिराचें मत आहे. तो म्हणतोः—

**मृते भर्तरि या नारी समारोहेद्‌हुताशनम् ।**
**सारुन्धतीसमाचारा स्वर्गलोके महीयते ॥**

म्हणजे, जी स्त्री नवऱ्याच्या मृत्यूनंतर त्याच्या चितेवर चढून स्वतःला जाळून घेते, तिची कीर्ति अरुंधतीप्रमाणें स्वर्गामध्यें होते.

व्यासाचेंहि तसेंच म्हणणें आहेः—

**पतिव्रता सप्रदीप्तं प्रविवेश हुताशनम् ।**
**तत्र चित्राङ्गदधरं भर्तारं सान्वपद्यत ॥**

म्हणजे, आपल्या नवऱ्याच्या ज्वाळांमध्यें शिरून एक कबुतरी स्वर्गलोकामध्यें गेली, व तेथें तिला आपल्या नवऱ्याचा सहवास घडला.

**तिस्रः कोट्यर्धकोटीच यानि लोमानि मानवे ।**
**तावन्त्यद्वानि सा स्वर्गे भर्तारं यानुगच्छति ॥**

म्हणजे, जी स्त्री आपल्या नवऱ्यासमवेत परलोकाला जाते, तिची कीर्ति मनुष्याच्या शरीरावर जितके केंस आहेत, तितकीं वर्षें किंवा साडेतीन कोटी वर्षें टिकते.

विष्णूस्मृतीचें मत पुढीलप्रमाणें आहेः—

**मृते भर्तरि ब्रह्मचर्यं तदन्वारोहणं वा ।**

म्हणजे, पतीच्या मरणानंतर स्त्रीनें सन्यस्त वृत्तीनें रहावें, किंवा पतीसह गमन करावें.

हारिताचें मत अंगिराप्रमाणें आहे. अंगिर, हारित व दुसरे म्हणतात कीं, पुढें विषयसुखाची प्राप्ति व्हावी म्हणून स्त्रीनें सती जावें; परंतु भगवद्गीतेनें या गोष्टीचा तीव्रतेनें निषेध केलेला आहेः—

**यामिमां पुष्पितां वाचं प्रवदन्त्यविपश्चितः ।**
**वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः ॥**
**कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम् ।**
**क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति ॥**
**भोगैश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम् ।**
**व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते ॥**

ह्मणजे, अर्जुना! वेदांविषयीं पोकळ बडबड करण्यांत रमलेले, दुसरें कांहींच नाहीं असा वाद घेणारे, कामना धरून कर्मे करणारे, स्वार्थभोग हेंच सर्वस्व मानणारे असे जे मूढ लोक, ते ऐश्वर्यभोगांकडेच लक्ष्य ठेवितात, आणि ज्या कर्मांचें फळ पुनर्जन्म आहे असलीं, अमकीं तमकीं अनेक कर्मे करावीं असें प्रफुल्लित भाषण करितात! पण हें त्यांचें भाषण भोग आणि ऐश्वर्य यांच्यासाठीं आसक्त झालेल्या लोकांचें चित्त हरण करितें. यामुळें अंतःकरणाची एकाग्रता करण्याला दृढ प्रवृत्तीची बुद्धि त्यांनां होत नाहीं.

**ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति ।**
**एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभन्ते ॥**

ह्मणजे, ते त्या विशाल स्वर्गलोकांचा उपभोग घेऊन पुण्य संपलें ह्मणजे पुनः मृत्युलोकीं प्रवेश करितात. याप्रमाणें या **त्रयी** धर्माला अनुसरून वागणारे पण भोगांची इच्छा धरून कर्मे करणारे जे त्यांनां येरझारा प्राप्त होतात. मनूचेंहि असेंच मत आहे.

**इह चामुत्र वा काम्यं प्रवृत्तं कर्म कीर्त्यते ।**
**निष्कामं ज्ञानपूर्वं तु निवृत्तमुपदिश्यते ॥**
**प्रवृत्तं कर्म संसेव्य देवानामेति सार्ष्टिताम् ।**
**निवृत्तं सेवमानस्तु भूतान्यत्येति पञ्च वै ॥**

ह्मणजे, इहलोकींच्या किंवा परलोकींच्या सुखाकारितां जें जें कर्म केलें जातें, त्याला प्रवृत्तिपूर्वक कर्म ह्मणतात. त्यायोगें तात्पुरतें स्वर्गसुख लाभतें; पण जीं कर्में ईश्वरविषयक ज्ञानानें केलीं जातात, त्यांनां निवृत्तिपूर्वक कर्में असें ह्मणतात, व त्यामुळें मनुष्य या देहापासून मुक्त होऊन त्याला शाश्वतचें सुख मिळतें.

एका बाजूला मनू, याज्ञवल्क्य, भगवद्गीता आणि दुसऱ्या बाजूला अंगिर, हारित व व्यास वगैरेंच्या मतांचा विचार करून मिताक्षरकारानें आपलें असें मत दिलें आहे, कीं:—

**अतश्च मोक्षमनिच्छन्त्या अनित्याल्पसुखरूपस्वर्गार्थिन्याः सहमरणानुमरणयोरधिकार इतरकाम्यानुष्ठानवत् ॥**

ह्मणजे, ज्या विधवेला शाश्वतच्या सुखाची इच्छा नसून नश्वर सुखाची इच्छा आहे, तिनें आपल्या पतीसह गमन करावें.

स्मार्त, रघुनंदन याचें असें मत आहे, कीं, सती जाणें ह्मणजे पुढील सुखाकारितां होय. तेव्हां

**पंडितेनापि मूर्खः काम्ये कर्माणि न प्रवर्तयितव्यः।**

ह्मणजे, पुढें सुख प्राप्त होईल अशा प्रकारचें वचन देणारे जे विधि ते करण्याला अज्ञानी लोकांचें मन जाणत्यांनीं वळविण्याचा प्रयत्न करूं नये.

तिसरा मुद्दा असा, कीं, हारित वगैरेंच्या मतांबरहुकूम ही चाल आजपर्यंत पाळली गेली आहे किंवा नाहीं? यांचीं मतें अशीं आहेत, कीं, विधवेनें वाटल्यास पतिसहगमन करावें, व तो भयंकर देखावा पाहून दहशत बसली, किंवा ज्वाळांनीं तिचें अंग होरपळून जाऊन ती चितेबाहेर आली, व पुनः चितेमध्यें जाण्याची तिची इच्छा नसली, तर तिला तसें करूं द्यावें; व प्रायश्चित्त देऊन पावन करून घ्यावें. या मताप्रमाणेंच विधवा आपखुषीनेंच आजपर्यंत सती गेल्या आहेत, असें कोणालाहि ह्मणतां यावयाचें नाहीं."

सतीचा कायदा रद्द करण्याविषयीं कलकत्त्याच्या रहिवाशांनीं पार्लमेंटकडे पाठविलेल्या अर्जाला विरोध करणारा दुसरा अर्ज राममोहनानें इतर गृहस्थांच्या सह्यांनिशीं हाउस ऑफ कॉमन्सकडे पाठविला. त्यामध्यें असें ह्मटलें होतें कीं:—

"गव्हरनर जनरल लार्ड वुइलियम बेंटिंक यांनीं ही रानटी व दुष्ट चाल बंद केल्यामुळें हिंदुस्तानचें अतोनात कल्याण झालें आहे, व त्यामुळें हिंदुलोक त्यांनां दुवा देत आहेत. त्यांनीं केलेल्या कायद्याबद्दल पुष्कळांनीं त्यांचे आभार मानले आहेत, व एक जाहिरसभा भरवून त्यांचें अभिनंद केलें आहे. हा कायदा पास होऊन आज जवळजवळ एक वर्ष होत आलें, तथापि बहुजनसमाज मुग्धच राहिला आहे; परंतु हिंदुरूढीचा अभिमान मानणाऱ्या बऱ्याचशा लोकांनीं हा कायदा रद्द करण्याविषयीं आपणाकडे अर्ज केला आहे, असें आह्मी ऐकतों. त्यांच्या अर्जांत नमुद केलेले विचार सर्व देशांचें नव्हत, हें आह्मी नम्रतापूर्वक आपणांला कळवितों व अशी प्रार्थना करितों, कीं, हिंदुस्तानसरकारानें केलेला कायदा कायम करावा. ही चाल पुनः अस्तित्वांत आणल्यामुळें इंग्रजसरकारची इभ्रत व दानत कमी होणार आहे."

एवढेंच करून राममोहन स्वस्थ राहिला नाहीं. तर पार्लमेंटमध्यें हा कायदा बदलूं नये, अशाविषयीं खटपट करण्याकरितां तो इंग्लंडला गेला. अखेर ही निर्दय व राक्षसरूपी मनुष्यजातीला लांछन आणणारी सतीची चाल सन १८३३ पासून कायमची बंद पडली, व त्यायोगानें हिंदुस्तानांतील सामाजिक सुधारणेचा पाया सुरक्षित झाला. भूतदयेचा व सदसद्विवेकबुद्धिचा अखेर जय हा झालाच!

शतकेंची 'शतकें हिंदुलोक अंधश्रद्धा व दुष्ट रूढी यांच्या शृंखलेनें जखडून गेले होते, ते आतां मुक्त झाले. हजारों सत्वशील, स्वार्थत्यागी, सुशील अशा स्त्रियांचे खून बंद झाले. लक्षावधि स्त्रिया अकालीं काळाच्या मुखांत पडत असत तें सर्व बंद झालें. अधाशी, आळशी अशा भिक्षुकांच्या दुष्ट कृत्याला आळा बसला. जे अन्याय, धडधडीत खून, निंद्य प्रकार वर्षानुवर्षे चालू होते, ते बंद पडले. याचें बरेंचसें श्रेय राममोहनाला दिलें पाहिजे. या चालीला शास्त्राचा आधार यत्किंचित्हि नाहीं, ही गोष्ट सदसद्विवेकबुद्धि व भूतदया यांच्या उलट आहे, असें त्यानें सरकाराला स्पष्टपणें दाखवून दिलें. म्हणजे त्यानें हिंदुशास्त्र, भूतदया व सरकार या त्रयींची मदत घेऊन आपलें कार्य तडीला नेलें.

स्त्रीजातीविषयीं राममोहनाच्या ठिकाणीं फार आदर वसत असे. त्यांचीं दुःखें पाहून त्याच्या हृदयाला पाझर फुटत असे. स्त्रियांवर होत असलेल्या जुलमाचा त्यानें मोठ्या तीव्रतेनें निषेध केला. त्यानें बहुपत्निकत्व, व कुलिनपण या विषयांवर पुस्तकें लिहून, शास्त्रांतील वचनें आणि आधार दाखवून या गोष्टींचा निषेध केला. दुर्बलांची बाजू घेण्याकडे त्याच्या लेखणीचा ओघ नेहमीं वाहत असे. हिंदुलोकांनीं आपल्या स्त्रियांविरुद्ध आणलेले आरोप त्यानें मोठ्या धैर्यानें खोडून काढले. या विषयावरील एका संभाषणांत तो म्हणतो " तुमच्या स्त्रियांनां तुह्मी शिक्षण न देतां त्यांनां अडाणी म्हणतां ही गोष्ट चमत्कारिक आहे! शिक्षण देऊन पहा, व मग त्यांनां काय काय करितां येतें, हें तुम्हांला कळून येईल. शिक्षण दिल्यानंतर जर त्यांच्यामध्यें कांहीं कमीपणा दिसला, तर मग त्यांनां दोष द्या. लीलावती, भानुमती, मैत्रेयी वगैरे पूर्वकालीन कांहीं स्त्रियांनां उदार शिक्षण मिळालें होतें, व त्यामुळें त्या आपल्या वर्गाला भूषण होऊन बसल्या आहेत."

## प्रकरण दुसरें.

# स्त्रियांचे हक्क.

सन १८२२ मार्लों Brief Remarks on ancient female right—पूर्व कालीन स्त्रियांच्या हक्काविषयीं अल्प विचार हें पुस्तक लिहून राममोहनानें बृहस्पति, विष्णू, मनू, याज्ञवल्क्य व कात्यायन यांचे आधार घेऊन असें दाखविलें आहे, कीं, मुलीला आपल्या बापाच्या मालमत्तेचा चवथा हिस्सा, किंवा मुलाच्या वांट्याच्या मानानें कांहीं हिस्सा मिळावयाला पाहिजे. पण पुढें दायभागावर टीका करणारांनीं तो त्यांचा हक्क हिरावून घेतला आहे. त्यामुळें बापाच्या पश्चात् मुली जर अविवाहित असतील, तर त्यांच्या दर्जाप्रमाणें त्यांना नवरा मिळण्याची मुष्कील पडते. पुष्कळ वेळां तिचे आप्त बरेचसे पैसे घेऊन एकाद्या म्हाताऱ्याच्या किंवा अनेक बायका असलेल्या मनुष्याच्या पदरांत तिला घालतात. त्यामुळें तिला वैधव्य लौकर प्राप्त होतें, किंवा तिचें जीवित तिला कष्टमय वाटूं लागतें. मुलीचा पैसा घेण्याला शास्त्रांमध्यें आधार नाहींत हें त्यानें त्याच पुस्तकामध्यें दाखविलें आहे, तें असेः—

न कन्यायाः पिता विद्वान् गृह्णीयात् शुल्कमण्वपि ।
गृह्णञ्छुल्कं हि लोभेन स्यान्नरोऽपत्यविक्रयी ॥
आददीत न शूद्रोपि शुल्कं दुहितरं ददत् ।
शुल्कं हि गृह्णन् कुरुते छन्नं दुहितृविक्रयम् ॥
नानुशुश्रुम जात्वेतत्पुर्वेष्वपि हि जन्मसु ।
शुल्कसंज्ञेन मूल्येन छन्नं दुहितृविक्रयम् ॥

—मनु.

**शुल्केन ये प्रयच्छन्ति स्वसुतां लोभमोहिताः ।**
**कन्याविक्रयिणः पापं महाकिल्बिषकारिणः ॥**

—काश्यप.

वरील पुस्तकांतच राममोहन ह्मणतोः—

" पुरातन काळच्या सर्व कायदेपंडितांनीं असें आपलें स्पष्ट मत दिलें आहे, कीं, एकाद्या स्त्रीला तिच्या नवऱ्याच्या पश्चात् मुलाबरोबर मालमत्तेचा वांटा मिळावा.

**पितुरूर्ध्वं विभजतां माताप्यंशं समं हरेत् ।**

—याज्ञवल्क्य.

ह्मणजे, बापानें ठेविलेल्या मालमत्तेचा समान हिस्सा मुलांबरोबर त्याच्या आईलाहि मिळावा.

**माता च पितरि प्रेते पुत्रतुल्यांशहारिणी ।**

—कात्यायन.

ह्मणजे, बाप मरण पावल्यावर आईला मुलांइतका वांटा मिळावा.

**समांशहारिणी माता पुत्राणां स्यान्मृते पतौ ।**

—नारद.

ह्मणजे, नवऱ्याच्या पश्चात् विधवेला प्रत्येक मुलांइतका वांटा मिळावा.

**मातरः पुत्रभागानुसारभागहारिण्यः ।**

—विष्णू.

**तदभावे तु जननी तनयांशसमांशिनी ।**
**समांशा मातरस्त्वेषां तुरीयांशास्तु कन्यकाः ॥**

बृहस्पती.

नवऱ्याच्या पश्चात् त्याच्या सर्व विधवांनां मग त्यांनां मुलें असोत अगर नसोत, मुलांइतका वांटा मिळावा, पण मुलींना $\frac{1}{4}$ वांटा मिळण्याचा अधिकार आहे.

याप्रमाणें जरी वस्तुस्थिति आहे, तथापि दायभाग व 'दायतत्व यांच्या कर्त्यांनीं वर सांगितलेले हक्क मर्यादित केले आहेत, व मालमत्तेच्या विभागणीच्या संबंधांत या आधुनिक कायदेकर्त्यांचेंच मत सर्व बंगालभर लागूं झालें आहे. यांच्या मताप्रमाणें एकच मुलगा असलेल्या बाईलाहि तिच्या नवऱ्याच्या मालमत्तेचा कांहींहि वांटा मिळण्याचा अधिकार नाहीं. तो मुलगा मरण पावल्यास त्याचा मुलगा किंवा बायको मालमत्तेची मालकीण होऊन बसते ! याचा परिणाम असा होतो, कीं, तिला सर्व आयुष्यभर दुसऱ्यांवर अवलंबून रहावें लागतें. आपल्या मुलाला किंवा सुनेला विचारल्याशिवाय तिला कांहींहि करितां येत नाहीं. भांडणतंट्याच्या वेळीं मुलगे बहुशः आपल्या बायकोचा पक्ष घेऊन आईची हेटाळणी करतात. त्याच्या सख्या आईची जर ही गोष्ट, तर त्याच्या सावत्र आईचे हाल विचारावयालाच नकोत! त्यांच्या दृष्टीसमोर अशा प्रकारचीं उदाहरणें असल्यामुळें व पुढील सुखप्राप्तीची लालूच त्यांचे लोभी नातेवाईक दाखवीत असल्यामुळें त्या आपल्या नवऱ्याबरोबर सती जातात.

प्रकरण तिसरें.

## बहुपत्नीकत्व.

राममोहन ह्मणतो:—

" मुलाची तेवढी तरतूद केली ह्मणजे पुरे, खतःच्या बायकोला आपल्या मालमत्तेची वांटणी कायद्याप्रमाणें मिळत नाहीं हें माहीत असल्यामुळें पुरुष एकाच वेळीं दहादहा, वीसवीस, तीसतीसहि बायका विषयलालसेनें कारितो. या बहुपत्निकत्वाच्या रूढीमुळें बंगाल देशाचें किती नुकसान होत आहे, हें नित्यशः दृष्टीला पडत आहेच. नवऱ्याच्या पश्चात् अशा स्त्रियानां तीनच काय ते मार्ग मोकळे आहेत.

१. दुसऱ्याच्या दास्यत्वामध्यें सर्व आयुष्य कंठणें. दुसरा नवरा मिळण्याची आशासुद्धां धरावयाला नको.

२. स्वतःचा चरितार्थ चालविण्याकारितां अनीतीचें अवलंबन करणें.

३. आपल्या नवऱ्याबरोबर सती जाणें.

यामुळें बंगाल देशामध्यें इतर देशांच्या मानानें दसपट स्त्रिया आत्महत्या करितात. याचें कारण असें, कीं, या देशामध्यें बहु-पत्निकत्वाची चाल मोठ्या जारीनें चालू आहे, व त्यांच्या चरितार्थां-करितां कायद्यामध्यें कांहींएक सोय केलेली नाहीं. प्राचीन ऋषींनीं जे कायदे केले आहेत, त्यांविरुद्ध ही चाल आहे. याज्ञवल्क्य ह्मणतो:—

**सुरापी व्याधिता धूर्ता वन्ध्यार्थघ्न्यप्रियंवदा ।**
**स्त्रीप्रसूश्चाधिवेत्तव्या पुरुषद्वेषिणी तथा ॥**

ह्मणजे, एकाद्या स्त्रीला दारु पिण्याचें व्यसन असेल, ती असाध्य रोगानें पीडिलेली असेल, तिनें नवऱ्याला फसविलें असेल, ती वांझ असेल, ती उधळपट्टी करणारी असेल, नेहमी नवऱ्याला शिवीगाळ करणारी असेल, नेहमीं तिला कन्याच होत असतील, किंवा ती नवऱ्याचा द्वेष करणारी असेल, तेव्हां ती जीवंत असतांहि त्यानें दुसरें लग्न करावें.

मनूचीं अशाच प्रकारचीं वचनें आहेतः—

**मद्यपाऽसाधुवृत्ता च प्रतिकूला च या भवेत् ।**
**व्याधिता वाधिवेत्तव्या हिंस्राऽर्थघ्नी च सर्वदा ॥**

ह्मणजे दारु पिणारी, अनीतीचें वर्तन करणारी, नवऱ्याचा द्वेष करणारी, असाध्य रोगानें पछाडलेली, चेष्टेखोर, मालमत्तेचा नाश करणारी असल्यास तिच्या नवऱ्यानें दुसरें लग्न करावें.

**वन्ध्याष्टमेऽधिवेद्याऽब्दे दशमे तु मृतप्रजा ।**
**एकादशे स्त्रीजननी सद्यस्त्वप्रियवादिनी ॥**

ह्मणजे, आठ वर्षें स्त्री वांझ राहिल्यास, दहा वर्षेंपर्यंत तिचीं सर्व मुलें मेल्यास, अकरा वर्षेंपर्यंत सर्व मुलीच झाल्यास, नेहमीं कटु बोलणारी असल्यास, तिच्या नवऱ्यानें दुसरें लग्न करावें.

**या रोगिणी स्यात्तु हिता सम्पन्ना चैव शीलतः ।**
**सानुज्ञाप्याधिवेत्तव्या नावमान्या च कर्हिचित् ॥**

ह्मणजे, रोगानें पीडित असूनहि ती जर प्रेमळ व सात्विक आहे, व तिच्या इच्छेनें तिच्या नवऱ्यानें दुसरें लग्न केलें, तथापि तिचा कधींहि अपमान केला जाऊं नये."

बहुपत्निकत्वाला आळा घालण्याच्या उद्देशानें राममोहनानें सरकाराला असें सुचविलें, कीं, एकाद्या विधवेला तिच्या मुलाइतका वांटा मिळावा असा कायदा सरकारानें पास करावा. असा कायदा पास

झाल्यास 'एकापेक्षां जास्त बायकांशीं लोक लग्न करणार नाहींत. कारण, त्यांनां अशी भीति वाटेल, कीं, आपल्या मालमत्तेचे लहान-लहान विभाग होऊन तिची वांटणी होईल. या आपल्या ह्मणण्याला त्यानें शास्त्रांतील वचनें सादर केलीं. त्यानें असेंहि सुचविलें, कीं, एकाद्या हिंदु मनुष्याला दुसरें लग्न कर्तव्य असल्यास त्यानें शास्त्रांत सांगितलेले जे आजार, त्यांपैकीं एका आजारानें आपली बायको निःसत्व झाली आहे, व त्यामुळें दुसरें लग्न करणें इष्ट आहे, असा पुरावा आणून मॅजिस्ट्रेटची खात्री करावी.

बहुपतिकत्व बंद करण्याविषयींच्या राममोहनाच्या खटपटीला यश आलें नाहीं, ही मोठी दिलगिरीची गोष्ट आहे ! असें ह्मणतात, कीं, कार्यकारी कौन्सिलमधील एका सभासदाला ही सुधारणा अमलांत आणण्याची अवश्यकता वाटली नाहीं. त्यानें आपलें असें मत दिलें, कीं, देशाच्या धर्मामध्यें सरकारानें हात घालणें ह्मणजे त्या धर्मावर बळजबरी करणें होय. सरकारानेंहि हें त्याचें ह्मणणें कबूल केलें.

प्रकरण चवथें.

## पुनर्विवाहाचें समर्थन.

१८२१ च्या 'संवाद कौमुदी'च्या पहिल्या अंकामध्यें हिंदु विधवांकरितां फंड उभारण्याची एक योजना राममोहनानें सादर केली होती, व त्या वेळीं अशी दाट वदंता उठली होती, कीं, राममोहन विलायतेहून परत आल्यावर तो पुनर्विवाह प्रचारांत आणणार आहे. त्यानें पुनर्विवाहाचें समर्थन करणारें एक पुस्तकहि लिहिलें होतें, असें ह्मणतात. पुनर्विवाह प्रचारांत आला पाहिजे, अशी आपली इच्छा राममोहन आपल्या मित्रांजवळ प्रदर्शित करीत असे, असें बाबू राजनारायण चतर्जी ह्मणतात. मुख्यतः राममोहनाशीं परिचय झाल्यामुळेंच मेरी कार्पेंटर बाईच्या मनामध्यें हिंदी स्त्रियांविषयीं कळवळा उत्पन्न होऊन त्यांची स्थिति सुधारण्याकरितां त्या हिंदुस्तानांत आल्या.

## जातिभेदनिषेध.

हिंदु लोकांमध्यें जो जातिभेद चालू आहे, त्याविरुद्ध राममोहन होता. त्याची अशी समजूत होती, कीं, मनुष्याचा उच्चनीचपणा तो ज्या जातींत जन्माला आला, त्यावर अवलंबून नसून त्याच्या गुणावगुणांवर अवलंबून आहे. जातिभेद नष्ट करण्याकरितां मृत्युंजयाचार्य यांनीं जातिभेदाविरुद्ध लिहिलेलें 'वज्रसूची' या नांवाचें संस्कृत पुस्तक, त्यावर बंगालीमध्यें स्वतः टीका करून क्रमशः प्रसिद्ध करण्याचें त्यानें योजिलें; पण तें पुरें झालें नाहीं. सन १८२९ मध्यें फक्त त्याचा पहिलाच अध्याय निघाला.

## परदेशगमन.

जातिभेदामुळें लोकांचें किती भयंकर नुकसान होतें, याची राम-मोहनाला पूर्ण कल्पना होती. १८२८ सालीं त्यानें आपल्या एका मित्रास पत्र लिहिलें आहे, त्यामध्यें तो ह्मणतो " हिंदूंमधील जाती व पोटजाती यामुळें सहकारित्वानें त्यांनां एकादी गोष्ट करणें अशक्य होऊन त्यांच्यामधील देशाभिमान नष्ट होत चालला आहे. त्यांच्या-मध्यें जे निरनिराळे धर्मविधि प्रचलित आहेत, त्यायोगें कोणतेंहि एकादें धार्मिक जोखमीचें काम अंगावर घेण्यास ते नालायक आहेत.

राममोहन विलायतेला गेला, या एवढ्या गोष्टीनेंच सामाजिक सुधारणेला किती तरी मदत झाली आहे. समुद्रांतून परदेशगमन करणारा हा पहिला ब्राह्मण होय. सध्यां एक शतकानंतर देखील इंग्लंडमध्यें जाणें चांगल्याचांगल्या सुशिक्षितांच्याहि जिवावर येतें. कारण ज्ञातिबहिष्कृत होण्याचा त्यांनां बागुलबावा वाटतो. तेव्हां राममोहनाच्या वेळीं ती गोष्ट किती दुर्धर होती, याची कल्पना वाच-कांनींच करावी. राममोहन खरोखर छातीचाच पुरुष, ह्मणून तो पहिल्यानें इंग्लंडला गेला, व इतरांनां त्यानें उदाहरण घालून दिलें.

# तृतीय परिच्छेद.

## लोकशिक्षण.

१. इंग्रजी शिक्षणाचा पुरस्कार.
२. संस्कृत भाषेचा जीर्णोद्धार.
३. मातृभाषेची सेवा.
४. वर्तमानपत्रांचा प्रचार.
५. स्वातंत्र्यप्रेम.
६. देशाभिमान.

# तृतीय परिच्छेद.

## प्रकरण पहिलें.

## इंग्रजी शिक्षणाचा पुरस्कार.

आपल्या देशबांधवांच्या सामाजिक सुधारणेविषयीं प्रयत्न करून शिवाय लोकसुधारणेचे त्या वेळचे जे अनेक प्रश्न होते त्या सर्वांमध्यें राममोहन मन घालीत असे. त्यांमध्यें इंग्रजी भाषेचें एतद्देशीयांना मुबलक शिक्षण देणें, आणि देशी भाषेला उत्तेजन देणें, हे दोन प्रश्न मुख्य होते.

इंग्रजी शिक्षणाचा सर्व हिंदुस्तानांत–विशेषतः कलकत्यामध्यें प्रसार व्हावा, अशाविषयीं राममोहनाची फार इच्छा होती, व त्याकरितां त्यानें पुष्कळच मेहनत घेतली. प्रथम फारशी भाषेमध्यें, व नंतर संस्कृत भाषेमध्यें त्यानें इतकी पारंगतता मिळविली, कीं, जुन्या शास्त्रांची पूर्ण माहिती त्याच्याइतकी त्या वेळीं तरी दुसऱ्या कोणाला नव्हती. तथापि राममोहनला पक्कें कळून चुकलें होतें, कीं, हिंदुस्तानचा भाग्योदय होण्यास व त्याचा दर्जा इतर राष्ट्रांबरोबर होण्यास पाश्चात्य शिक्षणाच्या धर्तीवर हिंदुस्तानांत लोकशिक्षण मिळावयाला पाहिजे. ह्मणून तो कलकत्यामध्यें आल्याबरोबर त्यानें इंग्रजी शिक्षण देणाऱ्या संस्था स्थापन करण्याविषयीं सरकारच्या पाठीमागें टुमणें लाविलें; परंतु त्याच्या देशबांधवांनींच नव्हे, तर चांगल्याचांगल्या इंग्रजांनीं देखील त्याच्या या प्रयत्नामध्यें अडथळा आणण्याचा प्रयत्न केला.

या बाबतींत बाबु हेमचंद्र सरकार लिहितात "सन १७७४ सालापर्यंत, ह्मणजे सर इलिजा इम्पे यानें कलकत्त्याला वरिष्ठ कोर्ट स्थापन करीपर्यंत बंगाली लोकांचें इंग्रजीचें ज्ञान फक्त तांत्रिक होतें. त्यांनां कामापुरते इंग्रजी शब्द आले, कीं ते इंग्रज व्यापारी व देशी व्यापारी यांच्यामध्यें दुभाष्याचें काम करीत असत. वरिष्ठ कोर्ट स्थापन झाल्यापासून मात्र बंगाली लोकांनां इंग्रजी भाषा जास्तजास्त अवगत होणें अवश्य वाटूं लागलें. सरकार व व्यापारी मंडळ यांनां दुभाष्ये, कारकून, नकला करणारे आणि दलाल वगैरेंची जास्तजास्त उणीव भासूं लागली. यूरोपिअन व अरमेनिकन लोकांपासून बंगाली तरुण स्वतःच्या फायद्याकरितां इंग्रजीचें ज्ञान प्राप्त करून घेऊं लागले. शेरबोर्न नांवाच्या एका यूरोपियनानें जोरासँको येथें एक शाळा उघडली. तेथें बाबू द्वारकानाथ ठाकूर यांनां इंग्रजीचें प्राथमिक शिक्षण मिळालें. मॉर्टिन बौल यांनीं अम्रतोला येथें प्रसिद्ध सील घराण्याचा मूळपुरुष याला शिक्षण दिलें. अरेटून पेट्रस याचीहि एक शाळा होती. त्यामध्यें ५०–६० तरुण शिष्य होते. याच शाळेमध्यें शिकलेले नित्यानंद सेन व उद्याचरण सेन हे पुढें शिक्षक झाले. याप्रमाणें अंगदीं थोड्या खासगी शाळा होत्या, तथापि सरकारानें शिक्षणाची कांहींहि व्यवस्था केलेली नव्हती. राममोहन कलकत्त्याला येण्याच्या आदल्या वर्षी पार्लमेंटाच्या आग्रहास्तव कोर्ट ऑफ डायरेक्टर यांनीं दरवर्षी देशी लोकांनां शिक्षण देऊन त्यांची सुधारणा करण्याकरितां एक लाख रुपये निराळे काढून ठेवण्याचें ठरविलें; परंतु पुष्कळ वर्षें पर्यंत त्या पैशाचा उपयोग इंग्रजी शिक्षणाकडे करण्यांत आलेला नव्हता. सन १७८० त वॉरन हेस्टिंग्ज यांनीं कलकत्त्यामध्यें आरबी व फारशी शिक्षण मुसलमानांच्या मुलांनां देण्याकरितां एक मद्रसा कलकत्ता येथे स्थापन केली. सन १७९१ मध्यें जोनाथन डंकन

यानें बनारस येथें संस्कृत शिकविण्याठी एक कॉलेज स्थापन केलें. फोर्ट वुइलियम कॉलेज सन १८०० मध्यें सिव्हिल सर्व्हिसमधील लोकांकरितां स्थापण्यांत आलें होतें, परंतु राममोहन कलकत्त्याला येईपर्यंत हिंदी लोकांनां पद्धतशीर इंग्रजी शिक्षण देणारी सार्वजनिक शाळा ह्मणून नव्हती."

कलकत्त्याला आल्याबरोबर राममोहनानें त्या दिशेनें प्रयत्न सुरू केले. आज आपल्या देशांत ज्या खासगी, सरकारी, निमसरकारी आणि मिशनरी शिक्षणसंस्था शिक्षणप्रसाराचें अमूल्य कार्य करीत आहेत, त्या सर्वांस शंभर वर्षांपूर्वी राममोहनानें केलेले प्रयत्न प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रीतीनें कारण झाले, असें ह्मटलें तर बिलकूल अतिशयोक्ति होणार नाहीं. अगदीं प्रथम इंग्रजी सार्वजनिक शिक्षण देणारी अशी शाळा ह्मटली ह्मणजे सन १८१९ सालीं कलकत्ता येथें स्थापन झालेलें हिंदु कॉलेज हें असावें. सन १८१५ मध्यें राममोहनानें स्थापन केलेल्या आत्मिय सभेमध्यें जो वादविवाद झाला, त्यामुळेंच ही संस्था निघाली, असें ह्मणण्याला हरकत नाहीं. हें कॉलेज स्थापन झाल्याविषयींची हकीगत डॉ. अलेक्झांडर डफ यांनीं सन १८५३ मध्यें हाउस ऑफ कॉमन्सच्या सिलेक्ट कमिटीपुढें सांगितली, ती अशीः—

" बंगालमध्यें इंग्रजी शिकविण्याला मुख्यतः दोन मनुष्यें कारण झालीं. एक राजा राममोहनराय व दुसरा डेविड हेअर. सन १८१५ मध्यें आत्मियसभेमध्यें असा प्रश्न निघाला, कीं, एतद्देशियांनां सुशिक्षित कण्याविषयीं काय खटपट करावी?राममोहनानें सुचविलें, कीं, एक सभा स्थापन करून लोकांचें लक्ष्य मूर्तिपूजेवरून उडून एका सत्य सनातन परमात्म्याकडे लागेल, अशाविषयीं प्रथम प्रयत्न करावा. डेविड हेअर हा कलकत्त्यामधील घड्याळें विकणारा व दुरुस्त करणारा ( Watchmaker) असून तो स्वतः अप्रबुद्ध होता

पण त्याला चांगलें व्यवहारज्ञान असून त्याचा उत्साह दांडगा होता. त्यानें सुचविलें, कीं, इंग्रजी शिक्षणाच्या योगानेंच लोकांचीं मनें सुसंस्कृत होतील. त्याप्रमाणें त्यानें एक हस्तपत्रक काढून लोकांची मदत मागितली. त्याकडे त्या वेळचे मुख्य न्यायाधिश सर हाइड ईस्ट यांचें लक्ष्य जाऊन त्यांनीं त्यामध्यें मन घातलें, व त्यानें यूरोपिअन व वजनदार बंगाली गृहस्थ यांची एक सभा सन १८१६ मध्यें बोलाविली. त्या सभेमध्यें एक शाळा काढण्याचें ठरून हिंदु कॉलेज ही संस्था स्थापन झाली.''

ही संस्था स्थापन करण्याच्या कामीं राममोहनाचें मुख्य अंग होतें. मोठ्या उत्साहानें या संस्थेची भरभराट होण्याविषयीं त्यानें पुष्कळ खटपट केली; पण कमिटीच्या दुसऱ्या कर्मठ सभासदांनीं राममोहन त्या कमिटीमध्यें असेपर्यंत मदत करण्याचें नाकारिलें. तेव्हां संस्थेच्या फायद्याकारितां राममोहनानें अपखुषीनें त्या जागेचा राजीनामा दिला. खरें पाहिलें, तर राममोहनाच्याच खटपटीनें या संस्थेला मूर्तस्वरूप आलें; परंतु आपल्याकारितां संस्थेची नुकसानीं होणें त्याला बिलकूल पसंत न पडून त्या संस्थेशीं असलेला आपला संबंध त्यानें सोडला; तथापि त्या संस्थेविषयींची त्याची कळकळ यत्किंचित्‌हि कमी झाली नाहीं.

सरकारालाहि इंग्रजी शिक्षणसंस्था काढण्यास लावण्याविषयीं त्यानें थोडेथोडके परिश्रम घेतले नाहींत. १८१३ पासून राखून ठेवलेल्या पैशाचा विनियोग कसा करावा, याविषयीं दोन तट इंग्रज मुत्सद्द्यांमध्यें झाले. एका पक्षाचें ह्मणणें असें पडलें, कीं, पंडित व मोलवी यांनां स्कॉलर्शिपा देऊन त्यांच्याकडून संस्कृत व आरबी भाषेमधील हस्तलिखित प्रति छापून प्रसिद्ध कराव्या. याला Orientalists (आशिया खंडांतील भाषांचे पुरस्कर्ते) असें नांव पडलें. दुसऱ्या पक्षाचें

म्हणणें असें, कीं, इंग्लंडच्या धर्तीवर येथेंहि सार्वजनिक शाळा स्थापन कराव्या. याला Anglicists (इंग्रजी भाषेचे पुरस्कर्ते) असें नांव पडलें. १८३५ च्या मार्च महिन्याच्या ७ व्या तारखेला लॉर्ड बेंटिंक यांनीं एक संस्मरणीय असा ठराव करीपर्यंत हा वाद चालू होता. हा ठराव पास होण्यापूर्वी राममोहनानें बरीच खटपट केल्याचें दिसून येतें. प्रथम Orientalists यांचा जय होऊन त्यांच्या म्हणण्याप्रमाणें सरकारी देणगीचा विनियोगहि होऊं लागला होता. राममोहनानें या दिशेनें प्रयत्न केले नसते, तर इंग्रजी शिक्षणाला सुरवात व त्याचा प्रसार होण्याला बरींच वर्षे लागलीं असतीं. त्याला त्या वेळीं जरी समाधानकारक उत्तर मिळालें नाहीं, तथापि त्यानें लोकांची जी तरफदारी केली, त्यावरून Anglicists यांनां जय येण्यास फार दिवस लागणार नाहींत, हें उघडउघड दिसूं लागलें.

ख्रिश्चन मिशनचें मनहि शिक्षणसंस्था काढण्याविषयीं राममोहनानें वळविलें. त्याची यूरोपिअन व अमेरिकन मिशनरींबरोबर ओळख झाल्याबरोबर हिंदी लोकानां इंग्रजी शिक्षण देण्याविषयीं त्यांच्यामध्यें प्रेरणा उत्पन्न करण्यास राममोहन कारणीभूत झाला. इंग्लंडमधील व अमेरिकनमधील युनिटेरिअन पुढाऱ्यांनां त्यानें वेळोवेळीं चांगले, हुषार, उदार मताचे असे शिक्षक हिंदुस्तानांत पाठविण्याला पत्रें पाठविलीं. युनिटेरिअन लोकांनां त्याची विनंति मान्य करतां आली नाहीं; पण कलकत्त्यामधील पहिले स्कॉटिश जेम्स ब्राइस यांनीं मात्र त्याच्या विनंतीला मान देऊन १८२४मध्यें भरलेल्या (General Assembly) सभेकडे एक अर्ज पाठवून हिंदुस्तानामध्यें मिशनरी पाठविण्याविषयीं चर्च ऑफ स्काटलंडचें लक्ष्य पहिल्यानें वेधलें, व त्या संस्थेकडून रे. अलेक्झांडर डफ हे १८३० मध्यें हिंदुस्तानांत आले. या गृहस्थाचा राममोहनानें

फार आदरसत्कार केला, व त्याला फार मदत केली. नाहींतर निराश होऊन त्याला परत जावें लागलें असतें.

डफसाहेबांनां शाळा काढण्याकरितां हिंदु लोक जागा देईनात, तेव्हां राममोहनानें ब्राह्मसभेच्या इमारतीमध्यें त्याला वर्ग चालवूं दिला, व प्रथम पांच उच्च वर्गांतील तरुण विद्यार्थी मिळवून दिले. १८३० च्या जुलईच्या १३ व्या तारखेला शाळा उघडण्याच्या दिवशीं डफसाहेबांनीं बायबलची एकएक प्रत प्रत्येक विद्यार्थ्याला दिली, तेव्हां तेथें गडबड उडून 'हें ख्रिस्ती शास्त्र आहे, आह्मी ख्रिस्ती नाहीं; आह्मी तें वाचल्यास ख्रिस्ती होऊं व आमचे मित्र आह्मांला जातीबहिष्कृत करतील,' असें ते तरुण ह्मणूं लागले. राममोहन तेथें हजर होताच, व असें कांहीं घडून येणार हें भविष्य त्यानें केलेंच होतें. त्यानें त्या विद्यार्थ्यांनां उपदेश केला, कीं "बायबल वाचण्यामध्यें कांहीं गैर नाहीं. डॉ. हॉरेस हेमन वुइलसन यांनीं हिंदुशास्त्रें वाचलीं आहेत, पण ते हिंदु झाले नाहींत; मी कुराण वाचलें आहे, पण मी मुसलमान झालेलों नाहीं." या त्याच्या उपदेशाचा विद्यार्थ्यांच्या मनावर बराच परिणाम झाला.

इंग्लंडाला जाईपर्यंत राममोहन त्या शाळेविषयीं आस्था बाळगीत होता. ती शाळा त्या मिशनरीला दुसरी जागा मिळे तोंपर्यंत त्या इमारतीमध्येंच भरत असे. त्या शाळेची प्रगति व्हावी, अशी राममोहनाची फार इच्छा होती. त्या शाळेवर देखरेख करण्याकरितां तो नियमानें जात असे. हिंदुस्तानामध्यें शिक्षणाचा जो पुढें मोठ्या जारीनें प्रसार झाला, त्याचा उगम ही लहानशी शाळा होय.

शिक्षणाच्या बाबतींत दुसऱ्यांनां सल्लामसलत देऊनच राममोहन थांबला नाहीं, तर हिंदी मुलांनां इंग्रजी शिक्षण देण्याकरितां त्यानें स्वतःच्या खर्चानें एक शाळा स्थापन केली. त्या शाळेमध्यें समारें ६० भले

शिकूं लागलीं. त्या काळाचा विचार करतां ही संख्या फार समाधानकारक होय, असें ह्मणण्याला हरकत नाहीं. एक दरमहा १५० रुपयांवर व दुसरा दरमहा ७० रुपयांवर असे दोन शिक्षक त्यानें त्या शाळेवर नेमिले. पुष्कळ वर्षेपर्यंत या शाळेची भरभराट होत गेली. याच शाळेमध्यें महर्षि देवेंद्रनाथ यांनां प्राथमिक इंग्रजी शिक्षण मिळालें. या शाळेमध्यें धार्मिक शिक्षणहि देण्यांत येत होतें, व त्या शिक्षणाला राममोहन प्राधान्य देत होता. स्त्रीशिक्षणाविषयींहि राममोहनानें हयगय न करितां हिंदु स्त्रियांनां शिक्षण देण्याकरितां एका ख्रिस्ती बाईला त्यानें पुष्कळ रक्कम दिली. त्याचा असा दृढ समज होता, कीं, समाज सुधारण्याच्या कामीं स्त्रीशिक्षणाची अत्यंत जरुरी आहे.

संस्कृत व पर्शियन भाषांच्या द्वारें शिक्षण देऊन लोकांमध्यें शिक्षणाचा प्रसार करावा, अशी सरकारची फार इच्छा होती. फारशी भाषेचें शिक्षण देण्याकरितां कलकत्ता येथें एक मद्रसा स्थापण्यांत आली, व संस्कृत भाषेच्या अध्ययनाकरितां बनारस येथें एक विद्यालय स्थापण्यांत आलें, व कलकत्त्यामध्यें दुसरें एक संस्कृत भाषेचें विद्यापीठ स्थापण्याचा सरकारचा उद्देश होता. वर ज्या हिंदु कॉलेजाचा उल्लेख केला आहे, तें विद्यालय बंगालमधील पुढारी हिंदु गृहस्थांनीं, कांहीं परोपकारी यूरोपिअन गृहस्थांच्या मदतीनें स्थापन केलें होतें. सात वर्षेपर्यंत सरकारची कांहींसुद्धां मदत न मिळतां ही खासगी संस्था चालू होती. या अवधींत राममोहनानें प्रयत्न करून सरकारचे डोळे उघडले, व इंग्रजी भाषेचा पुरस्कार करून शिक्षणसंस्थांनां सढळ हातानें मदत करणें आवश्यक आहे, ही गोष्ट सरकारच्या स्पष्टपणें लक्ष्यांत आणून दिली.

१८२३ सालीं एक सरकारी शिक्षणखातें स्थापन झालें होतें, व शिक्षणाला उत्तेजन देण्याकरितां १८१३सालीं जे एक लाख रुपये राखून

ठेविले होते ह्मणून वर सांगण्यांत आलें आहे, ते सरकारानें या मंडळीच्या स्वाधीन केले. या मंडळीनें कलकत्त्याला एक संस्कृत कॉलेज काढण्याचें सरकाराला सुचविलें. संस्कृत कॉलेज काढणें ही चुकीची दिशा आहे, असें स्पष्ट ह्मणून राममोहनानें गव्हर्नर जनरल-कडे सन १८२३ त खालील आशयाचें एक मुद्देसुद पत्र पाठविलें:—

"कलकत्त्यामध्यें एक नवीन संस्कृत कॉलेज काढून शिक्षणाच्यायोगें एतद्देशियांची स्थिति सुधारावयाची, ही सर-कारची इच्छा स्तुत्य आहे. हें कॉलेज काढण्याचा विचार चालू असतां आमच्या ऐकण्यांत आलें आहे, कीं, दरवर्षी हिंदी लोकांच्या शिक्षणाकरितां कांहीं रक्कम निराळी काढून ठेवण्यांत आली आहे. त्या वेळीं आह्मांला खात्रीनें असें वाटलें, कीं, यूरोपमधून विद्वान् व बुद्धिमान् शिक्षक आणवून त्यांच्या-द्वारें एतद्देशियांनां गणित, पदार्थविज्ञान, रसायनशास्त्र, खगोल-भूगोल वगैरे विषयांचें ज्ञान दिलें जाईल; परंतु हिंदु पंडितांच्या देखरेखीखालीं एक संस्कृत कॉलेज काढून हिंदुस्तानामध्यें जें शिक्षण आधींच प्रचलित आहे तेंच देऊन त्या पैशाचा विनियोग करण्याची सरकारची इच्छा आहे, हें ऐकून आमची निराशा झाली आहे. बेकनच्यापूर्वी यूरोपमध्यें जी शिक्षण-पद्धति चालू होती, तशाच प्रकारची शिक्षणपद्धति सध्यां हिंदुस्तानांत चालू आहे. हिच्यायोगें व्याकरणविषयक, मानस-शास्त्रविषयक वगैरेंमधील लहानलहान भेदांमुळें तरुण विद्यार्थ्यांच्या मनावर एक प्रकारचे ओझें मात्र होत आहे. यामुळें विद्यार्थ्यांचा किंवा देशाचा फायदा झाल्यास तो फारच

थोडा आहे. दोन हजार वर्षांपूर्वीं हिंदुस्तानाला ज्या गोष्टी माहीत होत्या, त्याच गोष्टी अशा प्रकारच्या संस्कृत कॉलेजामुळें विद्यार्थ्यांनां शिकविल्या जातील. शिवाय त्या वेळेपासून जे निरर्थक वाद झाले, त्यांचाहि बोजा विद्यार्थ्यांवर बसेल. संस्कृत भाषा इतकी कठिण आहे, कीं, ती प्राप्त करून घेण्याला सर्व आयुष्यभर मेहनत केली पाहिजे. सर्व ज्ञान याच भाषेमध्यें गुरफटून राहिल्यामुळें त्याचा फैलाव होणें फार मुष्किलीचें झालें आहे. या भाषेमध्यें जी उपयुक्त माहिती आहे ती कायम ठेवणें असेल, तर तो हेतु संस्कृत कॉलेज स्थापन न करितांहि साध्य होण्यासारखा आहे. ही भाषा शिकविणारे पुष्कळ पंडित देशामध्यें आहेत, त्यांपैकीं नामांकित पंडितानां वेतन द्यावें, ह्मणजे त्यांनां आपलें काम करण्याला अधिक उत्तेजन येईल. हिंदुस्तानच्या लोकांची स्थिति सुधारणें हा सरकारचा हेतु संस्कृत कॉलेज स्थापन करण्यानें मुळींच सिद्धीला जाणार नाहीं, हें आह्मी आपणांला नम्रतापूर्वक कळवितों. कारण, संस्कृत भाषेचें व्याकरण वगैरे शिकण्यामध्यें आयुष्यांतील उत्तमोत्तम अशीं बारा वर्षें खर्च करण्याच्यायोगें कोणतीहि सुधारणा होणार नाहीं. वेदांत, मीमांसा आणि न्यायशास्त्र यांसारख्या गहन गोष्टींनीं देशाची स्थिति ती काय सुधारणार! बेकनच्या तत्त्वज्ञानापूर्वीं जी शिक्षणपद्धति अमलांत होती, तिच्या योगें खरें ज्ञान लोकांनां ज्याप्रमाणें प्राप्त होण्यासारखें नव्हतें, त्याप्रमाणें संस्कृताच्या अध्ययनानें देशाचें अज्ञान मात्र वाढत जाणार आहे. पण सरकारची इच्छा तें नाहींसें व्हावें अशी आहे,

तेव्हां यूरोपमधून चांगलेचांगले शिक्षक आणवून एक इंग्रजी कॉलेज येथें स्थापन करावें, व त्यामध्यें सर्व प्रकारच्या साहित्याचा पुरवठा करावा. ”

सरकारानें हें पत्र पब्लिक इन्स्ट्रक्शन् कमिटीकडे पाठविलें, व संस्कृत कॉलेज काढण्याचा बेत जरी रहित झाला नाहीं, तरी इंग्रजी व संस्कृत कॉलेजचा समावेश होण्यासारखी एक इमारत उभारण्याविषयीं तजवीज करण्यांत आली. ही इमारत १८२५ सालीं पुरी झाली, व त्या वेळेपासून सरकार त्या कॉलेजाला मदत करूं लागलें. डॉ. एच्. एच्. वुइलसन यांनां सरकारतर्फे या संस्थेची देखरेख करण्याच्या कामावर नेमलें.

ज्या वेळीं इंग्रजी शिक्षणाविषयीं लोकांचा कटाक्ष होता, त्या वेळीं एका बंगाली मनुष्यानें वरील उद्गार काढणें खरोखरच विलक्षण गोष्ट आहे!

इंग्रजी शिक्षणाचा प्रसार सर्वत्र व्हावा अशी त्याची इच्छा होती व त्यानें त्याकरितां जे परिश्रम घेतले त्यांची सफलता त्याच्या हयातीमध्यें झाली नाहीं. तो निवर्तल्यानंतर दोन वर्षांनीं म्हणजे इ. स. १८३५ सालीं लॉर्ड विल्यम बेंटिंक व लॉर्ड मेकॉले यांनीं शिक्षणाविषयीं एक योजना तयार करून ती सर्वत्र लागू केली.

प्रकरण दुसरें.

## संस्कृत भाषेचा जीर्णोद्धार.

रामसमोहनानें इंग्रजी शिक्षणासाठीं इतकी खटपट केली, यावरून संस्कृत भाषेच्या शिक्षणाकडे त्यानें लक्ष्य दिलें नाहीं, व त्याच्या प्रसाराविषयीं त्यानें आस्था दाखविली नाहीं, असें कोणालाहि वाटण्याचा संभव आहे; पण खरा प्रकार असा आहे, कीं, संस्कृताचें पुनरुज्जीवन होण्याविषयींहि त्यानें पुष्कळ खटपट केली. त्याच्या वेळीं संस्कृत भाषा अगदींच मागें पडलेली होती. त्या भाषेचें व्याकरण व स्मृति, वेद, उपनिषदें यांचें पठण करण्यापलीकडे फारसें कांहीं होत नव्हतें. पाश्चात्य शिक्षणाचा राममोहनानें जरी पुरस्कार केला, तरी या प्राचीन भाषेचा त्याला कधींहि विसर पडला नाहीं. आत्मियसभेच्या वादविवादानंतर पाश्चात्य शिक्षणाचा पुढाकार जरी त्यानें घेतला, तरी संस्कृत भाषेचा प्रसार करण्याच्या कामीं त्याचे अहर्निश प्रयत्न चालू होते. राममोहनाच्याच खटपटी-मुळें १८२६ त एक वेदांत कॉलेज स्थापन झालें. त्यानें स्वतःच्या खर्चानेंहि एक संस्कृत कॉलेज काढून त्यावर तो महिन्याच्या महि-न्याला बरीच रक्कम खर्च करी. संस्कृत भाषा किती प्रौढ आहे, व तींमध्यें किती उदात्त विचार भरलेले आहेत, हें लोकांच्या दृष्टीला आणण्याकारितां त्यानें वेळोवेळीं उपनिषदांचीं भाषांतरें करून तीं इंग्रजी, बंगाली व हिंदी भाषांमध्यें प्रसिद्ध केलीं. यामुळें लोकांचेंहि संस्कृत भाषेकडे लक्ष्य वेधलें, व त्या वेळेपासून ते संस्कृताच्या अध्ययनाकडे अधिकाधिक लक्ष्य देऊं लागले. राममोहनाच्या या बहुमोल कामगिरीची साक्ष सध्याचे मोठमोठाले पंडित देत आहेत.

## राजा राममोहन राय.

राममोहनाचा ६३ वा वाढदिवस साजरा होत असतां पंडित कवि-वर वेदांतवागीश यांनीं असे उद्गार काढले आहेत, कीं "वेदांताचा अभ्यास करणें राममोहनामुळें सुकर झालें आहे. त्यामुळें सर्व हिंदुस्तान देश त्याचा फारफार आभारी आहे. तत्त्वबोधिनी पत्रिके-मध्यें वेदांतावर जे विषय येत असत, ते वाचून माझें लक्ष्य त्या विषयाकडे लागलें, अर्थात् मी राजाचा फार आभारी आहें."

प्रकरण तिसरें.

# मातृभाषेची सेवा.

बंगाली भाषेची राममोहनानें जी मनोभावें सेवा केली, ती फार अमूल्य होय. बंगाली गद्याचा तो आद्यप्रवर्तक होय. राममोहनापूर्वी सर्व पुस्तकें पद्यात्मक लिहिण्याचा प्रघात होता. त्याच्यामागें जरी अनेक व्यवसाय होते, अनेकांबरोबर त्याला निरनिराळ्या विषयांवर वादविवाद करावा लागला, तथापि वेळांत वेळ काढून त्यानें आपल्या बांधवांकरितां बंगालीमध्यें भूगोल, इतिहास वगैरे पुस्तकें लिहिलीं. त्या वेळच्या लोकांनां गद्यात्मक पुस्तकें वाचतां येईनात, ह्मणून खुणांच्याद्वारां त्याला तीं समजावून द्यावीं लागलीं. इंपिरिअल गॅझेटिअरच्या सहाव्या पुस्तकामध्यें डॉ. हंटर साहेब ह्मणतातः—

"बंगाली गद्याचा उगम १९ व्या शतकामध्यें राजानें केला. राममोहनानें केवळ धर्मपर ग्रंथच गद्यांत लिहून त्या ग्रंथांची गोडी आपल्या लोकांत उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला एवढेंच नाहीं, तर त्यानें प्रथम साध्या विषयांवर गद्यामध्यें ग्रंथ लिहून आपल्या कामाला प्रारंभ केला. या एकेश्वरी पंथाच्या प्रस्थापकाला असें वाटलें, कीं, आपल्या मतांचा व विचारांचा देशामध्यें प्रसार होण्याकरितां पद्यापेक्षां गद्याचा जास्त उपयोग होईल, ह्मणून त्यानें आपलीं पुस्तकें गद्यात्मक लिहिलीं. तो निवर्तल्याबरोबर बंगाली भाषेचा जनक ह्मणून लोक त्याला संबोधूं लागले, व अजूनहि लोकांचा तसाच दृढ विश्वास आहे."

त्या वेळीं फोर्ट वुइलियम कॉलेजमध्यें यूरोपिअन लोकांकरितां जीं पुस्तकें उपयोगांत होतीं, त्या पुस्तकांपैकीं दोनतीन खेरीज-

करून बाकीचीं सर्व पद्यांमध्यें होतीं. राममोहनानें ग्रंथ गद्यामध्यें लिहून बंगाली भाषेचा अभ्यास सोपा करून ठेवला. त्या वेळची लेखनपद्धति फार अपुरी व अशुद्ध असे. राममोहनानें निबंधलेखनाची उत्तम पद्धत घालून दिली, व लोकांनींहि तिचा स्वीकार केला. धार्मिक व सामाजिक विषयांवरील पुस्तकांखेरीज बंगाली भाषेचा अभ्यास करण्यास मदत व्हावी ह्मणून त्यानें बंगालीमध्यें एक व्याकरण तयार केलें, व सन १८२६ मध्यें बंगाली भाषेचें व्याकरण इंग्रजीमध्यें प्रसिद्ध केलें. कौमुदी नांवाचें एक साप्ताहिक पत्र त्यानें १८२१मध्यें सुरू केलें होतें. या वर्तमानपत्रामध्यें धार्मिक आणि सामाजिक विषयांवर लेख येत होतेच; शिवाय त्या वेळच्या राजकीय औद्योगिक वगैरे सर्व प्रचलित विषयांवर देखील चर्चा होत असे, व त्यामुळें लोकांमध्यें ज्ञानाचा प्रसार होण्यास त्या पत्रानें फार मोठी कामगिरी बजावली. राममोहनानें एक भूगोल व एक खगोलहि प्रसिद्ध केला. त्यानें जीं पद्यें रचलीं आहेत, तीं फार महत्त्वाचीं असून बंगाली भाषेला तीं भूषणास्पद होऊन बसलीं आहेत. एकेश्वरी धर्माचें समर्थन करणाऱ्या कविता प्रथमच बंगालीमध्यें करण्याचें श्रेय त्याला आहे. त्या अगदीं रसभरीत आहेत. बंगाली भाषेचे प्रसिद्ध इतिहासकार पंडित रामगति न्यायरत्न ह्मणतातः—

"त्या कवितांमध्यें इतकी अप्रतिम शक्ति आहे, कीं, एकाद्या पाषाणहृदयी मनुष्याच्या अंतःकरणाला देखील त्यायोगें पाझर फुटतो, अधार्मिक वृत्तीचा मनुष्यसुद्धां धार्मिक व श्रद्धावान् होतो, व संसारांत गढून गेलेल्या मनुष्याला वैराग्य प्राप्त होतें."

एकेश्वरी मतानुयायांनां व मूर्तिपूजकांनांहि त्या कविता अतिशय आवडतात. त्यांपैकीं कांहीं संस्कृतमध्येंहि आहेत. राममोहनाच्या कवितांचें इंग्रजी भाषांतर बाबू मोहिनीमोहन चतर्जी, एम्. ए. यांनीं केलें व तें कलकत्त्याच्या आदिब्राह्मसमाजानें छापून प्रसिद्ध केलें आहे.

## मातृभाषेची सेवा.

राममोहनच्या ठिकाणीं विलक्षण बुद्धिसामर्थ्य व स्वमत प्रतिपादनाची शैली, त्याचप्रमाणें आध्यात्मिक बल व राजकीय महत्त्वाकांक्षा यांची जोड झालेली होती. कौमुदी पत्राशिवाय राममोहन फारशी भाषेमध्यें मिरत–अल–अखबार नांवाचें दुसरें एक पत्र सन १८२२ पासून प्रसिद्ध करूं लागला. या पत्रामध्यें आपल्या हिंदु व मुसलमान देशबांधवांकरितां तो राजकीय विषयांवरहि लेख प्रसिद्ध करीत असे. यांशिवाय बंगाली हेरल्ड या इंग्रजी वर्तमानपत्राची मालकी त्याजकडे होती.

शिवाय श्रीरामपूर येथील एका ख्रिस्ती मिशनरीच्या मताला विरोध करण्याकारितां त्यानें १८२१ मध्यें इंग्रजींत आणि बंगालींत ब्रह्मॅनिकल मॅगेझिन हें पुस्तक काढलें, व वेदांतांचीं भाषांतरें करून व दुसरीं पुस्तकें लिहून त्यानें प्रसिद्ध केलीं. या व अशा अनेक दिशांनीं शिक्षणप्रसाराला त्यानें हातभार लाविला.

प्रकरण चवथें.

# वर्तमानपत्रांचा प्रचार.

सध्या आपल्या देशामध्यें राजकीय बाबतींत जी जागृति झालेली दिसून येते, तिचा आद्यजनक राजा राममोहन रॉय होय. १९०४ च्या सप्टेंबर महिन्याच्या २७ व्या तारखेला राममोहनाच्या पुण्यतिथीच्या दिवशीं बाबु सुरेंद्रनाथ बॅनर्जी यांनीं असे उद्गार काढले, कीं "राममोहन हा ब्राह्मसमाजाचा जनिता तर खराच, पण बंगालमधील सामाजिक सुधारणांचा व सर्व हिंदुस्तानांतील पद्धतशीर राजकीय सुधारणांचा धुरीण होय, ही गोष्ट लक्ष्यांत ठेविली पाहिजे."

राममोहनाच्या पूर्वी राजकीय हक्कांची जाणीव लोकांनां मुळींच नसे. त्यांविषयीं त्यांनां मुळींसुद्धां कल्पना नव्हती. आपणांवर होत असलेला जुलूम सरकारच्या नजरेस आणून त्याची दाद लावून घेण्याचा विचार कोणाच्या डोक्यांतहि येत नसे. लोकांच्या हक्कांची तरफदारी करून त्यांच्या वतीनें सरकाराकडे अर्ज करण्याचा व सरकाराला आपली जबाबदारी ओळखावयास लावण्याचा प्रघात राममोहनानें सुरू केला.

राममोहन सोळा वर्षांचा असतांना इंग्रजांविषयीं त्याच्या मनांत प्रेमभाव नव्हता. पण त्याचें तें मत नंतर बदललें हें त्याच्या आत्मचरित्रावरून दिसून येतें. तो ह्मणतोः—

" मी सुमारें १६ वर्षांचा असतांना हिंदूंमध्यें मूर्तिपूजेचा चालू असलेला प्रकार धर्मशास्त्रांस संमत आहे किंवा नाहीं याविषयीं संशय प्रदर्शित करून एक चोपडें लिहिलें. यामुळें, व त्या विषयावरील माझीं मतें माझ्या बापाला माहित असल्यामुळें, माझ्यामध्यें

व त्याच्यामध्यें बेबनाव उत्पन्न होऊन मी प्रवासास निघालों. मीं बहुतकरून हिंदुस्तानांतच प्रवास केला; पण हिंदुस्तानामध्यें इंग्रज सत्ता स्थापित झाल्यामुळें माझ्या मनास विषाद वाटून मी तिबेट-मध्यें गेलों. माझ्या विसाव्या वर्षी बापानें मला घरीं बोलाविलें. तेव्हांपासून माझा व यूरोपिअनांचा परिचय होऊं लागला, व त्यांचे कायदे व राज्यपद्धति यांची मला चांगली माहिती झाली. ते बुद्धिमान्, धिम्मे व नेमस्त आहेत, असें पाहून व पूर्वींच्या मुसलमानांशीं त्यांची तुलना करून पाहतां, माझा त्यांच्याविषयींचा ग्रह बदलला व मला असें वाटूं लागलें, कीं ते जरी परकीय आहेत तरी देशाची स्थिति त्यांच्यामुळेंच अधिक लवकर सुधरेल."

लॉर्ड हेस्टिंग्ज यांची कारकीर्द संपून ते विलायतेला गेले, व त्यांच्या बदली लॉर्ड ॲमहर्स्ट हे येणार होते. तेव्हां मध्यंतरीच्या वेळा-मध्यें ऑ. जॉन ॲडाम्स हे तात्पुरते गव्हर्नर जनरल असतांना नवीन स्कॉटलंडच्या चर्चचे मुख्य उपाध्याय डॉ. ब्राइस यांनीं १८२३ मध्यें कंपनी सरकारची नोकरी पत्करली, तेव्हां 'कलकत्ता जर्नल'च्या बकिंगहॅम नांवाच्या संपादकानें त्याविरुद्ध कडक टीका केली. या टीकेचा परिणाम असा झाला, कीं, दोन महिन्यांच्या आंत त्यानें हिंदुस्तान सोडून गेलें पाहिजे, असा गव्हर्नर जनरलनें जाहिरनामा काढिला. लगेच सरकारानें वर्तमानपत्रांच्या स्वातंत्र्यावर गदा आणणारा एक कायदा करण्याचें योजिलें.गव्हर्नर जनरलचा परवाना मिळाल्याशिवाय कोणींहि वर्तमानपत्र सुरू करूं नये, किंवा पुस्तक छापतां कामा नये, अशा प्रकारचा त्या कायद्याचा मथितार्थ होता. अशा कायद्याला वरिष्ठ कोर्टांतील जज्जांकडून संमति मिळाली तरच तो कायदा अमलांत येत असे. तो कायदा जेव्हां पसंतीकारितां वरिष्ठ कोर्टांत आला, त्या वेळीं ह्मणजे ता. २१ मार्च १८२३ रोजीं तो रद्द

करण्याविषयीं राममोहनानें इतर पांच गृहस्थांच्या सह्यांनिशीं वरिष्ठ कोर्टाकडे अर्ज केला.

याच्यापूर्वी राममोहनानें 'संवाद कौमुदी' नांवाचें साप्ताहिक पत्र सन १८२१ पासून सुरू केलें होतें. या पत्रामध्यें सर्व विषयांचा ऊहापोह होत असे. हें पत्र मुख्यतः साधारण लोकांकरितां होतें. सुशिक्षित लोकांकरितां त्यानें मिरत-अल-अखबार हें पत्र फारशी भाषेंत सुरू केलेलें होतें. याप्रमाणें दोन वर्तमानपत्रांचें स्वामित्व व संपादकत्व वर सांगितलेलें बिल वरिष्ठ कोर्टांत येण्यापूर्वीच राम-मोहनाकडे होतें. वर ज्या अर्जाचा उल्लेख केलेला आहे, त्याचा मसुदा राममोहनानेंच तयार केला होता. त्यावरून त्याची बहुमोल कामगिरी दिसून येते. या अर्जाचा सारांश येणेंप्रमाणेंः—

"एतद्देशीयांनीं आपली राजनिष्ठा वेळोवेळीं प्रदर्शित केली आहे, त्यामुळें ते इंग्रज सरकारशीं वितुष्ट उत्पन्न करून शांततेचा भंग करतील असें मानण्याचें कारण नाहीं. पूर्वीच्या जुलमी सरकारामुळें आमच्या पूर्वजांना आपली मालमत्ता जमिनीमध्यें पुरून ठेवावी लागे; पण ब्रिटिश सत्ता हिंदुस्तानांत स्थापित झाल्यापासून कलकत्त्यामधील व आसपासच्या रहिवाशांनीं इंग्रजांच्या दानतीवर पूर्ण विश्वास ठेवून आपली मालमत्ता, ठेव ह्मणून त्यांच्या स्वाधीन केली आहे. पूर्वीच्या काळीं जमीनदार जास्त धारा बसेल या भीतीनें पुष्कळ जमिन पडिक ठेवीत असत. पण १७९३ सालीं जमिनीच्या धाऱ्याची कायमची पद्धत अमलांत आल्यापासून जमीन-दाराचा इंग्रजांच्या राजपद्धतीवर पूर्ण विश्वास बसून त्यांनीं पुष्कळ ओसाड जमिनींची लागवड करून तिचें उत्पन्न वाढ-

विलें आहे. ब्रिटिश सरकाराला आसपासच्या शत्रूंबरोबर जेव्हां युद्ध करावें लागलें, तेव्हां पुष्कळ श्रीमान् व कुलिन रहिवाशांनीं व जमिनदारांनीं इंग्रजांनां जय यावा ह्मणून मनोभावें ईश्वराची प्रार्थना केली आहे. कारण, त्यांची खात्री होती, कीं, ब्रिटिश राजसत्तेमुळें आपली मानसिक व सामाजिक स्थिति सुधारून आपल्या जीविताचें, धर्माचें आणि मालमत्तेचें रक्षण होईल. एवढेंच नाहीं, तर त्यांनीं इंग्रजांनां पैशांच्या रूपानेंहि पुष्कळ मदत केली आहे. कारण, इंग्रजांच्या जयावरच आपलें कल्याण अवलंबून आहे, हें त्यांनां समजून चुकलें होतें. इंग्रज सरकारानें देशामध्यें ज्या शिक्षणविषयक आणि राजकीय सुधारणा केलेल्या आहेत, त्यांचे गोडवे बंगालचे लोक नित्यशः गात आहेत, ही गोष्ट अगदीं स्पष्ट आहे. तेव्हां जो कोणी हिंदी लोकांनां अराजक ह्मणतो त्याला खरी वस्तुस्थिति माहित नसते, किंवा स्वतःच्या फायद्याकरितां तो खऱ्या स्थितीचा विपर्यास करून हिंदुस्तान सरकारचें व इंग्लंड सरकारचें मन कलुषित करीत असतो, ही गोष्ट आपल्या लक्ष्यांत आल्याशिवाय राहणार नाहीं. ब्रिटिश सरकारानें हिंदी लोकांकरितां शाळा, कॉलेजें वगैरे लोकोपयोगी संस्था काढून त्यांची स्थिति सुधारली आहे, ह्मणून त्यांची प्रीति इंग्रजांवर जडलेली आहे. छापण्याची कला हिंदुस्तानांत सुरू होऊन बरींच पुस्तकें बंगालीमध्यें निघालीं आहेत, व त्यांच्या वाचनानें लोकांचें ज्ञान वाढलें आहे. सध्यां बंगालीमध्यें दोन, आणि फारशीमध्यें दोन, अशीं

चार देशी वर्तमानपत्रें चालू आहेत. त्यामुळें लोकांचा पुष्कळ फायदा झाला आहे. इंग्रजी पत्राचा परिणाम ती भाषा पूर्णपणें माहित असणारावरच होता, ह्मणून त्याचा परिणाम एतद्देशीयांवर घडून त्यायोगें कायद्याचा किंवा शांततेचा भंग झालेला केव्हांहि दिसून आला नाहीं. घाटत असलेला कायदा जर पास झाला, तर प्रतिष्ठित श्रीमान् गृहस्थाला वर्तमानपत्र काढणें अशक्य होईल. कारण, तें काढण्यापूर्वीं त्याला ज्या अनेक शपथा घ्याव्या लागणार त्या घेण्यामध्यें त्याला कमीपणा वाटणें सहाजीक आहे. छापण्याच्या कलेला पूर्ण स्वातंत्र्य असेल तेव्हां राज्यकर्ते आणि प्रजा या दोघांचाहि जो कांहीं फायदा आहे, तो सांगतां पुरवत नाहीं. हा कायदा पास झाल्यानें ज्ञानाचा उगम एकदम थांबून लोकांची नैतिक आणि अध्यात्मिक स्थिति सुधारण्याचें बंद पडेल. ती सुधारण्यास पूर्वेकडील प्राचीन ऋषींच्या ग्रंथांचीं भाषांतरें होणें, व पाश्चात्यांच्या माहितीचा देशामध्यें वर्तमानपत्रांच्या द्वारां प्रसार होणें अगदीं अवश्य आहे. वर्तमानपत्राचें स्वातंत्र्य नष्ट केल्यानें जे कोणी एतद्देशीय लोक कायद्यामध्यें व ब्रिटिशराज्यपद्धतीमध्यें कुशल आहेत त्यांनां आपलें ज्ञान व ब्रिटिश राज्य किती उत्तम तऱ्हेनें चालू आहे, त्यानें लोककल्याणाकरितां कोणकोणते ठराव केले आहेत, व त्यायोगें देशाचें कितीतरी कल्याण होत आहे, ही गोष्ट आपल्या बांधवांनां कळविणें मुष्किलीचें होईल. शिवाय, निरनिराळ्या भागांमध्यें अधिकाऱ्यांच्या हातून जाणून किंवा नेणून ज्या चुका होतील त्या सर-

कारास समजविणारें साधन नाहींसे होईल, व शिवाय लोकांनां आपलीं गाऱ्हाणीं प्रामाणिकपणें आणि मोकळ्या मनानें इंग्लंडच्या राजाला कळवितां येणार नाहींत. असें होणें ह्मणजे उभयपक्षीं हितावह नाहीं. ब्रिटिश सत्ता हिंदुस्तानामध्यें दृढ झाल्यापासून हिंदी लोकांनां वर्तमानपत्रासंबंधीं जें स्वातंत्र्य दिलें आहे त्याचा दुरुपयोग झालेला केव्हांहि आढळून आलेला नाहीं. या स्वातंत्र्यावर गदा आणणें मोठ्या अन्यायाचें आहे. तेव्हां दयाळु होऊन हा कायदा करण्याला कोर्टानें संमति देऊं नये, व इंग्लंडमधील प्रत्येक इंग्रज मनुष्याला जें स्वातंत्र्य आहे तेंच हिंदुस्तानामध्येंहि असावें. हा कायदा पास करून हिंदी लोकांनां आजपर्यंत जें स्वातंत्र्य होतें तें नष्ट केल्यानें ईश्वरी योजनेनेंच आपण पाश्चात्यांच्या सत्तेखालीं आलों असें ह्मणण्यांत त्यांनां भूषण वाटणार नाहीं, व आपले हक्क शाबूत असून आपणांला त्यांचा उपभोग घेतां येईल, असें त्यांनां ह्मणतां यावयाचें नाहीं. प्रजा अज्ञानांत असेल त्या मानानें राज्यकर्त्यांचा अधिक फायदा आहे, ही जी आशिया खंडांतील पूर्वीच्या राजांची समजूत, ती ब्रिटिशसरकाराची नाहीं, हें आह्मी अर्जदार जाणून आहों. ही समजूत खोटी ठरल्याचीं पुष्कळ उदाहरणें आहेत. संधि मिळाल्याबरोबर अज्ञान लोकांनीं राजाच्या विरुद्ध बंड करून अनन्वित प्रकार केले आहेत. परंतु न्यायी राज्यपद्धति अमलांत असली ह्मणजे प्रजेची प्रीति राजावर जडलीच पाहिजे. कारितां घाटत असलेला कायदा कोर्टानें पास करूं नये, अशी अर्जदारांची विनंति आहे."

वरिष्ठ कोर्टाकडे पाठविलेल्या या अर्जाचा कांहीं उपयोग झाला नाहीं, तेव्हां राममोहनानें इंग्लंडच्या राजाकडे अर्ज पाठवून दाद मागितली. राममोहन किती व्यवहारकुशल व राजनीतिनिपुण होता हें त्यानें पाठविलेल्या अर्जावरून दृष्टोत्पत्तीला येतें. त्या अर्जाचा अल्प सारांश खालीं दिला आहे.

"ईश्वरी योजनेनेंच आमचें जीवित आपल्या हातामध्यें गेलें आहे, असें आह्मी समजतों. ह्मणून आमच्या जीवितांचें, आमच्या मालमत्तेचें आणि आमच्या धर्माचें रक्षण करणारे व आमच्या हक्कांची खालील अधिकाऱ्यांकडून पायमल्ली झाली असतांना दाद घेणारे आपणच दयाळु सरकार आहां, असें आह्मांला वाटत आहे. आजपर्यंत आह्मी निर्विघ्नपणें उपभोगीत असलेले हक्क स्थानिक अधिकाऱ्यांनीं आह्मांपासून हिरावून घेतले आहेत. त्या हक्कांचा आह्मीं कधींहि दुरुपयोग केलेला नसूनहि नुसत्या संशयानेंच ग्रासून जाऊन त्यांनीं अशा प्रकारचा कायदा पास केला. ब्रिटिश सत्ता बंगालमध्यें पूर्णपणें स्थापित होण्यापूर्वीं या देशावर पुष्कळ स्वाऱ्या होऊन आह्मां बंगाली लोकांचे जीव व मालमत्ता फार धोक्यामध्यें असे. त्या वेळींसुद्धां ब्रिटिशांविषयींची आमची राजनिष्ठा ढळली नाहीं. पुढें ब्रिटिश सत्ता पूर्ण स्थापित झाल्यावर आमच्या करितां आपण शाळा, कचेऱ्या वगैरे स्थापन करून पुष्कळ हक्क आह्मांला दिले, तेव्हां आह्मी आपणांस राज्यकर्ते एवढेंच ह्मणून रहात नाहीं, तर आपण आमचे संरक्षणकर्ते, मायबाप आहां, असें आह्मी समजतों. कोणत्याहि हिंदी वर्तमानपत्रानें आजपर्यंत सरकाराशीं विरोध उत्पन्न करणारा लेख लिहिलेला

नाहीं, हें 'फ्रेंड ऑफ इंडिया'सारख्या इंग्लिश मिशनरींनीं चालविलेल्या पत्रांवरूनहि कळून येतें. 'कलकत्ता जर्नल'च्या बकिंगहॅम नांवाच्या इंग्रज संपादकावर स्थानिक सरकारची इतराजी झाल्यामुळे गव्हरनर जनरलनें आपल्या इच्छेस बळी पडून ती तृप्त करण्याकरितां एकंदर सर्व मुद्रणकलेच्या स्वातंत्र्यावरच गदा आणली. स्थानिक सरकारानें पास केलेल्या कायद्यास वरिष्ठ कोर्टाकडून तो रजिस्टर होण्यास संमति मिळावी लागते; अशा प्रकारची संमति देण्यापूर्वी मुख्य न्यायाधिशानें लोकांचा पक्ष ऐकून घेऊन योग्य विचार करावा, अशा प्रकारचा कायदा पार्लमेंटानें पास केला आहे; पण वरिष्ठ कोर्टाचे मुख्य न्यायाधिश सर फ्रान्सिस मॅकनॅकटन यांनीं कांहीं झालें तरी 'मी तो कायदा पास करीन' अशा प्रकारचें वचन आधींच सरकाराला दिलें होतें, हें त्यांच्याच भाषणावरून कळून येतें. वरपांगी मात्र लोकांचें ह्मणणें ऐकून घेण्याचा आव त्यांनीं घांतला. आमच्या या अर्जावर जरी थोड्याच रहिवाशांच्या सह्या आहेत, तरी संख्येपेक्षां न्यायान्यायावरच आपली सर्व भिस्त आहे, हें आह्मी जाणून आहों. तेव्हां हा कायदा आपण रद्द करून इतःपर आमच्या हक्काची पायमल्ली स्थानिक सरकाराकडून याप्रमाणें होणार नाहीं असा बंदोबस्त कराल, अशी आह्मांला पूर्ण आशा आहे. आपलें व आमचें पितापुत्राचें नातें आहे असें आह्मी समजतों."

राजाकडे पाठविलेल्या या अर्जाचाहि कांहींएक उपयोग न होता १८२५ च्या नोवेंबरांत राजाच्या प्रिव्हीकौन्सिलनें अर्जदारांनां उत्तर पाठवून त्यांचा अर्ज नामंजूर केला.

हा कायदा पास झाल्यानंतर थोड्याच महिन्यांनीं मिरत-अल-अखबार पत्र राममोहनानें बंद केलें. काय ते एकंदर सोळाच महिने तें चालू होतें. अशा प्रकारचा कायदा आस्तित्वांत असतांना हें पत्र चालविणें फार कठिण आहे, असें त्या पत्राच्या शेवटच्या अंकांत झटलें होतें, व मी सरकारच्या अतिशय राजनिष्ठ प्रजेपैकीं एक असूनहि हें पत्र बंद करणें मला भाग पडलें ह्मणून त्यामध्यें दिलगिरी प्रदर्शित केली होती. राममोहनानें आपलें दुसरें वर्तमानपत्र ' संवाद कौमुदी ' हें मात्र बंद केलें नाहीं. त्याच्या मृत्यूनंतर देखील हें पत्र कांहीं वर्षें राहिलें.

प्रकरण पांचवें.

## स्वातंत्र्यप्रेम.

फ्रान्सच्या राज्यक्रांतीच्या वेळीं फ्रान्सला स्वातंत्र्य मिळावें अशी राममोहनाची मनापासून इच्छा होती. १८३० च्या जुलई महिन्यांत फ्रान्समध्यें तीन दिवस राज्यक्रांतीची झटापट सुरू आहे अशी बातमी जेव्हां कलकत्त्यास पसरली, तेव्हां तिचा निकाल होई-पर्यंत राममोहनाचें सारें लक्ष्य सारखें तिकडे लागून राहिलें होतें.

इंग्लंडला जात असतांना केप ऑफ गुड होप येथें एका फ्रेंच जहाजावर स्वातंत्र्याचा बावटा फडकत असलेला त्याच्या दृष्टीस पडला. एका शिडीवरून पडण्याच्या अपघातामुळें त्याला जबर इजा झाली होती, व तो लंगडत लंगडत चालत होता, तथापि त्या जहा-जावर जाऊन आपला आदरभाव व्यक्त करण्याचा त्यानें आग्रह धरून तो तेथें गेला. तें निशाण पाहून त्याला नवजीवन प्राप्त झाल्या सारखें वाटूं लागलें. फ्रेंच लोकांनीं त्याचा मोठा सन्मान करून त्याला तेथील निशाणाखालीं नेलें. फ्रान्सचा जयजयकार असो असें मोठ्या आनंदानें म्हणत राममोहन परत आला. तितक्या अवकाशांत त्याल आपल्या दुःखाचें मुळींच भान नव्हतें. स्वातंत्र्याचा विजय झालेल ऐकून इतका त्याला आनंद झाला होता !

स्पेन देशामध्यें राज्यप्रकरणीं फार अव्यवस्था होऊन तंटेबखेडे चालले होते, त्यामुळें सर्व देशभर कायदे, नियम व व्यक्तिस्वातंत्र्य यांचा कांहींच धरबंध न राहून सर्वत्र झोटिंगपाच्छाई चालली होती परंतु त्या सर्व बेबंदशाहीचें निवारण होऊन पुनः सुव्यवस्था होऊन स्पेनमध्यें लोकसत्तात्मक राज्य जेव्हां स्थापन झालें, तेव्हां त्य

आनंदानिमित्त कलकत्त्याच्या टाऊन हॉलमध्यें राममोहन व त्याचा मित्र द्वारकानाथ यांनीं मिळून एक भोजन समारंभ केला.

राममोहनाविषयीं मि. डिग्बी हे आपल्या एका पत्रांत ह्मणतातः—

"माझीं सर्व कागदपत्रें लक्ष्यपूर्वक वाचून पाहून आणि इंग्रज लोकांशीं भाषण व पत्रव्यवहार करून राममोहनाला इंग्लिश भाषेचें ज्ञान इतकें झालें होतें, कीं, तो ती शुद्ध रीतीनें बोलूं व लिहूं लागला. त्याला इंग्लिश वर्तमानपत्रें वाचण्याची फार आवड असे, आणि त्यांत यूरोपांतील राज्यप्रकरणाविषयीं जें लिहिलेलें असे तें वाचून त्याला विशेषच आनंद होई. त्यावरून फ्रान्स देशाचा माजी राजा बोनापार्ट याची बुद्धि आणि पराक्रम यांविषयीं त्याच्या मनांत असा विचार भरून गेला, कीं, त्यापुढें त्या राजाचीं क्रूर आणि जुलमाचीं कर्में त्याला दिसेनाशींच झालीं; आणि सरशेवटीं जी अवस्था त्याला प्राप्त झाली तिजविषयीं त्याला फारच वाईट वाटलें. परंतु तो दुःखाचा लोट आणि समय गेल्यावर ज्यामुळें पुढें तो पदच्युत झाला ती त्याची वर्तणूक इतकी अयोग्य होती असें त्याला वाटूं लागलें, कीं, आपण बोनापार्टाची जितकी स्तुति केली, तितकीच त्याची निंदा करणें योग्य आहे, असें त्यानें बोलून दाखविलें."

राममोहन विलायतेला जात असतांना वाटेंत लॉर्ड ग्रे यांच्या जागीं (१८३० नोवेंबर) ड्यूक ऑफ वेलिंग्टन हे इंग्लंडचे मुख्य प्रधान झाले, ही बातमी ऐकून त्याला फार आनंद झाला. त्या दिवशीं त्याला दुसरा विषयच नव्हता. हिंदुस्तानचें आतां कल्याण होण्याचा संभव आहे, अशा विचारानेंच त्याला इतका आनंद झाला होता.

इंग्लंडमध्यें असतांना रिफॉर्म बिलाचें तिसरें वाचन १८३२ च्या मार्चमध्यें चालू असतां सर्व इंग्लंडचें त्याकडे सारखें लक्ष्य लागून राहिलें होतें. त्यापूर्वी तें दोनदां लॉर्डांच्या सभेनें फेंटाळून लावल्या-

मुळें या वेळींहि तसेंच झालें तर देशामध्यें अस्वस्थता उत्पन्न होऊन कदाचित् लढाईहि होण्याची भीति वाटत होती. हें बिल पास व्हावें अशी राममोहनाची मनापासून इच्छा होती. ता. ३१ मार्च रोजीं त्यानें मिस किडल इला एक पत्र लिहून कळविलें, कीं " हें बिल पास झाल्यानें नुसतें इंग्लंडचेंच कल्याण होणार आहे असें नव्हे, तर त्यावर सर्व जगाचें कल्याण अवलंबून आहे. या बिलाच्या निकालाची मी सारखी वाट पहात आहें. "

ता. २७ एप्रिल रोजीं मिसेस वुड इला लिहिलेल्या पत्रांत राममोहन ह्मणतो " हें भांडण नुसतें सुधारक व दुर्धारक यांमधीलच नव्हे, तर सर्व जगांतील स्वतंत्रता व जुलूम, न्याय व अन्याय, सत्य व असत्य यांमधील होय. "

पुढें जूनमध्यें तें बिल पास झाल्यानंतर ता. ३१ जुलई रोजीं त्यानें राथबोनसाहेबाला पत्र लिहून ह्मटलें " मोठा जोराचा विरोध असतांहि शेवटीं सत्याचा जय होऊन हें बिल पास झालें, तेव्हां आतां मात्र मी आपलें व लिव्हरपूलमधील माझ्या इतर मित्रांचें मनःपूर्वक अभिनंदन करितों. गेल्या अर्ध शतकभर गरीब लोकांच्या जिवावर थोड्या श्रीमंत लोकांच्या तुंबड्या भरून गरीब लोकांना निकृष्टावस्था प्राप्त झाली होती-नव्हे त्यांचा नाश होत चालला होता. तें आतां सर्व बंद झालें. प्रधानमंडळानें प्रामाणिकपणें लोकांना त्यांचे हक्क मिळवून देण्यास मदत केली. हें बिल पास झालें नाहीं, तर मी माझा या देशाशीं असलेला सर्व संबंध तोडून टाकणार अशी मीं शपथ घेतली असल्यामुळें मीं आपणाला किंवा लिव्हरपूलमधील कोणाहि मित्राला इतके दिवस पत्र लिहिलें नाहीं. आतां तुमचा एक बांधव ह्मणून ह्मणवून घेण्यामध्यें मला अभिमान वाटत आहे. अनन्वित छळापासून सर्व जगाची मुक्तता झाली, हें पाहून मला जो कांहीं आनंद झाला आहे तो सांगतां पुरवत नाहीं. "

# राजा राममोहन राय.

नेपल्स येथील लोकांनीं आपल्या जुलमी राजापासून व्यवस्थेशीर राज्यपद्धति प्राप्त करून घेतल्यानंतर रशिया, प्रशिया, ऑस्ट्रिया, सारडानिया व नेपल्स या देशच्या राजांच्या हुकुमानें ऑस्ट्रियन सैन्यानें परत त्यांनां चिरडून टाकून गुलामगिरीमध्यें टाकलें, हें जेव्हां राममोहनानें ऐकिलें तेव्हां त्याला अतिशय दुःख झालें. ता. ११ ऑगस्ट १८२१ रोजीं बकिंगहॅमसाहेबाला लिहिलेल्या पत्रांत तो म्हणतो:—

" नेपल्सहून आलेल्या ताज्या दुःखकारक बातमीनें मला अतिशय दुःख झालें आहे. सर्वत्र यूरोपभर व एशियाभर स्वातंत्र्य स्थापित झालेलें पहाण्याचें माझ्या नशिबीं आहे, असें मला वाटत नाहीं. नेपल्स येथील लोकांचें हिताहित तें माझें आहे म्हणून त्यांचे शत्रु ते माझेहि शत्रु होत, असें मला वाटतें. स्वातंत्र्याला विरोध करणारे व जुलमी राज्याचे कैवारी यांनां कायमचा जय कधींहि मिळालेला नाहीं, व पुढेंहि मिळणार नाहीं."

प्रकरण सहावें.

# देशाभिमान.

हिंदुस्तानांत असतांना व पुढें इंग्लंडाला गेल्यावर राममोहनानें हिंदुस्तानची राजकीय स्थिति सुधारण्याकरितां पुष्कळच प्रयत्न केले.

१८२७ मध्यें राममोहनानें सरकारच्या तत्कालिन राज्यपद्धतीवर कडक टीका केली. १८२६सालीं हिंदुस्तानाकरितां ह्मणून एक ज्यूरीबिल पास झालें, व तें १८२७ च्या आरंभीं अमलांत आलें. वजनदार हिंदु आणि मुसलमान लोकांच्या सह्या घेऊन राममोहनानें दोन निरनिराळे अर्ज हॉउस ऑफ कॉमन्स आणि हॉउस ऑफ लॉर्डस यांच्याकडे पाठविले. हिंदुस्तानासारख्या देशांत हिंदु व मुसलमान यांच्यामध्यें मत्सर उत्पन्न होण्याजोगा कायदा करणें हें अन्यायाचें व अविवेकाचें आहे, असें त्या अर्जांत स्पष्ट ह्मटलें होतें.

ता. १५ आगष्ट १८२८ रोजीं राममोहनानें जे. क्राफर्ड यांनां लिहिलेल्या पत्रामध्यें या बिलाविषयीं ह्मटलें आहेः—

" बोर्ड ऑफ कंट्रोलचे अध्यक्ष विनसाहेब यांनीं ज्यूरीबिल पास केल्यामुळें या देशांतील लोकांमध्यें असंतोष उत्पन्न होईल, यांत नवल नाहींच; पण राजकीय धोरणाची ज्यालाज्याला ह्मणून माहिती आहे, त्यालात्याला या बिलाच्या योगें भीति वाटल्याशिवाय रहाणार नाहीं. या बिलाच्या योगें कोणाहि हिंदु किंवा मुसलमान गृहस्थाचा खटला एकाद्या यूरोपिअन किंवा ख्रिती ज्युररपुढें चालण्याला हरकत नाहीं. पण एकाद्या यूरोपियनाचा किंवा ख्रिश्चनाचा खटला मात्र कितीहि वरिष्ठ प्रतीच्या हिंदु किंवा मुसलमान ज्यूररपुढें चालण्याची

बंदी केली आहे. हिंदूंचा किंवा मुसलमानांचा खटला चालू असतां ग्रांड ज्यूरीमध्यें एकादा हिंदु किंवा मुसलमान असतां कामा नये, असाहि निर्बंध या बिलामध्यें घातला आहे."

यूरोपिअन लोकांनीं हिंदुस्तानामध्यें वसाहती करून रहावें, अशी राममोहनाची फार इच्छा होती. बंगालमध्यें निळीची लागवड करणाऱ्या यूरोपिअन लोकांविरुद्ध हिंदी लोकांनीं जेव्हां ओरड चालविली, तेव्हां राममोहन मोठ्या धैर्यानें पुढें आला व त्यानें यूरोपिअनांनां मदत केली. आपल्या **'संवाद कौमुदी'** वर्तमानपत्रामध्यें वारंवार लेख लिहून त्यानें स्पष्टपणें लोकांच्या निदर्शनाला आणून दिलें, कीं, निळीच्या लागवडीमुळें पुष्कळ ओसाड जमिनी ज्या वर्षानुवर्षें तशाच पडून राहिल्या होत्या, त्यांची लागवड सुरू झाली, व त्यामुळें कामकरी वर्गाची स्थिति बरीच सुधारली आहे. शेतकऱ्यांनां लागवडवाल्यांकडून चांगलें वेतन मिळूं लागल्यामुळें ते जमिनदारांच्या कचाट्यांतून सुटले आहेत. ज्या मानानें यूरोपिअन या देशामध्यें वसाहत करून राहतील, त्या मानानें जास्तजास्त जमिनींची लागवड होऊं लागेल व गरीब व मध्यम वर्गाची स्थिति सुधारूं लागेल.

नॅथ्यानिअल अलेक्झांडर यांनीं विचारलेल्या प्रश्नाला राममोहनानें ता. १२ नोव्हेंबर १८२९ रोजीं एक पत्र लिहून खालीलप्रमाणें उत्तरें दिलीं आहेत:—

"निळीची किंमत वाढल्यामुळें वसाहतवाल्यांनीं आपल्या कारखान्यांमधील मजुरांची मजुरीहि वाढविली आहे. या वसाहतवाल्यांकडून गरिबांचें जितकें कल्याण झालें आहे, तितकें दुसऱ्या कोणापासूनहि झालेलें नाहीं. हिंदुस्तानामध्यें किंवा यूरोपमध्यें वरील प्रकारचें विधान करण्याला मी केव्हांहि भिणार नाहीं! अशी जरी गोष्ट आहे, तरी मला हें कबूल करणें भाग आहे, कीं, कांहीं वसाहत-

वाल्यांकडून त्यांच्या हाताखालील मजुरांना जशा प्रकारची वागणूक मिळावयाला पाहिजे तशी मिळत नाहीं, ते त्यांना फार कडक रीतीनें वागवितात, व दुसऱ्या रीतीनेंहि त्यांचा छळ करितात; परंतु हें ध्यानांत ठेवावयाला पाहिजे, कीं, थोडासा अन्याय झाल्याशिवाय कोणतीहि मोठी कल्याणाची गोष्ट होणें शक्य नाहीं. या बाबतींत तोट्याच्या मानानें फायदा अतिशय आहे. वसाहतवाल्यांनीं मजुरांची कड घेऊन पुष्कळ वेळां जमिनदारांपासून त्यांचें रक्षण केलें आहे. तेव्हां त्यांचा हिंदुस्तानांतून नायनाट व्हावा, असें जमिनदारांशिवाय दुसऱ्या कोणालाहि वाटणार नाहीं."

यूरोपियनांनां वसाहत करून राहण्याला जे प्रतिबंध होते, ते काढून टाकण्याकरितां ता. १५ दिसेंबर १८२९ सालीं कलकत्त्याच्या टाऊन हॉलमध्यें जेव्हां एक सभा भरली होती, तेव्हांहि राममोहन हजर होता, व त्या वेळीं मुद्देसूद भाषण करून त्यानें वसाहतवाल्यांची बाजू घेतली. तो ह्मणालाः—

"मी स्वतःच्या अनुभवावरून असें ह्मणण्याचें धाडस करितों, कीं, आमचा व पाश्चात्यांचा ज्या मानानें अधिक निकट संबंध जुळेल, त्या मानानें आमची सामाजिक, राजकीय व शिक्षणविषयक स्थिति सुधारेल. ज्यांचा ह्मणून पाश्चात्यांशीं परिचय झालेला आहे, त्यांची स्थिति इतरांच्या मानानें पुष्कळच सुधारलेली आहे. यावरून वरील गोष्ट सिद्ध होते."

याप्रमाणें निळीची लागवड करणारांची बाजू उचलून धरून राममोहन आपल्या लोकांच्या विरुद्ध भांडला; पण त्या वेळीं वडिलोपार्जित मिळकतीच्या कायद्यासंबंधानें ब्रिटिश कोर्टाचें जें धोरण होतें, त्याविरुद्ध त्यानें चळवळ चालविली. १८२९–३०च्या सुमाराला वरिष्ठ कोर्टाचे मुख्य न्यायाधीश सर सी. ई. ग्रे यांनीं बंगालमधील

वडिलोपार्जित मिळकतीसंबंधाचा जो कायदा होता त्याला हरताळ लावण्याचा प्रयत्न केला. तेव्हां १८३० मध्यें राममोहनानें बंगालच्या कायद्याप्रमाणें वडिलोपार्जित मिळकतीवरील हिंदु लोकांचे हक्क (The rights of Hindus over ancestral property according to the law of Bengal.) हें पुस्तक लिहून त्यामध्यें असें प्रतिपादन केलें, कीं "वडिलोपार्जित वारशाच्या कायद्यासंबंधानें मिताक्षर व दायभाग हे दोन ग्रंथ हिंदुस्तानामध्यें विश्वसनीय मानलेले आहेत. त्यांत मिताक्षरामध्यें सांगितलेले कायदे हिंदुस्तानामध्यें बऱ्याच ठिकाणीं लागू आहेत; पण दायभागांतील कायद्यांचें वर्चस्व बंगालमध्यें फार आहे. दोन्ही पुस्तकांतील कायद्यांमध्यें पुष्कळ फरक आहे, व कित्येक ठिकाणीं तर एकांतील कायदा दुसऱ्याच्या अगदीं विरुद्ध आहे. मिताक्षराप्रमाणें आपल्या वडिलोपार्जित मिळकतीची विल्हेवाट लावतांना एकाद्याला आपल्या मुलाचें व नातवाचें अनुमोदन घेणें भाग आहे; पण दायभागाप्रमाणें त्याला त्या मिळकतीची विल्हेवाट त्याच्या मनाला येईल त्याप्रमाणें लावतां येते. दायभागांत सांगितलेले कायदे सर्व बंगालदेशामध्यें ३०० वर्षांपासून प्रचारांत असतांना त्या कायद्याविरुद्ध आपला निकाल देऊन ब्रिटिश न्यायाधिशांनीं त्या कायद्याची पायमल्ली केली आहे. नीतीच्या तत्त्वाला अनुसरून आह्मीं हें केलें, नीतीस विरोध करणारा कायदा आह्मी रद्द करणार, असें जर त्यांचें ह्मणणें असेल, तर मी असे विचारतों, कीं, दारू व दुसरे अमली पदार्थ हे शरीरास फार अपायकारक आहेत, व कधींकधीं त्यायोगें मृत्युदेखील येतो. तेव्हां ते विकण्याला परवाना देणें हें अनितीचें आहे. हें जरी खरें आहे, तरी सरकारानें बसविलेला कर न्यायाचा नसल्यामुळें त्याचे पैसे देतां कामा नये, असें ह्मणणें वाजवी होईल काय?"

या पुस्तकाचा सदर दिवाणी अदालत यांच्या मनावर बराच परिणाम होऊन त्यांनीं सन १८३१ मध्यें दायभागांतीलच कायदा पास केला, व नंतर प्रिव्ही काउन्सिलमध्येंदेखील तो पास झाला.

राजकीय हक्क मिळविण्याकरितां राममोहनानें फारच परिश्रम घेतले. लोकांच्या वतीनें भांडण्याकरितां तो त्या वेळींदेखील इंग्लंडाला गेला. तेथें त्याच्या जाण्यानें राज्यकारभारांत बरीच सुधारणा झाली. लोकांची बाजू तेथील मुत्सद्दयांच्या स्पष्टपणें नजरेला आणून देणें हा एक त्याचा उद्देश इंग्लंडाला जाण्यामध्यें होता, व तो चांगल्या रीतीनें पार पडला. त्याचा एक इंग्रज चरित्रकार ह्मणतोः—

" राममोहन येण्यापूर्वी पूर्वेकडील लोकांच्या विद्वत्तेविषयीं इकडील लोकांनां माहिती नव्हती.हे जित लोक नेभळे नसून त्यांची वृत्ति बाणेदार आहे,ते बुद्धिवान् व भक्तिवान् आहेत, हें राममोहनानें येथील लोकांच्या दृष्टीला आणून दिलें."

इंग्लंडमध्यें त्यानें हिंदुस्तानच्या कल्याणाकरितां तीन वर्षें अहोरात्र झटून मेहनत केली. ईस्ट इंडियन कंपनीचा परवाना पुढें चालू करावा कीं नाहीं, हा विचार चालू असतां राममोहन तेथें गेला. हिंदुस्तानचा राज्यकारभार चांगल्या रीतीनें चालविण्याला कंपनीस भाग पाडावें,अशा प्रकारचीं पुष्कळ कलमें त्या परवान्यामध्यें घालण्याविषयीं राममोहनानें पार्लमेंटाला आग्रहाची विनंती केली. १८३१ मध्यें नेमलेल्या हॉउस ऑफ कॉमन्सच्या एका निवडक कमिटीपुढें त्याला साक्षीस बोलाविलें. तें ह्मणणें जरी त्यानें कबूल केलें नाहीं, तथापि निबंध लिहून हिंदुस्तानसंबंधाची माहिती त्यानें वेळोवेळीं कमिटीला कळविली. न्यायखातें आणि मुलकीखातें यांच्या पद्धतीसंबंधानें त्यानें जे दोन निबंध लिहिले आहेत, ते इतके विचारपरिप्लुत आहेत,कीं आज देखील त्याबद्दल सर्वांनां मान डोलवावी लागते.

हे दोनही निबंध भरपूर व चोख माहितीनें भरलेले आहेत. न्याय-खात्याचें दप्तर फारशी भाषेऐवजीं इंग्रजींत असावें, मुलकी खात्यांत एतद्देशीय असेसरांना नेमावें, गुन्हेगारांची चौकशी ज्यूरी-कडून व्हावी, जज्ज व रेव्हिन्यु कमिशनर, आणि जज्ज व मॅजिस्ट्रेट यांचीं खातीं निरनिराळीं व्हावीं, कायदे करण्यापूर्वीं लोकांचीं मतें घ्यावींत वगैरे अनेक उपयुक्त सूचना त्यानें पार्लमेंटाला केल्या. तो स्वतः जरी जमिनदार होता, तरी जमिनदारांविरुद्ध रयतेच्या बाजूचें त्यानें समर्थन केलें. त्यानें असें सिद्ध करून दाखविलें, कीं, १७९३ च्या कायम धाऱ्याच्या पद्धती ( Permanent settlement ) मुळें जमिनदारांचा फायदा झाला आहे; पण रयतेची स्थिति अधिक शोचनीय झाली आहे.कारण जमिनदाराला आपल्या कुळाकडून जास्ती धारा घेण्याची मोकळीक ठेवलेली आहे. त्यांची स्थिति सुधारण्याला त्यानें दोन उपाय सुचविले. सध्यां धारा आहे तो इतःपर वाढवूं नये हा एक उपाय, व जमिनदाराकडून सध्यां सरकाराला जो वसूल येतो तो कमी करणें हा दुसरा उपाय. असें झालें म्हणजे जमिनदारालाहि कुळाकडून कमी धारा घेतां येईल, असें त्यानें प्रतिपादिलें आहे.

१८३१ च्या सप्टेंबरच्या १९ व्या तारखेला राममोहनानें एक निबंध लिहून न्यायखात्यांतील पद्धतीविषयीं विचारलेल्या ७८ प्रश्नांस जीं उत्तरें दिलीं आहेत, त्यांपैकीं कांहीं सारांशरूपानें पुढें दिलीं आहेतः—

**प्रश्न**—सध्यांच्या पद्धतीमुळें योग्य न्याय मिळण्यासारखा आहे काय?

**उत्तर**—१७९३ सालीं लॉर्ड कॉर्नवालिस यानें जी न्यायपद्धति अमलांत आणिली, ती देशाच्या स्थितीला योग्य अशी आहे. मात्र

पुरेसे लायक़ असे न्यायाधिश या खात्यामध्यें असावयास पाहिजेत, व कायद्यामध्यें योग्य सुधारणा झाली पाहिजे.

**प्रश्न**—मग व्यवहारदृष्टीनें या पद्धतीमध्यें कोणते दोष आहेत ?

**उत्तर**—पुरेसे न्यायाधिश व मॅजिस्ट्रेट या खात्यांत नाहींत. जे आहेत त्यांपैकीं पुष्कळ परकीय भाषेमध्यें काम चालविण्यास नालायक आहेत. सहजरीतीनें उपयोगांत आणण्यासारखे कायदे अस्तित्वांत नाहींत.

**प्रश्न**—पुरेसे न्यायाधिश नसल्यामुळें कोणतें संकट ओढवतें हें तुह्माला सांगतां येईल काय ?

**उत्तर**—कोर्टांची संख्या कमी असल्यामुळें दूरदूरच्या गरीब रहिवाशांवर जेव्हां श्रीमंतांकडून अन्याय होतो, तेव्हां आपली दाद लावून घेणें त्यांनां फार प्रयासाचें होतें. शिवाय, कोर्टामध्यें इतकें काम तुंबून रहातें, कीं, एकाद्या खटल्याचा निकाल वर्षानुवर्षें लागत नाहीं. पुढें अपिल केलें असतां आणखी कांहीं वर्षें जातात व त्यामुळें बराच खर्च होतो. यायोगें गुन्हेगारांनां उत्तेजन मिळतें, व गरिबांची निराशा होते. शिवाय न्यायाधिशाचें दप्तर परकीय भाषेमध्यें असल्यामुळें तो कितीहि हुषार असला, तरी हा वाढलेला कामाचा बोजा त्याला इतका असह्य वाटतो, कीं, तो कमी करण्याकरितां त्यांतील कांहीं कामें तो आपल्या हाताखालील हिंदी अंमलदाराकडे पाठवितो. या कामीं ते जबाबदार नसल्यामुळें व त्यांचें वेतन फार भिकार असल्यामुळें त्यांनां त्या कामाची बिलकूल आस्था वाटत नाहीं.

**प्रश्न**—योग्य न्यायाधिकारी नसल्यामुळें कोणतें संकट ओढवतें ?

**उत्तर**—कंपनीचे पुष्कळ न्यायाधिश हुषार, प्रामाणिक व न्यायप्रिय आहेत, यांत शंका नाहीं; पण देशांतील लोकांच्या कायद्यांचा

त्यांना चांगला परिचय नसल्यामुळें, आणि परकीय भाषेंत कोर्टाचें सर्व काम चालत असल्यामुळें, त्यांना आपल्या हाताखालील देशी अंमलदारावर सर्वस्वी अवलंबून रहावें लागतें, किंवा तर्क करावा लागतो. देशी अंमलदारांचा दर्जा व वेतन भिकार असल्यामुळें ते या गोष्टींत मन घालीत नाहींत, व शिवाय योग्य न्याय मिळत आहे कीं नाहीं याविषयीं ते बेजबाबदार असतात. तर्कावर रचलेल्या गोष्टीमध्यें चूक असण्याचा संभव आहे. तथापि असे थोडे न्यायाधिश आहेत, कीं त्यांनां कोर्टाच्या भाषेचें व देशांतील कायद्यांचें चांगलें ज्ञान असून त्यांनीं योग्य न्याय दिलेला आहे.

**प्रश्न**—योग्य कायदे अस्तित्वांत नसल्यामुळें न्याय मिळण्याला कोणती हरकत होते ?

**उत्तर**—सन १७९३ पासून वरचेवर कायद्यांमध्यें जे फेरफार होत आहेत, ते इतके संदिग्ध आहेत, कीं, त्याचा खरा अर्थ समजण्याची मारामार पडते. आणि हिंदु व मुसलमान यांच्यासंबंधीचे कायदे निरनिराळ्या पुस्तकांमध्यें असल्यामुळें न्यायाधिशाला त्यांचें विवरण करण्याच्या कामीं आपल्या देशी वकिलाचें साहाय्य घ्यावें लागतें. वकिलावकिलांच्या अर्थांमध्यें फरक पडत असल्यामुळें न्यायाच्या बाबतींत पुष्कळ घोंटाळा होतो.

**प्रश्न**—कोर्टाचें काम कोणत्या भाषेंत चालत असतें ?

**उत्तर**—बहुतकरून फारशी भाषेंत. ती मुसलमानाच्या वेळीं कोर्टाची भाषा होती.

**प्रश्न**—न्यायाधीश, पक्षकार, साक्षीदार यांनां ही भाषा सहज समजण्यासारखी आहे काय ?

**उत्तर**—ती सर्वांनांच परकी आहे; पण कांहीं न्यायाधिशांनां व थोड्या पक्षकारांनां ती चांगली समजते.

**प्रश्न**—फारशीऐवजीं इंग्रजी भाषा सुरू करणें श्रेयस्कर होईल काय ?

**उत्तर**—ती तर न्यायाधिशांचीच भाषा. पण पक्षकारांनां फारशी-प्रमाणेंच ती परकीय वाटेल. तथापि आस्तेआस्ते त्या भाषेचा जसजसा जास्त अभ्यास होईल, तसतशी त्यांनां ती भाषा फायदेशीर वाटूं लागेल.

**प्रश्न**—न्यायाधिशांनां पैसे उसने देण्याची भुरळ देशी लोकांनां कां पडते ?

**उत्तर**—लोकांच्या गुणांचें चीज सरकाराकडून मध्यस्थीशिवाय होण्यासारखें नसल्यामुळें ते तसें करितात. न्यायाधिशाच्या हाताखालीं बऱ्याच जागा असतात व त्या जागांवर आपल्या आप्ताला किंवा मित्राला नेमण्यास विनंति करितां यावी ह्मणून ही लालूच असते. केव्हांकेव्हां स्वतःच्या इस्टेटीसंबंधानें फायदा व्हावा अशी कित्येकांची इच्छा असते. न्यायाधिशाला कैदेची—नव्हे फांशीची शिक्षा देतां येते, तेव्हां त्याची इतराजी न व्हावी ह्मणून कित्येकजण त्याची मर्जी संपादन करीत असतात.

१८३१ सालीं हिंदुस्तानांतील राज्यकारभारासंबंधानें एक बिल पार्लमेंटपुढें आलें. हिंदुस्तानच्या कल्याणाविषयींचे कित्येक कागदपत्र कमिटीपुढें मांडण्यांत राममोहनाचा बराच वेळ गेला. जमाबंदीची पद्धत, जमिनीचा सारा, जमिनीची स्थिति, शेतकऱ्यांची स्थिति वगैरेंविषयीं कमिटीच्या सभासदांनीं विचारलेल्या प्रश्नांस राममोहनानें दिलेलीं उत्तरें व त्यानें लिहिलेले अनेक कागदपत्र त्या कमिटीनें आपल्या रिपोर्टाला जोडले आहेत.

ता. १९ आगस्ट सन १८३१ सालीं जमाबंदीच्या पद्धतीसंबंधानें ५४ प्रश्नांनां उत्तरें लिहून राममोहनानें तो निबंध कमिटीकडे पाठविला. त्यांपैकीं दोन प्रश्न उत्तरांसह सारांशरूपानें पुढें दिले आहेत.

**प्रश्न पहिला**–सध्यांच्या बंगालमधील जमिनदारीपद्धतीमुळें व मद्रासमधील रयतवारी पद्धतीमुळें शेतकऱ्यांची स्थिति कशी काय आहे ?

**उत्तर**–दोनहि पद्धति अमलांत असल्यामुळें शेतकऱ्यांची स्थिति फार कष्टमय झाली आहे. पहिल्या पद्धतीमुळें त्यांनां जमिनदाराच्या लोभाला व महत्त्वाकांक्षेला बळी पडावें लागत आहे, व दुसऱ्या पद्धतीमुळें सरव्हेअर व दुसरे इतर सरकारी मुलकी अमलदार यांचा त्यांच्यावर जुलूम होत आहे. दोघांच्याहि स्थितीबद्दल मला अनुकंपा वाटते. जमिनीचा सारा ठरविण्यामध्यें सरकारानें जमिनदारांनां पुष्कळ सवलत दिली आहे; पण त्या सवलतीचा यत्किंचित्‌हि फायदा गरिब शेतकऱ्यांनां मिळत नाहीं. भरपूर पीक येऊन धान्याची किंमत जेव्हां उतरते, तेव्हां जमिनदारांच्या साऱ्याची भरपाई करितांकरितांच कुळाला आपलें सर्व धान्य विकावें लागतें, व स्वतःच्या उपजीविके-करितां व बीं विकत घेण्याकरितां त्याजवळ कांहीं उरत नाहीं.

**प्रश्न दुसरा**—शेकऱ्यांची व साधारणपणें सर्व राहिवाशांची स्थिति सुधारण्याकरितां तुह्मी कोणत्या गोष्टी सुचवितां ?

**उत्तर**—गेलीं चाळीस वर्षें नवीन पद्धत सुरू असल्यामुळें जमिन-दारांनां आपल्या जमिनींचा विस्तार किती आहे हें कळून चुकलें आहे, व त्याप्रमाणें वरचेवर त्यांनीं आपल्या कुळांवर साऱ्याचें प्रमाण वाढविलें आहे. तेव्हां यापुढें कांहीं झालें तरी जमिनदारानें जमिनींचा धारा अधिक वाढवूं नये, अशाबद्दल सरकारानें योग्य खबरदारी घ्यावी, एवढा मात्र उपाय मला सुचवितां येईल.

अशा प्रकारचीं उत्तरें देऊन शिवाय राममोहनानें एक परिशिष्ट त्यांस जोडलें आहे. त्यामध्यें तो ह्मणतोः—

## देशाभिमान.

" कायमच्या धाऱ्याच्या पद्धतीमुळें सरकारचा व जमिनदारांचाहि फायदा झालेला आहे. ही पद्धत सुरू झाल्यापासून ह्मणजे सन १७९३ पासून पूर्वीपेक्षां जमिनीचा सारा अधिक सुलभतेनें सरकाराला मिळत आहे. पूर्वी सरकार आपल्या जमिनींवर अधिक सारा बसवील ह्मणून शेतकरी लोक आपल्या जमिनींपैकीं बऱ्याच जमिनींची मशागत करीत नसत. यायोगें शेतकऱ्यांचें नुकसान होत असे, व सरकाराला त्या जमिनींची व्यवस्था करण्यास किंवा धारा न आल्यास ती विकण्याच्या बाबतींत फार गैरसोय होत असे. १७९३ सालापासून जमिनीच्या मालकांस किंवा सरकाराला जमिनी विकणें झाल्यास तिच्या किंमतीचें मान फार वाढलें आहे. तिची किंमत दसपटीनें व केव्हां-केव्हां तर वीसपटीनेंहि वाढली आहे. शेतकरी पडित जमिनीचीहि लागवड करूं लागले व जमिनदारांनां त्यांच्यापासून जास्त भाडें मिळूं लागलें, ह्मणूनच ही वाढ झालेली आहे. देशांत पैशाची वाढ झाली ह्मणजे मालमत्तेमध्यें सुधारणा न होऊनहि तिची किंमत जास्त होते, ही गोष्ट खरी; पण शहरांशिवाय इतर ठिकाणचें दारिद्र्य लक्ष्यांत घेतां देश धनिक झाला असें ह्मणतां येणार नाहीं. १८१४ सालापासून व्यापाराच्या दळणवळणामुळें बंगालची संपत्ति वाढून तीमुळें जमिनींत उत्पन्न होणाऱ्या मालाची किंमत वाढली आहे असें ह्मणावें, तर व्यापार करणारे व जमिनदार हेच काय ते व्यापारानें गबर झाले आहेत. कायमच्या धाऱ्याच्या पद्धतीमुळें जमिनदाराचा फायदा झाला आहे, हें मुलकी खात्याच्या रजिस्टरांवरून कळून येईल. पूर्वी ज्या जमिनीची लागवड होत नव्हती, तिची आतां होऊं लागली आहे, व ह्मणून त्याला त्या जमिनीबद्दल कुळांकडून भाडें मिळतें व वेळोवेळीं त्यानें १७९३ पासून कुळांवरील भाडें वाढविलें आहे. या दोन कारणांनीं त्यांचें उत्पन्न वाढलें आहे. जास्त जमिनीच्या लागवडीमुळें वाढलेल्या

उत्पन्नाबद्दल कोणालाहि आनंद वाटेल, कारण कोणालाहि त्याच्या श्रमाबद्दल मोबदला मिळणें योग्य आहे; पण सरकारानें जमिनदारांवर एकदां जो धारा ठरविला, तो कायमचा कायम. जमिनदारानें मात्र वाटेल तेंव्हां वाटेल तितकें भाडें कुळांवर लादावें, या गोष्टीची चौकशी होणें जरूर आहे. जमिनदारानेंहि आपल्या कुळांवरील भाडें एकदां कायमचें ठरवावें. त्यामध्यें वाढ करूं नये, असा सन १७९३ मधील कायद्यामध्यें कां निर्बंध घालण्यांत आला नाहीं? आतां तरी सरकारनें या बाबतींत लक्ष्य घातलें पाहिजे. आतां सरकाला या गोष्टीमध्यें हात घालतां येईल कीं नाहीं, याविषयीं कित्येकांना शंका येईल; पण १७९३ मध्यें केलेल्या कायद्याच्या पहिल्या कलमामध्यें स्पष्ट ह्मटलें आहे, कीं, सर्व लोकांचें कल्याण सरकाराला कर्तव्य असल्यामुळें रयतेच्या संरक्षणाकरितां गव्हरनर जनरलला केंव्हांहि या कायद्यामध्यें दुरुस्ती करितां येईल; त्याबद्दल जमिनदाराला हरकत घेतां येणार नाहीं. गरीब शेतकऱ्यांवरील लादलेलें भाडें कमी करण्याकरितां सरकारानें चैनीच्या वगैरे पदार्थांवर कर बसवून जमिनदाराला सूट द्यावी,ह्मणजे त्यालाहि आपल्या कुळां-वरील भाडें कमी करितां येईल.ही गोष्ट होत नसेल,तर मुलकी खात्याचा खर्च कमी करावा. यूरोपिअन कलेक्टरांना १००० पासून १५०० रु. पगार द्यावा लागतो. त्याचें काम मुख्यतः जमिनीचा वार्षिक वसूल जमा करणें, ज्यांच्याकडून वसूल न येईल त्यांच्या जमिनींचा लिलाव करणें, स्वतःच्या ताब्यांत असलेल्या खजिन्याची योग्य व्यवस्था ठेवणें, जमिनीची वांटणी करून देणें वगैरे आहेत. तीं शिरस्ते-दाराला वगैरे सहज करितां येण्यासारखीं आहेत. तेंव्हां यूरोपियन कलेक्टरांच्या जागा कमी करून वरील कामें बजावण्याकरितां शिरस्तेदारांना ३०० पासून ४०० रुपये दरमहा पगार द्यावा. हिंदी

लोकांना उच्च प्रकारच्या जागा देण्यापासून सरकारचा फायदा आहे, हें सर थॉमस मनरो, रॉबर्ट रिचर्ड, एच्. एलीस यांनीं काढलेल्या उद्गारांवरून दिसून येईल."

हिंदुस्तानांतील लोकांच्या स्थितीविषयीं विचारलेल्या प्रश्नांस राममोहनानें १८३१ च्या सप्टेंबरच्या २८ व्या तारखेला उत्तरें लिहून तीं हॉउस ऑफ कॉमन्सच्या निवडक कमिटीकडे पाठविलीं. शेतकऱ्यांची शारीरिक स्थिति कशी आहे ? लोकांची नैतिक स्थिति कशी आहे ? शेतकऱ्याला व मजुराला वेतन काय मिळतें ? उपजीविकेचें त्यांचें मुख्य अन्न कोणतें ? कशा प्रकारच्या घरामध्यें ते रहातात ? त्यांचा पोषाख कसा असतो ? लोकसंख्या झपाट्यानें वाढते काय ? उद्योगधंद्यांसंबंधानें त्यांची स्थिति कशी काय आहे ? त्यांची सुधारणा होण्यास ते कितपत लायक आहेत ? ते कितपत बुद्धिमान् आहेत ? शिक्षणाच्या बाबतींत त्यांची कशी काय स्थिति आहे ? अंधश्रद्धेमुळें त्यांच्या वर्तणुकीवर कोणता परिणाम घडला आहे ? सध्यांच्या प्रचलित राज्यपद्धतीविषयीं व यूरोपियन आणि हिंदी अंमलदारांविषयीं त्यांचें काय मत आहे ? या तेरा प्रश्नांना दिलेल्या समर्पक उत्तरांचा समावेश त्यानें वर सांगितलेल्या निबंधांत केलेला आहे.

हॉउस ऑफ कॉमन्सनें हिंदुस्तानच्या राज्यकारभारामध्यें सुधारणा करण्यास कोणते उपाय योजावे, यांचा खल करण्याकरितां सन १८३२ मध्यें एक निवडक कमिटी नेमिली. हिंदुस्तानासंबंधीं कोणतीहि गोष्ट असो, राममोहनाचें तीमध्यें अंग असावयाचेंच. त्या कमिटीनें विनंति केल्यावरून ता. १४ जुलई १८३२ रोजीं 'यूरोपिअनांनीं हिंदुस्तानामध्यें वसाहत करणें इष्ट आहे कीं नाहीं, यावर चार शब्द' ( Remarks on settlement in India by Europeans ) अशा मथळ्याचा एक निबंध

त्यानें कमिटीकडे पाठविला. त्यामध्यें फायदे व तोटेहि दाखविले होते. त्यांचा सारांशः—

**फायदे**:—यूरोपिअन लोकांनां जमिनीची मशागत करून तिचें उत्पन्न वाढविण्याची कला अवगत असल्यामुळें व त्यांनां व्यापारी ज्ञान अधिक असल्यामुळें ते येथें कायमची वसाहत करून राहिले ह्मणजे त्यायोगानें साखरेसारख्या पदार्थांची वाढ अधिक प्रमाणांत होऊन देशी लोकांचें कल्याण होईल. त्यांनीं जी निळीची लगवड केलेली आहे त्यावरून ही गोष्ट सिद्ध होते. यूरोपियन लोकांचें व हिंदी लोकांचें नेहमीं दळणवळण झाल्यानें हिंदी लोकांमधील अंधश्रद्धा व भ्रममूलक कल्पना नाहींशा होतील. उदार मताच्या सरकारापासून अमकेअमके हक्क मिळावयाला पाहिजेत, याची जाणीव युरोपिअनांनां असल्यामुळें व ते राजकर्त्यांचे जातीबांधव असल्यामुळें कायद्यामध्यें त्यांनां बरीच सुधारणा करून घेतां येईल, व त्यायोगें हिंदी लोकांचा फायदा झाल्याशिवाय रहाणार नाहीं. हिंदी कामगारांनां त्यांचा आश्रय मिळून त्यायोगें जमिनदारांपासून त्यांनां आतां जो त्रास पोहोंचतो, तो पोहोंचणार नाहीं. त्यांच्यामध्यें हिंदी लोकांविषयीं कळकळ उत्पन्न होऊन त्यांची स्थिति सुधारण्याकरितां ते त्यांच्याकरितां इंग्रजी वगैरे शिकविण्याच्या शाळा काढतील. इलाख्याचीं मोठमोठीं ठिकाणें सोडून सध्यां तशा प्रकारची सुधारणा होण्यास कोणताहि मार्ग नाहीं. वसाहतवाले व हिंदीलोक यांचा निकट संबंध झाल्यानें इंग्लंडला हिंदी लोकांचीं गाऱ्हाणीं व येथील राज्यपद्धति चांगल्या रीतीनें समजण्यास मदत होईल. सध्यां येथें राज्य करणाऱ्या थोड्या लोकांवर त्यांनां अवलंबून रहावें लागतें. पूर्वेकडून किंवा पश्चिमेकडून परचक्र आलें असतां हे वसाहतवाले सरकाराला मनोभावें मदत करतील. कारण इंग्रज सरकारचें राज्य भक्कम पायावर असल्यानेंच त्यांनां सुख

व शांति मिळणार आहे. दुर्दैवानें जरी इंग्लंड व हिंदुस्तान हे दोन देश विभक्त होण्याचा प्रसंग आला; तथापि या वसाहतवाल्यांच्या वंशजां-कडून हिंदुस्तानचें कल्याण होऊन त्याचा दर्जा यूरोपमधील इतर राष्ट्रांच्या मानानें बराच वाढेल व त्यायोगें पूर्वेकडील इतर राष्ट्रांचीहि सुधारणा होण्याचा संभव आहे.

**तोटेः**—वसाहतवाले राज्यकर्त्यांचे जातिबांधव असल्यामुळें त्यांनां उच्च प्रकारचे हक्क मिळून त्यांचें हिंदी लोकांवर वर्चस्व होण्याचा, व हिंदी लोकांची मानखंडना होण्याचा संभव आहे. वसाहतवाले निराळ्या धर्माचे, निराळ्या रंगाचे व निराळ्या वर्तणुकीचे असल्यामुळें त्यांच्याकडून देशी लोकांचीं मनें दुखविलीं जाण्याचा संभव आहे. पण ज्यांच्या मनांवर शिक्षणाचा सुसंस्कार घडलेला आहे, अशाच यूरोपिअनांनां निदान पहिलीं वीस वर्षें तरी हिंदु-स्तानामध्यें वसाहत करूं द्यावी. सुशिक्षित यूरोपिअनांच्या ठिकाणीं इतर धर्माविषयीं पुष्कळ सहिष्णुता असते, असा अनुभव आहे. सरकारानें दोघांकरितां सारखे कायदे करावेत, व ज्यूरीची निवड करतांना पक्षपात करूं नये; ह्मणजे वसाहतवाल्यांनां आपण कोणी हिंदीलोकांपेक्षां वरिष्ठ दर्जाचे आहों असें वाटणार नाहीं. यूरोपि-अनांनां राज्यकर्त्यांची भेट घेऊन त्यांचीं मनें आपल्या तर्फे वळविणें सुकर असतें, हें बरेच वेळां दृष्टोत्पत्तीस आलें आहे; तेव्हां वसाहत-वाल्यांच्या धाकामुळें देशी लोकांचें नुकसान होण्याचा संभव आहे. हें संकट दूर करण्याला उपाय ह्मटला ह्मणजे इलाख्याच्या ठिकाणीं यूरोपिअन वकील ज्याप्रमाणें नेमलेले आहेत, त्याचप्रमाणें इतर ठिकाणींहि देशी वकिलांप्रमाणें त्यांनां नेमावें. कारण देशी वकील असो अथवा यूरोपिअन वकील असो, त्याला आपल्या पक्षकाराची बाजू न्यायाधिशापुढें मांडून योग्य न्याय मिळवितां येतो.

कित्येकांना अशी भीति वाटते, कीं, वसाहतवाल्यांच्या सहवासामुळें हिंदी लोकांची संपत्ति, ज्ञान व सार्वजनिक उत्साह वाढेल, व दोघे मिळून संगनमत करून बंड करितील, व अमेरिकेप्रमाणें स्वतंत्र होण्याचा प्रयत्न करतील;पण त्यांची ही भीति निराधार आहे. कारण, अमेरिकन लोकांवर जुलूम होऊं लागला, ह्मणूनच त्यांची प्रवृत्ति बंड करण्याकडे वळली; नाहींतर बंड करून ते इंग्लंडपासून विभक्त झाले नसते. चांगल्या रीतीनें राज्यकारभार चालविला ह्मणजे विभक्त होण्याची भीति नसते.ही गोष्ट कानडाच्या उदाहरणावरून स्पष्ट होते. त्याचप्रमाणें वसाहतवाल्यांनां व हिंदी लोकांनां न्यायानें व दूरदर्शित्वानें वागविल्यानें ते एकजुटीनें विभक्त होण्याचा प्रयत्न करतील, ही धास्ती बाळगावयाला नको. तथापि कांहीं आकस्मिक कारणांनीं दोन्ही देशांची फारकत झाली, तरीहि वसाहतवाले व हिंदीलोक यांच्यामधील स्नेहभाव तुटणें शक्य नाहीं. दोन्ही देशांमधील व्यापारी दळणवळण चालू राहील.

हिंदुस्तानची उष्ण हवा वसाहतवाल्यांनां सहन न होऊन ते आपली मालमत्ता सोडून किंवा कमी भावानें विकून आपल्या देशाला परत जातील, त्यामुळें त्यांची सांपत्तिक स्थिति बरीच निकृष्ट होण्याचा संभव आहे; पण निलगिरीसारख्या थंड ठिकाणीं त्यांनीं रहावें, जरूर पडेल तेव्हांच आपल्या मालमत्तेची व्यवस्था करण्याकरितां इतर उष्ण प्रदेशांत जावें, अशी खबरदारी घेतली, तर वरील संकट निवारण होईल. कांहीं झालें तरी वसाहत करून रहाणें त्यांच्या इच्छेवर आहे; ही गोष्ट लक्ष्यांत ठेविली पाहिजे.

याप्रमाणें जरी तोटे आहेत, तथापि फायद्यांच्या मानानें ते कांहींच नाहींत. या गोष्टींचा योग्य विचार होणें अवश्य आहे. निदान कांहीं वर्षें तरी यूरोपिअनांनां वसाहत करण्याला परवानगी

देऊन अनुभव घेऊन पहावा. दोन्हीपक्षीं फायद्याचें दिसल्यास नंतर त्यांनां कायमची वसाहत करूं द्यावी. ती त्यांनीं अमक्याच ठिकाणीं केली पाहिजे, असा निर्बंध असतां कामा नये

रामभोहनानें राजकीय बाबतींत आंखून दिलेल्या कांहीं गोष्टी सरकाराला आदर्शभूत वाटून त्यांनीं हलकेहलके आजपर्यंत त्या सुरू केल्या आहेत, व बाकीच्यांचाहि ते अजून विचार करीत आहेत. त्याचें दूरदर्शित्व किती लांबवर होतें, याचा विचार केल्यास त्याच्या विषयीं कोणाच्याहि मनांत आदरबुद्धि वाटल्याशिवाय रहाणार नाहीं.

# चतुर्थ परिच्छेद.

## धर्मसेवा.

१. पूर्वतयारी.

२. धर्मसंबंधीं वाद.

३. आत्मीयसभा.

४. ब्राह्मसभेची स्थापना.

५. राममोहनाचें धार्मिक ध्येय.

६. मृत्यूनंतर ब्राह्मसमाजाची व्यवस्था.

# चतुर्थ परिच्छेद.

## प्रकरण पहिलें.

## पूर्वतयारी.

राममोहनानें सामाजिक, शिक्षणविषयक व राजकीय सुधारणे-करितां दीर्घ प्रयत्न केले, तथापि त्याच्या आयुष्याचें अंतिमध्येय धार्मिक सुधारणा हेंच होय. त्याच्या जीविताचा हेतु धर्म हा होता. त्याच्या आयुष्याचा जर धर्म हा पाया नसता, तर त्यानें आपल्या बांधवांकारितां जें कांहीं केलें तितकें त्याला करितांच आलें नसतें. राममोहनाचें नेहमीं असें मत असे व दिवसेंदिवस त्याविषयीं त्याची अधिकच खात्री होत गेली, कीं, धर्मावांचून मनुष्याचें कल्याण व्हावयाचें नाहीं, व मानवी स्वभावाला धर्म हा एक आवश्यक विषय आहे. राममोहनाला वाटत होतें, कीं, ज्या लोकांनां मुळीं ईश्वराचें ज्ञान नाहीं, ओळख नाहीं, ते कधींहि महत्त्वाला चढावयाचे नाहींत. परमेश्वराविषयीं, आत्म्याच्या अमरत्वाविषयीं आणि नीतिसंबंधींच्या जबाबदारीविषयीं विचार जर सर्व माणसांच्या मनांतून नष्ट झाले, तर मानवी सुखाची इमारत लागलीच कोसळून तिचे तुकडे-तुकडे होऊन जातील. आपल्या शारीरिक व मानसिक रचना, अपरिमित व विस्तीर्ण आकाश, सूर्य व ग्रहमाला हीं सहज उत्पन्न झालीं, देव मुळीं नाहींच, असें जर मनुष्य क्षणभर समजेल, तर तो संशयांत पडून मूळच्या जंगली व अंधारमय अवस्थेमध्यें गर्क होऊन जाईल.

लहानपणीं राममोहनाचा ओढा मूर्तिपूजेकडे विशेष होता. प्रत्येक दिवशीं नियमानें तो आपल्या कुलदेवतेची गंधपुष्पांनीं पूजा करीत असे. भागवताचा एक पाठ दररोज वाचल्याशिवाय तो

पाण्याचा थेंबहि तोंडांत घेत नसे. इतकी विष्णूविषयीं त्याच्या मनांत पूज्यबुद्धि होती. त्याचीं मातापितरें फार धर्मशील असल्यामुळें त्यांचा त्या कोमल अंतःकरणाच्या मुळावर धर्माच्या बाबतींत फार परिणाम घडला, हें मागें सांगितलेंच आहे. चौदाव्या वर्षीच वैराग्य उत्पन्न होऊन संन्याशी होऊन राममोहन घराबाहेर निघाला होता; पण आईच्या विनंतीवरून तो गेला नाहीं.

आरबी भाषेचा अभ्यास करीत असतां युक्लिड व आरिस्टॉटल यांच्या ग्रंथांचीं भाषांतरें व त्याचप्रमाणें कुराण हे ग्रंथ त्यानें वाचले, व त्यांपैकीं कुराणाचा त्याच्या मनावर विशेष परिणाम होऊन धर्मविषयक विचारजागृति त्याच्या मनांत झाली. सुफी पंथाच्या तत्त्वज्ञानाचाहि अभ्यास राममोहनानें फार झटून केला व त्याचा परिणाम त्याच्या मनावर इतका झाला, कीं, तो अखेरपर्यंत तसाच राहिला. खासगी संभाषणांत व लेखांतहि तो सुफीचीं वचनें आधाराला घेत असे. पाटणा येथें जाऊन संस्कृत भाषेमध्यें त्यानें प्राविण्य मिळविलें. राममोहनाची आरबी आणि संस्कृत तत्त्वज्ञानांत जी गति झाली, त्यायोगें त्याच्या मनावर सुसंस्कार होऊन त्यापासून त्याचा फार फायदा झाला. हिंदुधर्माविषयीं त्याला फार आदर वाटूं लागला. परंतु त्या धर्माच्या नांवाखालीं मूर्तिपूजेचा जो प्रकार सर्वत्र प्रचलित होता, त्याच्यावरचा त्याचा विश्वास डळमळूं लागला. देव एकच आहे हें ज्या धर्माचें मुख्य मत, त्याचें ज्ञान होतांच बहुदैविक अशी जी आपल्या देशाची मूर्तिपूजा व तत्संबंधीं आचार त्यावरून त्याचें मन सहजच उडालें. पाटणा येथें असतांना मौलवी लोकांनीं आरिस्टॉटल व युक्लिड यांच्या ग्रंथांच्या भाषांतराकडे त्याचें लक्ष्य लावलें, तेणेंकरून त्याचें मन सुसंस्कृत होऊन तें प्रफुल्लित झालें.

## पूर्वतयारी.

राममोहन सोळा वर्षांचा झाला, तेव्हांच तो धार्मिक विषयांवर आपल्या बापाबरोबर वादविवाद करून त्याला निरुत्तर करूं लागला; पण आपल्या भाषणामध्यें उद्दामपणाचें वर्तन त्यानें कधींहि केलें नाहीं. त्यानें मूर्तिपूजेविरुद्ध एक पुस्तक लिहिलें होतें व तें जेव्हां त्याच्या बापाच्या दृष्टीला पडलें तेव्हां त्याला राग येऊन बापलेकाचें पटेनासें होऊन बापानें त्याला घराबाहेर हांकून दिलें. हताश न होतां राममोहनानें या संधीचा योग्य फायदा घेऊन सर्व हिंदुस्तानभर प्रवास केला व निरनिराळया धर्मांचें तारतम्यज्ञान मोठ्या मार्मिकतेनें संपादन केलें.

शाक्य मुनीच्या धर्माची माहिती मिळविण्याकरितां राममोहन १७८७ त तिबेटमध्यें देखील गेला, व तेथें कांहीं वर्षें राहिला. त्या उदार धर्माचा तेथें भलताच विपर्यास झालेला पाहून राममोहनाला फार दुःख झालें. तिबेटचे लोक लामालाच सृष्टीचा उत्पन्नकर्ता, रक्षणकर्ता व संहारकर्ता समजून त्याचीच पूजा करितात, असें त्याला आढळलें. त्यांची अशी समजूत आहे, कीं, महात्मा बुद्ध याचा आत्मा एका शरीरांतून दुसऱ्या शरीरांत जातो, व त्यामुळें जो कोणी आपल्या शरीरावर विवक्षित प्रकारचीं चिन्हें धारण करतो त्यालाच ते लोक बुद्धाचा अवतार समजतात. यायोगें राममोहनाला संताप येऊन त्यानें बौद्धधर्मगुरूंनां त्यांच्या चुका दाखवून त्यांच्याशीं पुष्कळ वाद केला; परंतु त्याचा कांहींएक परिणाम न होतां उलट त्याचा छळ सुरू झाला. त्या लोकांसमक्ष त्यानें लामा देवाची निंदा केल्यावरून त्यांनां फार क्रोध आला, व त्याच्या जिवावर देखील येऊन बेतलें! परंतु तेथील कांहीं परोपकारी स्त्रियांच्या मदतीनें तो मोठ्या शिकस्तीनें त्या अरिष्टांतून मुक्त झाला. स्त्रियांनीं हें जें त्याला जीवदान दिलें, त्याची फेड करण्याकरितां तो पुढें स्त्रियांच्या उन्नतीसाठीं

जन्मभर राबला त्या वेळेपासून स्त्रियांविषयीं त्याला अतिशय आदर वाटूं लागला. एकंदरींत पहातां राममोहनाला मुसलमानी तत्त्वज्ञान अवगत होतें, संस्कृत तत्त्वज्ञानहि अवगत होतें व चार वर्षें प्रवासांत घालविल्यावर बौद्धतत्त्वज्ञानाशीं त्याचा बराच परिचय झाला होता.

याविषयीं प. वा. भास्कर हरि भागवत ह्मणतातः—

" एतद्देशीय लोकांनां हजारों वर्षांपासून ज्या अज्ञानानें व वेड्या समजुतींनीं गर्क करून टाकलें आहे, तें अज्ञान व त्या वेड्या समजुती यांनां त्याच्या तीव्र बुद्धीपुढें लपावयाला जागा सांपडली नाहीं. पाटणा येथें असतां त्यानें आरिस्टॉटल आणि युक्लिड यांच्या ग्रंथांचें लक्ष्यपूर्वक अवलोकन केल्यावरून न्यायशास्त्राप्रमाणें सयुक्तिक रीतीनें विचार आणि भाषण करण्याचा अभ्यास त्याला पडून गेला होता, आणि पुराणोक्त मतांचीहि त्याला बरीच माहिती झाली होती; यावरून पुराणोक्त मार्ग असत्य असून तीं पुराणें केवळ अलंकार-रूप इतिहासानें व कांहीं अंशीं दंतकथांनीहि भरलेलीं आहेत, अशी लौकरच त्याची पूर्ण खात्री झाली, आणि त्याप्रमाणें तो त्या वेळीं अवघा सोळा वर्षांचा असतां त्यानें 'हिंदूंची मूर्तिपूजा' या विषयावर एक ग्रंथ लिहिला. हिंदुस्तानांत आणि तसेंच इतर देशांत तरी एवढ्या अल्पवयी मुलाच्या ठायीं इतकें सामर्थ्य व धैर्य आढळणें ह्मणजे कठिण ! असें असतां राममोहन रायानें एवढ्या लहान वयांतच प्रसिद्धपणें मूर्तिपूजेचा त्याग करून तन्निषेधक ग्रंथ लिहिला, यावरून त्याच्या बुद्धीचें व धैर्याचें आश्चर्य केल्यावांचून रहावत नाहीं. त्यानें असें केल्यामुळें त्याला बहुत तोटे सोसावे लागले, बापाच्या मालमत्तेवरचा त्याचा हक्क नाहींसा झाला, आणि त्याचे अगदीं जवळचे आप्तहि त्याच्यावर अतिशय रुष्ट झाले. त्याचा बाप जो अगदीं जुन्या चालीप्रमाणें चालणारा होता, त्याला आपल्या पुत्राची

हीं विपरीत मतें सहन होईनात. अशा समयीं राममोहन रायाविषयीं विचार करणें यांत मोठी मौज आहे. तो वयानें केवळ मूल असून चरितार्थास्तव त्याला आपल्या पित्याचेंच अवलंबन करावें लागत असे, आणि आपलीं वास्तविक मतें लोकांनां विदित झालीं असतां आपणावर मोठा कहर होईल अशी त्याची खात्रीहि होती, तरा त्यानें तीं प्रगट करण्यास मागेंपुढें पाहिलें नाहीं ! अशा या नीति-धैर्याचें आणि मनाच्या स्वतंत्रतेचें आपणांला आश्चर्य वाटल्यावांचून रहात नाहीं. नाहीं तर अमुक करावें आणि अमुक करूं नये, असें तोंडानें बोलणारे आपण पुष्कळ आहों; परंतु त्याचें फळ काय? या आपल्या महातेजस्वी आणि पराक्रमी देशबंधूप्रमाणें खरें धैर्य धरून कोणी हातानें कृति करून दाखवितील, तर कांहीं उपयोग !"

राममोहन रंगपुर येथें नोकरींत असतांना सायंकाळीं तो आपल्या घरीं मंडळी जमवून धार्मिक विषयांवर—मुख्यतः मूर्तिपूजेवर वाद-विवाद करीत असे. तेथें जैनधर्मी कांहीं मारवाडी त्याला येऊन मिळाले, व त्यांच्यापासून तो 'कल्पसूत्र' शिकला.

नोकरी सोडल्यानंतर मुर्शिदाबाद येथें असतांना फारशी भाषेमध्यें त्यानें 'तोहफत अल् मोहिद्दीन' नांवाचें एक पुस्तक लिहिलें होतें; याची प्रस्तावना आरबी भाषेंत होती व त्यामध्यें ज्या विषयाचें प्रतिपादन केलें होतें, तो विषय ह्मणजे सर्व राष्ट्रांमध्यें चालू असलेला जो मूर्तिपूजेचा प्रकार, त्याचा निषेध, हा होता.

ईश्वर एक आहे, त्याचें सामर्थ्य अपार आहे, आत्मा अमर आहे, असें राममोहन मानी, हें या पुस्तकावरून कळून येतें. देव एकच हें महमदी धर्माचें मुख्य मत असल्यामुळें जरी त्याची या पुस्तकामध्यें थोडीशी स्तुति केली आहे, तरी मक्केचा अवतारी आणि त्याचीं भविष्यकथनें व दुसरे प्रकार यांचें यथायोग्य खंडन राममोहनानें

केलें आहे. या पुस्तकाचें इंग्रजी भाषांतर डाका येथील शाळाखात्याचे सुपरिंटेंडंट मोलवी अबदुल्ला यांनीं करून तें १८८४ मध्यें कलकत्त्याच्या आदिब्राह्मसमाजानें प्रसिद्ध केलें आहे.

वस्तुतः राममोहनाची खरी कामगिरी कलकत्त्यामध्यें आल्यावर ह्मणजे १८१४ सालापासून सुरू झाली. कलकत्त्यास आल्यावर त्याच्या गुणांचें व विद्वत्तेचें तेज तेथील तरुण विद्वान् मंडळींत फांकूं लागलें, व हळुहळू त्याच्याभोंवतीं विद्वान् व सुविचारसंपन्न मंडळी जमूं लागली. सरकारी काम सोडून धर्म आणि तत्त्वज्ञान यांच्या अभ्यासांत स्वस्थपणें काळ घालविण्याचा जो त्याचा फार दिवसांचा उद्देश तो बेचाळीस वर्षांच्या वयाच्या सुमाराला सिद्धीस गेला. कलकत्त्याला असतांना त्याचे कांहीं आप्त त्याला येऊन मिळाले. त्यांमध्यें त्याचा भाचा गुरुदास मुकरजी हा एक होता. या तरुणाची राममोहनावर अतिशय भक्ति जडली. तो फार चिडखोर स्वभावाचा होता. लोकांनीं केलेला छळ निमुटपणें सहन करण्याचें त्याजमध्यें सामर्थ्य नव्हतें. राममोहनाचे विरोध्यांशीं तंटा करण्यास तो नेहमीं सज्ज असे. यानेंच प्रथम राममोहनापासून ब्राह्मधर्माची दीक्षा घेतली. राममोहनाचे दोन्ही मुलगेहि कलकत्त्यामध्यें आपल्या बापाबरोबर राहूं लागले.

असाधारण बुद्धीचा मनुष्य ह्मणून राममोहनाची कीर्ति चोहींकडे पसरली होती. विलक्षण बुद्धि व थोर अंतःकरण यांची जोड त्याजमध्यें झाली होती. तो बहुगुणी असल्यामुळें कलकत्त्याच्या प्रसिद्ध पुरुषांचें लक्ष्य राममोहनाकडे वेधलें होतें. त्यांमध्यें थोडे विद्वान् पंडितहि होते. सत्याचा प्रसार करण्याकरितां राममोहनानें चार प्रकारच्या पद्धतींचा स्वीकार केलेला होता (१) संभाषण व वादविवाद; (२) शाळांमधून शिक्षणप्रसार; (३) पुस्तकें छापून तीं प्रसिद्ध करणें; व (४) धार्मिक मंडळ्या स्थापन करणें. त्या वेळच्या विद्वान् पंडितांबरोबर

व ख्रिस्ती मिशनऱ्यांबरोबर त्यानें पुष्कळ धर्मसंवाद केला. पुष्कळ वेळां हा धर्मसंवाद त्या वेळच्या वृत्तपत्रांतून चालत असे. या वेळीं त्यानें बंगाली, इंग्रजी, फारशी व हिंदी भाषांमध्यें कित्येक पुस्तकें प्रसिद्ध केलीं. सन १८१६ मध्यें त्यानें केन व ईश या उपनिषदांचें आणि सन १८१७ मध्यें मांडुक्य व कंठ या उपनिषदांचें भाषांतर बंगालींत व इंग्रजींत केलें. याच वर्षी त्यानें मंडुकोपनिषदाचें बंगालीमध्यें भाषांतर केलें. वेदांतसूत्र व वेदांतसार यांमुळें त्याची कीर्ति सर्वत्र पसरली, व विशालबुद्धीचा मनुष्य ह्मणून त्याची ख्याति जिकडे-तिकडे झाली. हीं दोन पुस्तकेंच आधारभूत धरून तो वादविवाद करीत असे. खरा जो हिंदुधर्म त्याच्याविरुद्ध तो कधींहि जात नसे. परंतु मूर्तिपूजेचा प्रकार सर्वत्र चाललेला पाहून तो लोकांना असें सांगे, कीं, आपल्या पूर्वजांचा जो उदार हिंदुधर्म त्याच्याविरुद्ध तुह्मीं हा प्रकार सुरू केला आहे. वेदांतसूत्र या ग्रंथाच्या प्रस्तावने-मध्यें तो असें ह्मणतो, कीं, एका खऱ्या देवाची उपासना करण्या-विषयीं शास्त्रें सांगत आहेत. एका शाश्वत सनातन देवाविषयींच्या उदात्त कल्पना ज्या अज्ञाणी लोकांना ग्रहण करवणार नाहींत, त्यांच्याकरितां मूर्तिपूजा आहे असें शास्त्रें सांगतात. त्या उदात्त कल्पना ग्रहण करितां आल्याबरोबर मूर्तिपूजेचा निषेध केला पाहिजे.

## प्रकरण दुसरें.

## धर्मसंबंधीं वाद.

त्या वेळचे कर्मठ ब्राह्मण पवित्र मानलेले धर्मग्रंथ इतर जातींच्या लोकांच्या नजरेला न पडूं देण्याची खबरदारी बाळगीत. वेदांतील मंत्र शूद्रांनीं ऐकिले तर वेद भ्रष्ट होतील, अशी सर्वत्र समजूत होती. पण त्या ग्रंथांचीं भाषांतरें करून प्रसिद्ध करण्याला राममोहनानें सुरुवात केली.

प्रथमतः राममोहनानें १८१५ मध्यें वेदांतसूत्राचें बंगाली भाषांतर प्रसिद्ध केलें. बंगालीनंतर त्याचेंच एक रूपांतर हिंदुस्तानी भाषेंत प्रसिद्ध केलें, आणि १८१६त वेदांताचें इंग्लिश भाषांतर प्रसिद्ध केलें. या ग्रंथाला जोडलेली प्रस्तावना फार सुंदर व बोधप्रद असून प. वा. भास्कर हरि भागवत यांनीं तिचें केलेलें भाषांतर पुढीलप्रमाणें आहेः—

" बहुतेक ब्राह्मण व इतर जातींचे हिंदु जी मूर्तिपूजा करितात, तिचें प्रतिपादन करण्याला ते अगदीं असमर्थ आहेत. तिजविषयीं त्यांनां प्रश्न केला असतां सयुक्तिक रीतीनें भाषण करावयाचें टाकून, आमच्या वाडवडिलांनीं याप्रमाणें केलें ह्मणून आह्मी करितों असें ह्मणतात, आणि हेंच तिच्या खरेपणाविषयीं प्रमाण पुरे आहे असें मानितात; आणि मी मूर्तिपूजेचा त्याग करून खऱ्या आणि अनाद्यंत परमेश्वरालाच भजूं लागलों ह्मणून त्यांतून कित्येक मजवर अतिशय रुष्ट झाले आहेत. याजकरितां, आपलीं स्वतःचीं आणि आपल्या पूर्वजांचीं धर्ममतें यांच्या प्रतिपादनार्थ मी कांहीं दिवसांपासून आमच्या पवित्र धर्मग्रंथांचा वास्तविक अर्थ आपल्या देशबंधूंनां समजावून त्याविषयीं, आणि कित्येक अविचारी मनुष्यें मला जे दोष

लावितात ते अगदीं निरर्थक आणि अनुचित आहेत याविषयीं, त्यांची खात्री करून देण्याचा यत्न करीत आहें.

"वेद हे हिंदूंचीं सर्व शास्त्रें होत. ते पृथ्वीच्या उत्पत्तीच्या वेळचे आहेत असें ह्मणतात. ते फारच मोठे ग्रंथ असून अति कठीण आणि लाक्षणिक भाषेत लिहिलेले असल्यामुळें, बहुत स्थळीं गोंधळलेले आणि परस्परांनां विरुद्ध आहेत असें दिसून येतें. या सर्व अडचणी ध्यानांत आणून, महाव्यासानें सुमारें दोन हजार वर्षांपूर्वीं त्या सर्व ग्रंथांचा एक संक्षेपरूप ग्रंथ रचिला, आणि जे भाग परस्परांनां विरुद्ध असणारे असे दिसले तेहि टीका करून मिळवून घेतले. या ग्रंथाला वेदान्तसूत्र असें ह्मणतात. त्याला सर्व हिंदु फार मान देतात, आणि विस्तीर्ण वेदांच्या जागीं त्याजवरच गरज भागवितात; परंतु तो संस्कृत भाषेंत असल्यामुळें आणि ब्राह्मण आपणांखेरीज दुसऱ्या कोणाला तो वाचावयाला तर काय, परंतु त्याला स्पर्श करावयाला देखील देत नसल्यामुळें, वेदांताचा आधार जरी ते वारंवार घेतात तरी तो साधारण लोकांस थोडाच माहीत आहे, किंबहुना नसल्यासारखाच आहे; आणि थोड्याच हिंदूंचें आचरण वेदांतील मतांस अनुसरून असतें.

"वर सांगितल्याप्रमाणें, आपल्या स्वतःच्या आणि आपल्या पूर्वजांच्या मतांच्या प्रतिपादनार्थ, मीं यथाशक्ति या आजपर्यंत अज्ञात ग्रंथाचीं संक्षेपरूप हिंदुस्तानी आणि बंगाली भाषांतरें प्रसिद्ध केलीं, आणि त्यांच्या प्रतींचा प्रसार स्वदेशीय लोकांत आपल्याकडून झाला तेवढा केला. सध्यांचें हें त्यांचेंच संक्षेपरूप इंग्रजी भाषांतर आहे. हें करण्यांत माझा उद्देश एवढाच, कीं, ज्या अडाणी समजुतींनीं आणि देवभोळेपणानें हिंदुधर्माचें स्वरूप सांप्रत इतकें बिघडलें आहे,

त्याचा आणि त्याच्या शुद्ध मूलतत्त्वांचा कांहीं संबंध नाहीं, हें माझ्या यूरोपिअन मित्रांनां पक्कें समजावें.

"मीं असें पाहिलें आहे, कीं, यूरोपिअन लोक लिहिण्यांत आणि भाषणांतहि हिंदु मूर्तिपूजेच्या स्वरूपाकडे सौम्य दृष्टीनें पाहूं इच्छितात, आणि कोणत्याहि पदार्थांची पूजा करणें तर ते पदार्थ ईश्वराच्या प्रतिमा आहेत असें मानून लोक करितात, अशी आपल्या मनाची समजूत घालितात. असा प्रकार आहे असा जर कांहीं संभव असता, तर मीं त्याविषयीं कांहीं अधिक शोध केला असता; परंतु वास्तविक प्रकार असा आहे, कीं, सांप्रतकाळीं हिंदूंची अशी कांहीं समजूत नसून ते उलट असें मानितात, कीं, देव कोट्यवधि आहेत, व त्यांतून प्रत्येकाला आपापल्या लोकीं स्वतंत्र अधिकार आहे, आणि खऱ्या परमेश्वराची नव्हे, तर या देवांची भक्ति करण्याला देवळें बांधितात आणि पूजाअर्चादि कर्मं करितात. असें आहे तथापि हीं सर्व कर्मं मूळचीं लाक्षणिक रीतीनें ईश्वराची भक्ति करण्याच्या मार्गापासून उत्पन्न झालीं आहेत, यांत कांहीं संशय नाहीं. परंतु सध्यां हें सर्व लोक विसरले आहेत आणि जो कोणी असें ह्मणतो त्याला नास्तिक ह्मणण्यालाहि ते सोडीत नाहींत. इतर मनुष्यांच्या मतांवर स्वमतांचें वर्चस्व स्थापण्याला मी इच्छितों, असें यावरून कोणी समजूं नये. तशा विषयावर कितीहि वादोपक्रम झाला, तथापि अंतीं त्याचा परिणाम समाधानकारक होईल असें नाहीं. कारण, मनुष्याला आपल्या बुद्धिशक्तीच्या आंत ज्या गोष्टी आहेत त्यांविषयीं जरी तिच्यायोगें निर्णय करितां येतो, तरी तिच्या पलीकडल्या ज्या आहेत त्यांत त्याची मति चालत नाहीं. मी येथें एवढेंच सुचवितों, कीं, सारासार विचार व आपली सामान्यबुद्धि यांवरून, या ब्रह्मांडाचा पालनकर्ता व नियंता कोणी तरी ज्ञानसंपन्न

आणि अनादि आत्मा आहे असें जर आपणांला वाटतें, तर तो सर्व-शक्तिमान् आणि सर्वांहून श्रेष्ठ आहे, व त्याला पूर्णपणें जाणणें किंवा त्याचें वर्णन करणें हें आपल्या सामर्थ्यापलीकडे आहे, असेंहि आपणाला मानिलें पाहिजे; आणि जरी अशिक्षित व कित्येक शिक्षितहि (परंतु या एका प्रकरणांत दुरभिमानानें अंध झालेले) मनुष्य आपणाला नेहमीं प्रत्यक्ष दिसणाऱ्या आणि इंद्रियगोचर अशा कोणत्या एकाद्या आपल्या मनाला येईल त्या पदार्थांची पूजा करितात, तरी त्यामुळें अशा त्यांच्या वर्तणुकीचें मूर्खत्व तिळमात्र कमी होतें, असें नाहीं.

"मूर्तिपूजेपासून उपस्थित झालेले आणि तत्संबंधीं जे मनुष्याच्या कल्याणाला प्रतिकूल किंबहुना अपकारक आचार त्यावर मी निरंतर विचार करीत असतों, आणि मला आपल्या देशबांधवांची करुणा येते. ह्मणून त्यांनां त्यांच्या अज्ञानरूप स्वप्नावस्थेंतून जागृत करण्यास आणि आपल्या वास्तविक शास्त्रांचें परिज्ञान करून देऊन सृष्टीचा उत्पन्नकर्ता जो सर्वशक्तिमान् परमेश्वर त्याचीच सद्भावेंकरून आराधना करावयास लावण्यास आपली पराकाष्ठा केल्यावांचून माझ्यानें रहावत नाहीं.

"मी ब्राह्मण होत्साता, आपल्या सदसद्विचारबुद्धीनें जो चांगला मार्ग मला दाखविला तो म्यां धरिला; यामुळें माझे आप्तविषयी, जे पराकाष्ठेचे दुरभिमानी आणि सध्याच्या धर्ममार्गांत ज्यांचा स्वार्थ आहे, त्यांच्याहि निंदेस आणि अपमानास आपणांस पात्र करून घेतलें; परंतु हे त्रास कितीहि असले तथापि मी शांतपणें सहन करितों आणि अशी आशा बाळगितों, कीं, लोक माझ्या आतांच्या श्रमांची कृतज्ञतापूर्वक स्तुति करितील, असा सुदिन भरतखंडाला लौकरच येईल. असो. मनुष्यें काय पाहिजे तें ह्मणोत, हा समाधानकारक

विचार तर त्यांच्यानें मजपासून हिरावून घेववत नाहीं; जो गुप्तपणें पहातो आणि उघडपणें प्रतिफल देतो, त्या भगवंताला माझे विचार मान्य होतील."

वेदांतसूत्रानंतर राममोहन राय यानें, केनोपनिषदावर शंकराचार्यांनें केलेल्या टीकेच्या आधारानें त्या उपनिषदाचें भाषांतर करून तें बंगाली आणि इंग्लिश भाषांत प्रसिद्ध केलें. केनोपनिषद् हें सामवेदाचा एक भाग आहे. ईश्वर अद्वैत व सर्वशक्तिमान् आहे, आणि तो मात्र पूजा करण्याला योग्य, हें त्यांत स्थापिलेलें आहे. कर्मकांड आणि ज्ञानकांड असे वेदाचे दोन भाग आहेत. पहिल्यांत पंचमहातत्त्वांची पूजा व यज्ञयागादि कर्में सांगितलीं आहेत; दुसऱ्यांत ईश्वराच्या गुणांचें स्तवन करून त्याचें अस्तित्व प्रतिपादन केलें आहे. उपनिषदें या दुसऱ्या भागांत आहेत. या उपनिषदांचें भाषांतर करण्याचा हेतु इतकाच, कीं, कर्मकांडांत सांगितलेलीं वेडींवेडीं कर्में, आणि पुराणांत सांगितलेल्या पूजाअर्चा हीं सर्व, वेदांचा उत्तम आणि अतिनिर्दोष भाग जीं उपनिषदें, त्यांत सांगितलीं नाहींत एवढेंच नाहीं, तर त्यांचा त्यांत निषेध केल्यासारिखें आहे.

राममोहन राय यानें ईश्वर अद्वितीय आहे, द्वितीय नाहीं, हें वेदांतसूत्राचें मत असल्याचें लोकांनां दाखवून देण्यास फार यत्न केले. त्यानें सामोपनिषदाच्या भाषांतराला जी प्रस्तावना लिहिली आहे, तींत तो ह्मणतो "देव एकच आहे, असें जें हिंदु धर्माचें वास्तविक मत तें लोकांनां समजून, त्यांमध्यें त्याविषयीं ज्या वेड्या समजुती आहेत, त्या सर्व नाहींशा होतील आणि तसेंच वेदाचा कोठेंकाठें लाक्षणिक अर्थ घ्यावा लागतो हें त्यांनां माहीत होऊन ज्यांहीकरून सांप्रतकालीं हिंदु प्रपंचाचीं जीं साधारण सुखें त्यांनां मुकलीं आहेत इतकेंच नाहीं, तर आपल्या स्वतःच्या, आपल्या मित्रांच्या आणि

आप्तांच्या प्राणांचा नाश करण्यासहि प्रवृत्त होतात, असे जे कित्येक आचार ते अगदीं टाकून देतील, अशी मी अपेक्षा करितों."

आपल्या लोकांनां त्यांच्याच धर्मशास्त्रांतील सयुक्त आणि वास्तविक मतांचें परिज्ञान करून देऊन मूर्तिपूजेपासून मुक्त करण्याचा जो त्याचा मानस त्याला अनुसरून त्यानें यजुर्वेदांतील कठोपनिषद आणि अथर्ववेदांतील मुंडकोपनिषद, यांचीं बंगाली आणि इंग्लिश भाषांतरें करून त्यांचा आपणाकडून झाला तेवढा लोकांमध्यें प्रसार केला.

हे ग्रंथ प्रसिद्ध केल्यामुळें लोकांत फार गवगवा झाला. शास्त्री, पंडीत व दुसर दुरभिमानी लोक यांच्या पोटांत मोठी धास्ती बसली. ब्राह्मणांशिवाय इतरांला वाचण्याचा व ऐकण्याचा अधिकार नाहीं असे जे वेद व उपनिषदें त्यांचें भाषांतर इतर भाषांत झाल्यामुळें सर्व लोकांनां तीं वाचावयाला मिळालीं म्हणून सर्व देशांतील ब्राह्मणवर्ग राममोहनाविरुद्ध खवळून गेला. भट, भिक्षुक, उपाध्ये यांनीं राम-मोहनाचा पाडाव करण्याविषयीं कंबर बांधिली. पंडितांच्या त्वेषाला तर सीमाच उरली नाहीं. त्याच्याविरुद्ध कुत्सित व दुष्ट टीकांचा वर्षाव होऊन त्याच्या मतांचें खंडन करणारीं अनेक पुस्तकें एकामागून एक प्रसिद्ध होऊं लागलीं. परंतु तें सर्व त्यानें निमूटपणें सहन केलें. त्यानें शास्त्रांचे आधार देऊन त्या सर्वांनां शांतपणें उत्तरें दिलीं; पण तसें करतांना केव्हांहि सभ्यपणा सोडला नाहीं. आपलीं तत्त्वें प्रतिपादण्यापेक्षां दुसरें वायफळ तो कधींहि बोलत नसे. राममोहन रंगपूर येथें असतांना तेथील जज्जाचा दिवाण गौरीकांत भट्टाचार्य यानें 'ज्ञानचंद्रिका' नांवाचें एक पुस्तक बंगालीमध्यें लिहून राममोहनाचीं मतें खोडून काढून मूर्तिपूजेचें समर्थन करण्याचा प्रयत्न केला; पण त्यांत त्याला यश आलें नाहीं. राममोहनाचा छळ करण्याकारितां त्यानें पुष्कळ खटपट केली; पण तीहि व्यर्थ झाली.

# राजा राममोहन राय.

मद्रास येथील सरकारी कॉलेजाचे हेडमास्तर शंकरशास्त्री हे सन १८१६ मध्यें राममोहनाबरोबर धर्मसंवाद करण्याला पुढें सरसावले, व त्यांचा हा वाद त्या वेळच्या वर्तमानपत्रांतून सुरू झाला. वेदांतसूत्राप्रमाणें व पुराणाप्रमाणें कोणा एका अर्थी ईश्वर एकच आहे, हें त्या शास्त्रयानें कबूल केलें. परंतु तो असें ह्मणे, कीं, राममोहन रायाला हें मत आपण शास्त्रांतून शोधून काढिलें असें ह्मणून घेण्याला आधार नाहीं. इतकें असूनहि पुनः मूर्तिपूजा असावी व ईश्वराचे अनेक गुण एकमेकांपासून भिन्न आणि स्वतंत्र आहेत असें मानून त्यांच्या प्रतिमा करून पुजाव्या, असें तो ह्मणे. हें सिद्ध करण्याला तो असे दृष्टांत देई:-जर कोणा मनुष्याला राजाला भेटण्याची इच्छा असली, तर त्याला पहिल्यानें प्रधानाची भेट घेतली पाहिजे, नाहीं तर एकदम राजाकडे जाईन ह्मणेल तर राजाला क्रोध येईल; तसेंच कोणा मनुष्याला दादर चढावयाचा असल्यास त्यानें एकेक पायरी चढत गेलें पाहिजे, नाहीं तर एकदम सातआठ चढेन ह्मणेल तर पाय मोडून घेईल. तद्वत्च ईश्वराची कृपा त्याच्या गुणांची मूर्तिपूजा प्रथमतः करून हळुहळू संपादन करीत गेलें पाहिजे.

राममोहनानें वेदांतील पुष्कळ आधार दाखवून असें स्थापन केलें, कीं, ईश्वराचे गुण एकमेकांपासून भिन्न आणि स्वतंत्र आहेत, हें मत वेदांतसूत्रांतील मुख्य मतांशीं अगदीं विरुद्ध आहे.

शेवटीं राममोहनानें सन १८१७ मध्यें 'हिंदु धर्माप्रमाणें ईश्वराच्या अस्तित्वाचें समर्थन' (A defence of Hindu Theism) या मथळ्याखालीं एक लेख लिहून त्या विद्वानाची लेखणी बंद केली. कारण राममोहनानें जो शेवटचा विचारपरिप्लुत निबंध लिहिला, त्यावर त्या शास्त्र्याकडून उत्तरच आलें नाहीं.

नंतर लौकरच भट्टाचार्य नामक कलकत्त्यांतील एका गृहस्थानें बंगाली आणि इंग्लिश भाषांमध्यें एक लहानसें पुस्तक काढून त्यांत राममोहनाच्या मतांवर पुष्कळ हल्ले केले; परंतु त्यांचेंहि राममोहनानें यथायोग्य खंडन केलें. नंतर कलकत्ता येथील सरकारी कॉलेजचे मुख्य पंडीत मृत्युंजय विद्यालंकार यांनीं 'वेदांतचंद्रिका' नांवाचें पत्रक काढून राममोहनाच्या तत्त्वाला विरोध केला, तेव्हां राममोहनानें 'वेदांतील एकेश्वरी मताचें पुनश्च समर्थन' (A second defence of the Monotheistical system of the Vedas) हें पत्रक प्रसिद्ध करून वरील पुस्तकांतील प्रश्नांला उत्तरें दिलीं.

आत्मीय सभेच्या एका बैठकीमध्यें राममोहनानें जीं तत्त्वें प्रतिपादिलीं, त्यामुळें मद्रासचे पंडित सुब्रमणीशास्त्री यांनीं राममोहनाला मूर्तिपूजेवर वादविवाद करावयाला आव्हान केलें. सन १८१९ च्या डिसेंबरांत कर्मठ हिंदु लोकांचे पुढारी राधाकांतदेव यांच्या अध्यक्षतेखालीं एक जाहिरसभा भरून तीमध्यें राममोहन व ते शास्त्री यांच्यामध्यें कडाक्याचा वाद झाला. त्या वेळीं राममोहनानें आपल्या प्रतिपक्षाचें तोंड बंद केलें.

सत्य शोधून काढण्यामध्यें राममोहनाचा हातखंडा असे. जेथेंजेथें ह्मणून सत्याचें रत्नभांडार सांपडत असे, तेथूनतेथून तो तें मिळवीत असे. हिंदुशास्त्रापुरतीच त्याची दृष्टि नव्हती व ह्मणून त्या धर्मांतूनच सत्य शोधून काढून तो गप्प बसला असें नाहीं; तर कुराणामधील सत्यशोधनार्थ त्यानें आरबी भाषेचा अभ्यास करून कुराणाचें अध्ययन केलें. ख्रिस्ती धर्मांतील उदात्त तत्त्वें कळावीं ह्मणून त्यानें बायबलचा अभ्यास केला; परंतु इंग्रजीमध्यें लिहिलेल्या बायबलनें त्याचें समाधान होईना ह्मणून जुन्या कराराचा

अभ्यास करण्याकारितां तो हिब्रु शिकला व नव्या कराराच्या अभ्यास करण्याकारितां ग्रीक भाषा शिकला. नव्या करारामधील जीझस ख्राइस्टचा उपदेश त्याला फार पसंत पडला. तो सर्व त्यानें एकत्र करून इ. स. १८२० मध्यें पुस्तकरूपानें प्रसिद्ध केला; त्या पुस्तकाचें नांव 'येशूच्या आज्ञा ह्मणजे सुखाचा व शांतीचा मार्ग' (Precepts of Jesus, a guide to peace and happiness) असें होतें. या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत राममोहन ह्मणतो "ज्या भगवंतानें जाति, पदवी आणि संपत्ति यांचा भेद न राखितां सर्व प्राणिमात्रांस एकीकडून सुख, दुःख, मरण इत्यादि स्थित्यंतरास समानपणें पात्र केलें आहे, आणि त्या सर्वांनां सृष्टींतील सुखें भोगण्याला एकसारखा अधिकार दिला आहे, त्याविषयीं उच्च विचार व बहुमान मनुष्यांच्या मनांत बिंबवून देण्याला आणि उत्पन्न-कर्त्याविषयीं, स्वतःविषयीं आणि इतर जनांविषयीं आपलीं कर्तव्य-कर्मे समजण्याला हा लहानसा नीतिग्रंथ इतका उपयोगी आहे, कीं, तो प्रसिद्ध केल्यापासून कांहीं तरी चांगला परिणाम झाल्यावांचून राहणार नाहीं, अशी माझी पक्की खात्री आहे."

या पुस्तकामध्यें येशु ख्रिस्त हा मोठा धर्मोपदेशक होऊन गेला एवढेंच दाखविलें होतें; पण 'ख्रिस्ताचें देवपण' (Doctrine of divinity) हें तत्त्व कबूल केलें नव्हतें. त्यामुळें 'फ्रेंड ऑफ इंडिया' या प्रसिद्ध पत्राचे संपादक डॉक्टर मार्शमन यांनां फार राग आला व त्यांनीं कडाक्याचा वाद आपल्या पत्रांतून चालविला. या विद्वान् ख्रिस्ती गृहस्थाच्या मतांचें खंडन करण्याकारितां राममोहनानें 'ख्रिस्ती लोकांनां विनंति' (An appeal to the Christian public) या नांवानें तीन पुस्तकें अनुक्रमें १८२०, १८२१ व १८२३ सालीं प्रसिद्ध केलीं. तिसरें पुस्तक त्याला फारच

प्रयासानें प्रसिद्ध करावें लागलें. त्याचीं सर्व पुस्तकें व पत्रकें श्रीरंगपूर येथील बॅप्टिस्ट मिशन नांवाच्या छापखान्यामध्यें आतांपर्यंत छापिलीं जात होतीं; परंतु त्याचें हें पुस्तक ख्रिस्ती धर्माच्या उलट असल्यामुळें त्या छापखान्याच्या व्यवस्थापकानें तें छापण्याचें नाकारलें. राममोहनाचें धैर्य, सहनशीलता व निःस्वार्थबुद्धि विलक्षण होती. तो हीं पुस्तकें छापीत असे, तें त्यांचा खप होऊन कांहीं प्राप्ति होईल ह्मणून नव्हे. आतां त्यानें आपला स्वतःचा छापखाना खरेदी केला. या छापखान्यांतून बाहेर पडलेलें पहिलें पुस्तक (Final Appeal) 'अखेरची विनंति' हें होय. या पुस्तकामध्यें त्या विद्वान् इंग्रज गृहस्थाच्या मतांचें पूर्णपणें खंडन केलें होतें. हा वाद चालू असतांना राममोहनानें आपली सहनशीलता ढळूं दिली नाहीं, व सुस्वभाव सोडला नाहीं. या पुस्तकांची कीर्ति दूरदूरच्या सर्व देशांत पसरली. तीं पुस्तकें इंग्लंडमध्यें पुनः छापलीं व हिंदुस्तानांतील मनुष्यांच्या ठिकाणीं अशी विलक्षण बुद्धि वसत आहे हें पाहून तेथील लोक आश्चर्यानें थक्क झाले. याच सुमाराला राममोहनाचा शिष्य बृजमोहन मुंजधर यानें 'हिंदु–एक–देवमत' या विषयावर एक ग्रंथ बंगालीमध्यें प्रसिद्ध केला. यांत मूर्तिपूजेवर मोठा कहर केलेला आहे. आज बंगाली भाषेंत तो पहिल्या प्रतीचा ग्रंथ आहे, असें ह्मणतात. या ग्रंथांतील भाषेच्या शैलीवरून व विचारांवरून असें दिसतें, कीं, तो ग्रंथ राममोहनानें स्वतः लिहून आपल्या शिष्याच्या नांवानें प्रसिद्ध केला असावा.

राममोहनाला यानंतरचा श्रीरामपूर येथील एक ख्रिस्ती मिशनरी प्रतिस्पर्धी उत्पन्न झाला. या गृहस्थानें एक मासिक पुस्तक काढून तो त्यामध्यें वेद, दर्शनें, पुराणें आणि तंत्रें यांमध्यें प्रतिपादिलेल्या तत्त्वांमध्यें फोलपणा आहे, हें दाखवूं लागला. उलटपक्षीं सन १८२१

मध्यें राममोहनानें इंग्रजीमध्यें व बंगालीमध्यें 'ब्राह्मॅनिकल मॅगाझिन' ( Brahmanical magazine ) हें पुस्तक काढून त्यामध्यें तो त्या मिशनरींच्या मतांनां विरोध करूं लागला. मोठ्या धैर्यानें व सप्रमाण आधार देऊन त्या मिशनरीवर त्यानें जोराचा हल्ला करून हिंदु शास्त्राविषयींचा आपला आदर व्यक्त केला. यानंतर थोड्याच दिवसांनीं 'पाद्री व त्याचे शिष्य' ( Missionary and his pupils ) हें स्वतंत्र पुस्तक प्रसिद्ध करून 'त्रयीच्या तत्त्वाचा' ( Doctrine of Trinity ) त्यामध्यें तीव्रपणें संवादात्मक रीतीनें निषेध केला. या पुस्तकामध्यें ख्रिस्ती धर्मातील त्या तत्त्वाचा फोलपणा त्यानें दाखविला. दुसऱ्या एका वादविवादामध्यें राममोहनानें रामदास हें टोपण नांव घेऊन स्पष्ट रीतीनें उघड करून दाखविलें, कीं, हिंदुलोकांची मूर्तिपूजा व त्रयी मानणाऱ्या ख्रिस्ती लोकांची मूर्तिपूजा यांमध्यें कांहीं फरक नाहीं. हिंदु लोक पुष्कळ देवांची पूजा करितात व ख्रिस्ती लोक तीन देवांची पूजा करितात.

१८२३ सालीं हिंदु कॉलेजमधील एक प्रसिद्ध शिक्षक टायटलर व श्रीरामपूर येथील ख्रिस्ती मिशनरी हे एका बाजूला, व राममोहन हा एकटा दुसऱ्या बाजूला, या रीतीनें मोठा कडाक्याचा वाद 'हरकारू' व 'फ्रेंड ऑफ इंडिया' या दोन पत्रांतून सुरू झाला. एका धार्मिक विषयावर राममोहनानें प्रसिद्ध केलेल्या कांहीं मुद्द्यांविरुद्ध टायटलरचें एक पत्र 'हरकारू'मध्यें प्रसिद्ध झालें. याला उत्तर ह्मणून राममोहनानें हिंदुमूर्तिपूजकांचा पक्ष घेऊन 'रामदास' या टोपण नांवानें पुढें दिल्याप्रमाणें लिहिलें:—

"राममोहन हा हिंदु मूर्तिपूजकांचा त्याचप्रमाणें त्रयी मानणाऱ्या ख्रिस्ती मूर्तिपूजकांचाहि विरोधी आहे. तेव्हां **ख्रिस्ती व हिंदु या दोन्ही धर्मांचीं मुख्य तत्त्वें सारखीं असल्यामुळें**

दोन्ही धर्मांच्या लोकांनीं या त्यांच्या प्रतिस्पर्ध्यांचा पाडाव करण्याकरितां संगनमत करावें!"

हें प्रसिद्ध झाल्याबरोबर टायटलर व दुसरे ख्रिस्ती मिशनरी यांनां फार चीड आली. आपल्या ख्रिस्ती धर्माचीं व हिंदु—ज्यांनां ते 'पाखांडी (Heathens)' म्हणत त्यांच्या धर्मांचीं मुख्यमुख्य तत्त्वें एक आहेत हें म्हणण्याला ते कबूल होईनात. हिंदुधर्म आणि ख्रिस्तीधर्म यांची तुलना करणें अयोग्य आहे असें म्हणून 'रामदासा'च्या पत्राला त्यांनीं उत्तर दिलें. हा वाद तसाच चालू राहिला व शेवटीं 'रामदासा'नें आपल्या प्रतिपक्षीयांची लेखणी बंद केली, व असें सिद्ध करून दाखविलें, कीं हिंदु लोकांची मूर्तिपूजा ही त्रयी मानणाऱ्या ख्रिस्ती लोकांच्या मूर्तिपूजेपेक्षां यत्किंचित्‌हि हलकी नाहीं. दोनहि धर्म ईश्वराचा अवतार कबूल करितात व एकापेक्षां जास्ती देवांची उपासना करावयाला सांगतात. मग ते देव तीन असोत किंवा अनेक असोत. तेव्हां दोन्ही धर्मांचीं मुख्य तत्त्वें एकच आहेत हें कबूल केलें पाहिजे. हा सर्व वाद नंतर राममोहनानें पुस्तकरूपानें छापून काढला.

कित्येक मोठे लोक कडाक्याच्या वादविवाद प्रसंगीं चिडून जातात; परंतु राममोहनाची गोष्ट तशी नव्हती. निरनिराळ्या देशच्या, जातींच्या लोकांबरोबर स्वमतप्रतिपादनार्थ त्याला वर सांगितल्या प्रमाणें जरी झगडावें लागलें, तरी त्याच्या वृत्तीमध्यें कधींहि चलबिचल न होतां त्याची मुद्रा आणीबाणीच्या प्रसंगीं देखील शांत व गंभीर दिसे. त्याच्या तोंडून तिरस्कारयुक्त असे शब्द कधींहि निघाले नाहींत.

प्रकरण तिसरें.

# आत्मीयसभा.

राममोहनाच्या बापाच्या मृत्यूनंतर राममोहनाचा भाऊ जगमोहन याच्या ताब्यामध्यें वडिलोपार्जित सर्व मिळकत गेली होती. जगमोहन १८११ त मरण पावला, तेव्हां अर्थात्च ती सर्व मिळकत राममोहनाच्या ताब्यांत जावयाची; परंतु त्याच्या स्वतःच्या पूज्य आईनेंच तिच्या आप्तांच्या चिथावणीवरून राममोहनावर कोर्टांत फिर्याद केली. इ. स. १८१४ त डिग्बीसाहेब रजेवर इंग्लंडमध्यें गेले त्याच वेळीं राममोहनानें सरकारी नोकरी सोडून आपल्या आयुष्याचा अंतिम हेतु साध्य करण्याकरितां तो कलकत्त्याला आला, हें वर सांगण्यांत आलेंच आहे. त्याचा खटला कलकत्त्याच्या कोर्टामध्यें चालू असल्यामुळें कलकत्त्याला येण्यास त्याला हें एक निमित्त झालें होतें. कलकत्त्याला आल्यानंतर दुसऱ्याच वर्षीं म्हणजे इ स.१८१५त त्यानें वेदाचीं भाषांतरें करून तो तीं एकामागून एक प्रसिद्ध करूं लागला, व लवकरच लोकांची मानासिक, नैतिक आणि धार्मिक उन्नति करण्याच्या हेतूनें आत्मीय नांवाची सभा त्यानें स्थापन केली. त्या सभेमध्यें धर्मांतील उन्नत तत्त्वांवर वादविवाद होत असे. राममोहन रंगपूर येथें असतांना तेथें ज्या सभा होत असत, त्यांची हकीगत कलकत्त्याला अगोदरच येऊन पोहोंचली होती. त्यामुळें राममोहन कलकत्त्याला येऊन राहूं लागल्याबरोबरच सुशिक्षित लोक त्याच्या सभोंवतीं जमूं लागले, व त्याच्या मताला सहानुभूती दाखवूं लागले. पाश्चात्यांच्या सहवासामुळें कलकत्त्यामधील कांहीं सुशिक्षितांचीं मनें सुधारणेकडे आधींच लागलेलीं होती, व राममोहनाचीं

व आपलीं मतें जुळताहेत असें त्यांनां समजतांच ते राममोहनाला येऊन मिळाले. त्यांपैकीं कांहींजण अतिशय श्रीमंत असून प्रतिष्ठित घराण्यांतील होते. बाबु द्वारकानाथ ठाकूर, बाबु प्रसन्न कुमार ठाकूर, बाबु कालीनाथ, वैकुंठनाथ मुनशी, वृंदावन मित्र, काशिधाम मलीक, राजा कालीशंकर घोसाळ, आनंद प्रसाद बानर्जी, वैद्यनाथ मुकर्जी वगैरे गृहस्थ उघडउघडपणें आत्मीय सभेला येऊन मिळाले. यांशिवाय बृजमोहन मुजुमदार, फलादर बोस, नंदकिशोर बोस वगैरे बरेचजण आत्मीय सभेला हजर असत.

या सभेमध्यें येणारे सर्वचजण राममोहनाचीं तत्त्वें त्यांनां मान्य होतीं म्हणून येत होते, असें नाहीं. कांहींजण एवढ्या मोठ्या विद्वानाची संगति लाभावी म्हणून येत होते. बाकीचे अडचणीच्या वेळीं त्याजकडून योग्य व पोक्त सल्ला घेण्याकरितां येत असत; पण कांहीं थोडेजण मोठे आस्थेवाईक होते, व त्यांनां राममोहनानें स्थापित केलेलीं तत्त्वें पूर्णपणें मान्य होतीं.

या सभेमध्यें येणारे बहुतेकजण मध्यम वयाचे होते. त्यांनां राममोहन आपल्या बरोबरीनें व मित्रत्वाच्या नात्यानें वागवीत असे, व त्यांच्याशीं बंधुभावानें वागत असे. दुसरे थोडेजण अगदीं तरुण होते, ते राममोहनाला आपला गुरु समजून सदा त्याच्याजवळ असत. पंडीत शिवप्रसाद मित्र व हरिहर नंदतीर्थस्वामी या दोघांजणांची राममोहनाला जुन्या शास्त्रांचें विवरण करण्याच्या कामीं मोठी मदत झाली. हरिहर नंदतीर्थ स्वामीचें मुळचें नांव नंदकुमार होतें. तो हुगळी जिल्ह्यांत माळपारा येथें जन्मला, व तेथेंच त्यानें संस्कृताचें चांगलें अध्ययन केलें; परंतु लहान वयांतच त्यानें संन्यासवृत्ति स्वीकारिली व जगांतील व्यवहारापासून अलिप्त राहून तो तीर्थयात्रा वगैरे करण्यामध्यें आयुष्याची कालक्रमणा करूं लागला.

राममोहन रंगपूर येथें असतांना हे स्वामी तेथे आले. त्या ठिकाणीं दोघांची मैत्री जुळली आणि ते धार्मिक गोष्टींचा तासांचेतास विचार करीत एकत्र राहत असत. राममोहन कलकत्त्याला आला, त्या वेळींहि स्वामी वारंवार कलकत्त्याला येऊन महिन्यांचे महिने त्याच्या सहवासांत राहत असत. एका खेपेला त्यांनीं आपला भाऊ रामचंद्र याला आपल्याबरोबर कलकत्त्याला आणिलें व त्याला राममोहनाच्या देखरेखीखालीं ठेविले. हाच रामचंद्र पुढें ब्राह्मसमाजाचा पहिला आचार्य झाला. तो पंडीत रामचंद्र विद्यावागीश या नांवानें प्रसिद्ध आहे.

ही सभा स्थापन झाल्यानंतर पहिलीं दोन वर्षे साप्ताहिक उपासना राममोहनाच्या घरांतील बागेमध्यें होत असत. त्या ठिकाणीं शिवप्रसाद मित्र वेद म्हणत असे, व त्यांच्या अर्थाचें विवरण करीत असे. उपासनेकारितां राममोहनानें केलेल्या कविता गोविंदमाला नांवाचा एक गवई गात असे. दोन वर्षांनंतर ही सभा राममोहनाच्या सिमला नांवाच्या घरामध्यें भरूं लागली, व नंतर १८१९ सालीं ती बिहारीलाल चौबे यांच्या घरामध्यें भरूं लागली. याच ठिकाणीं राममोहन व सुब्रमणीशास्त्री नांवाचा मद्रासचा एक ब्राह्मण यांच्यामध्यें मूर्तिपूजेवर कडाक्याचा वाद झाला. त्या वेळीं राधाकंठ देव वगैरे बरेच पुढारी हजर होते. १८१९ नंतर पुढें कांहीं वर्षांनीं आत्मीयसभा बंद पडली. याचें कारण बहुशः असें असावें, कीं, राममोहनाचें लक्ष्य त्या वेळीं अडामसाहेबाबरोबर एक युनिटेरियन समाज स्थापण्याकडे लागलें होतें, व शिवाय राममोहनावर त्याच्या पुतण्यानें व बरद्वानच्या राजानें ज्या फिर्यादी केल्या, त्याच्या त्रासानें त्याच्या चित्ताला स्वास्थ्य नव्हतें.

प्रकरण चवथें.

# ब्राह्मसभेची स्थापना.

रामममोहनाविषयीं पुढील मजेदार गोष्ट सांगतात. राममोहनाचा ख्रिस्ती मिशनरींबरोबर कडाक्याचा वादविवाद चालला असतां ख्रिस्ती धर्माचा प्रसार करण्याकरितां एक ख्रिस्ती मिशनरी विलायतेहून हिंदुस्तानांत आला. त्याचें नांव रे. वुइलियम ॲडॅम असें होतें. त्यानें राममोहनाशीं ओळख करून घेऊन त्याला आपल्या धर्मामध्यें घेण्याचा प्रयत्न केला. राममोहनानें दाखले देऊन त्या मिशनरीच्या स्पष्टपणें लक्ष्यांत आणून दिलें, कीं, त्रयवाद, ख्रिस्ताचें देवत्व व लोककल्याणासाठीं स्वार्थत्याग करून Atonement by the vicarious sacrifice of Jesus हीं तीनहि मतें बायबलमधील उपदेशाच्या विरुद्ध आहेत. राममोहनाच्या या भाषणामुळें त्या मिशनरीची खात्री झाली, व राममोहन ख्रिस्ती होण्याऐवजीं त्या मिशनरीनेंच त्रयवादाचा त्याग करून सन १८२१ मध्यें स्वतः एकेश्वरी मत स्वीकारलें. यायोगें ख्रिस्ती मिशनरीमध्यें फार गवगवा झाला, व तिरस्कारानें रे. वुइलियम ॲडॅम याला ते 'दुसरा भ्रष्ट झालेला ॲडॅम ( Second fallen Adam )' या नांवानें संबोधूं लागले.

याप्रमाणें धर्मांतर झाल्यावर रे. ॲडॅम हे मोठ्या उत्साहानें एकेश्वरी धर्माचा उपदेश राममोहनाच्या सल्ल्यानें करूं लागले. १८२१च्या सप्टेंबरांत त्यांनीं एक युनिटेरियन ( एकेश्वरी ) सोसायटी स्थापन केली. तिला 'कलकत्ता युनिटेरिअन कमिटी' असें नांव देण्यांत आलें. तिचे सभासद थोडे हिंदी गृहस्थ व कित्येक युरोपिअन गृहस्थ होते.

राममोहन हा त्यांचा पुढारी होता. १८२७ मध्यें थिओडर डिकन्स, जार्ज जेम्स गॉर्डन, वुइलियम टेट, वी. डब्ल्यु. मॅक्लीऑड, नॉर्मन करे, राममोहन राय, द्वारकानाथ ठाकूर, प्रसन्न कुमार ठाकूर, राधा प्रसाद रॉय, रे. वुइलियम ॲडम हे याचे सभासद होते. धर्मसंबंधीं वेडगळ समजुती व अंधश्रद्धा नाहींशी करून लोकांनां विद्या देऊन सुशिक्षित करावयाचें, असा या संस्थेचा उद्देश होता. या संस्थे-मार्फत १८२२ पासून एक अँग्लोव्हर्नाक्युलर शाळा आणि एक युनि-टेरिअन छापखाना सुरू करण्यांत आला. या संस्थेनें कांहीं पुस्तकें छापून प्रसिद्ध केलीं. या दोन्ही संस्थांचा बहुतेक सर्व खर्च राम-मोहनच करीत असे. रे. ॲडम हे या संस्थेच्या मिशनरीचें काम करीत असून त्यांनां वेतन राममोहनाकडूनच मिळत असे.

या संस्थेसंबंधानें राममोहनाला इंग्लंड व अमेरिका येथील युनि-टेरिअन लोकांबरोबर पत्रव्यवहार करावा लागे. बालतिमोर येथील एका गृहस्थाला ता. २७ अक्टोबर १८२२ रोजीं लिहिलेल्या पत्रांत राममोहन ह्मणतोः—

"बरेचसे आस्थेवाईक लोक ख्रिस्तानें प्रतिपादिलेल्या तत्त्वांमध्यें आज बरेच दिवसांपासून झालेली भेसळ काढून टाकण्याचा मोठ्या उत्साहानें प्रयत्न करीत असल्यामुळें आतां मात्र मला अशी आशा वाटते, कीं, ख्रिस्तानें उपदेशिलेलीं तत्त्वें फार दिवस काळोखांत राह-णार नाहींत. त्यांचें वास्तविक स्वरूप लोकांच्या नजरेला आल्या-शिवाय राहणार नाहीं. सध्यांचे मिशनरी त्या तत्त्वांचा भलताच विपर्यास करितात; पण ख्रिस्ताचीं व त्याच्या शिष्यांचीं तत्त्वें फार उदात्त असून तीं बुद्धीला पटण्यासारखीं आहेत, हें पाहून मला फार समाधान वाटतें माझा प्राण गेला तरी बेहत्तर, पण त्याच्या तत्त्वांचें समर्थन करण्याला मी केव्हांहि माघार घेणार नाहीं. आमच्या संस्थेचे

सभासद जरी थोडे आहेत, तरी ते आस्थेवाईक आहेत. ख्रिस्तानें प्रतिपादिलेल्या धर्माचें सार माझ्या समजुतीप्रमाणें हें आहे, कीं, सर्व मनुष्यप्राणी एका ईश्वराचीं लेंकरें होत. तेव्हां देश, जात, वर्ण किंवा धर्म यांचा निर्बंध न ठेवतां एकमेकांनीं एकमेकांवर प्रेम करावें"

या कमिटीमार्फत रे. ॲडम हे दर रविवारीं एका जागीं उपदेश करीत असत. प्रथम जरी त्यांच्या उपदेशाला पुष्कळ मंडळी जमत, तरी पुढेंपुढें मुळींच जमेनाशी झाली. त्यांच्या उपासनेला राममोहन, त्याचे मित्र व सहानुभूति बाळगणारे दुसरे लोक येत असत. राममोहन आपल्या मुलांना, शेजाऱ्यापाजाऱ्यांना व ताराचंद चक्रवर्ती व चंद्रशेखर देव या मित्रांना घेऊन नियमानें जात असे. एके वेळीं रे. ॲडम यांची उपासना ऐकून परत घरीं येतांना दोघां मित्रांनीं एकदां त्याला सुचविलें, कीं, परकीयांनीं चालविलेल्या उपासनेला जाण्यापेक्षां आपली स्वतःचीच उपासनेला एक जागा असणें इष्ट आहे. असेंहि म्हणतात, कीं, युनिटेरिअन मिशनला यश येत नाहींसें पाहून रे. ॲडमनें स्वतः स्वतंत्र समाज काढण्याला राममोहनाला सांगितलें. कसेंहि असो, हें त्याचें म्हणणें राममोहनाला पसंत पडून त्याचा विचार करण्याकरितां राममोहनानें आपल्या घरीं एक सभा बोलावली. या सभेमध्यें बाबू द्वारकानाथ टागोर वगैरे त्या वेळच्या चार नामांकित गृहस्थांनीं आश्रय देण्याचें कबूल केलें. शेवटीं इ. स. १८२८ त भाद्रपद महिन्यांत ( आगस्ट ता. २० ) जोरांसांको येथील एक घर या कामाकरितां भाड्यानें घेतलें व त्या ठिकाणीं ब्राह्मसभेची स्थापना केली. त्या ठिकाणीं प्रत्येक शनिवारीं संध्याकाळीं सात आणि नऊ यांच्या दरम्यान उपासना होऊन दोन तेलगु ब्राह्मण वेदांतील उतारे वाचून दाखवीत आणि पंडीत रामचंद्र विद्यावागीश हे उपनिषदांतील उतारे वाचून दाखवीत, व नंतर त्यांचें विवरण

करीत. शेवटीं स्तोत्र ह्मणून उपासना आटपत असे. कलकत्त्याचे त्या वेळचे पुष्कळ हिंदु या उपासनेला येत असत. थोड्याच महिन्यांत पुरेसा फंड जमा झाला, व मंदिर उभारलें गेलें. या मंदिरामध्यें ब्राह्मसभा त्याच वर्षीं माघ ( जानेवारी ता. २३ ) महिन्यांतील एकादशीला नेण्यांत आली. मंदिरप्रवेशाच्या दिवशीं कलकत्त्यामधील ५०० लोक व मॉंटगॉमरी मार्टिन नांवाचा एक इंग्रज हजर होता. त्या दिवशीं ब्राह्मसमाजाचा वार्षिकोत्सव पाळला जातो. या समाजामध्यें मधुनमधून ख्रिस्ताचीं व मुसलमानांचीं मुलें एकत्र जमवून राममोहन त्यांच्यासह एकेश्वरी मताचीं गाणीं ह्मणत असे. देशाची खरी उन्नति होण्याला सर्व गोष्टींत धर्मालाच प्राधान्य दिलें पाहिजे, असें राममोहनाचें मत होतें. या बाबतींत पुढील उतारा सर नारायण चंदावरकर यांच्या व्याख्यानाच्या पुस्तकामधून घेतला आहेः—

ता. १५ मे १८१५ रोजीं एतद्देशीयांची स्थिति सुधारून व त्यांचीं मनें सुसंकृत करून त्यांनां भ्रममूलक कल्पना, भिक्षुकांचे डावपेंच व जातिभेद यांच्या बंधनांपासून कसें मुक्त करितां येईल, या गोष्टींचा विचार करण्याकरितां राममोहनानें आपल्या घरीं एक सभा बोलाविली. कलकत्त्यामधील हिंदु पुढाऱ्यांपैकीं पुष्कळ लोक या सभेला हजर होते, व त्या वेळीं डेविड हेअर नांवाचा एक इंग्रज गृहस्थहि हजर होता. त्याचें नांव बंगाल्यांत सर्वतोमुखीं आहे. राममोहन व हेअर यांचा स्वभाव परस्पर भिन्न होता. राममोहनाच्या ठिकाणीं जाज्ज्वल्य धार्मिकवृत्ति नांदत होती. त्या वेळच्या सर्व मुख्य धर्मांचें त्यानें मोठ्या आस्थेनें अध्ययन केलें होतें. एकेश्वरी धर्मावर त्याचा पूर्ण विश्वास होता, व त्याच्या मनानें असें पक्कें घेतलें होतें, कीं, देशाची धार्मिक स्थिति सुधारून सर्वांचा भाव एक ईश्वर, एक धर्म आणि

एक मनुष्यजात या गोष्टींवरच बसेल, याविषयीं प्रयत्न केला असतां हिंदुस्तानचें कल्याण होईल, आणि त्याची सर्व प्रकारें भरभराट होईल. उलटपक्षीं, डेविड हेअरचें शिक्षण बेताचेंच होतें; त्याच्याठिकाणीं वक्तृत्वशक्ति फार अल्प होती, किंवा मुळींच नव्हती ह्मटलें तरी चालेल. त्याच्या मनाचा असा ठाम ग्रह बनून राहिला होता, कीं, या देशाची मुक्तता, या देशांतील ज्ञानाची वाढ किंवा या देशाची उन्नति जी होणार ती या देशांतील लोकांनां ऐहिक शिक्षण सढळ हातानें रेलचेल दिलें असतांच होणार आहे.

राममोहनाच्या घरीं जी सभा झाली ह्मणून वर सांगितलें, त्या सभेमध्यें राममोहनानें अशी इच्छा प्रदर्शित केली, कीं, आपण साप्ताहिक सभा स्थापन करावी, त्या सभेमध्यें धार्मिक व्याख्यानें व्हावीं, साप्ताहिक उपासना कराव्या, वेद आणि उपनिषदें यांच्या अर्थाचें स्पष्टीकरण करावें, एकंदरींत त्या सभेमध्यें धार्मिक, शुद्ध विचारांचाच खल व्हावा. असें केलें असतां लोकांची प्रवृत्ति पुनः शुद्ध अशा एकेश्वरी धर्माकडे वळेल. याच्या उलट डेविड हेअरचें मत पडलें, व ज्या ठिकाणीं ऐहिक शिक्षण मिळेल असें एक कॉलेज स्थापन करावें, असा त्यानें हट्ट धरिला. त्या वेळीं त्यानें असे उद्गार काढले, कीं, हिंदुस्तानची उन्नति व्हावी अशी जर तुमची मनापासून इच्छा असेल तर ज्या गोष्टीनें हिंदुस्तानांतील सात्विक-गुणांचा ऱ्हास झाला आहे, त्या तुह्मी आपल्यामधून काढून टाकल्या पाहिजेत. तुमचा देव, तुमचा धर्म, तुमचा भिक्षुकवर्ग व तुमची जात या सर्वांनां हद्दपार करा! तुमच्या अधोगतीला हीं सर्व कारणें झालीं आहेत. करितां एक कॉलेज काढा व लोकांनां शिक्षण द्या. तरच हिंदुस्तानाला इष्ट स्थिति प्राप्त होऊन बरे दिवस येण्याची आशा आहे.

या सभेमध्यें वाटाघाट झाली, परंतु सभेनें कोणतेंच मत निश्चित केलें नाहीं. सभा विसर्जन होऊन लोक आपापल्या घरीं गेले; पण राजा राममोहन राय व डेविड हेअर हे दोघे पूर्ण निश्चयी व निग्रही होते. प्रत्येकानें आपापल्यापरी कामाला सुरुवात केली. ईश्वराची उपासना करण्याकरितां राममोहनानें ' ब्राह्मसभा ' स्थापन करून तेथें तो धर्मपर व्याख्यानें देऊं लागला, व उपनिषदें व वेद यांच्या अर्थाचें विवरण करूं लागला. उलटपक्षीं कलकत्त्यांतील त्या वेळचे हायकोर्टाचे मुख्य न्यायाधिश सर एडवर्ड हाइड ईस्ट यांची सहानुभूति डेविड हेअरनें कृतकार्याला मिळविली, त्या वेळच्या पुढारी हिंदु लोकांकडे अर्ज पाठवून पुष्कळ पैसा जमा केला, व एक कॉलेज स्थापन होऊन तेथें वरिष्ठ प्रतीच्या शिक्षणाला सुरुवातहि झाली. त्या कॉलेजांतील शिक्षकवर्गामध्यें डेरोझिओ नांवाचा एक ईस्ट इंडिअन गृहस्थ शिकवीत होता, त्याचें नांव बंगालच्या इतिहासामध्यें नुसत्या शिक्षणाच्या बाबतींतच नव्हे, तर सामाजिक सुधारणेशींहि नेहमीं संलग्न राहील. डेविड हेअरप्रमाणेंच या गृहस्थालाहि धर्माची फारथोडी चाड होती. त्याची स्वतःची वृत्ति साधारणपणें नास्तिकपणाकडे होती, आणि विद्यार्थ्यांवर तर त्याचें बरेंच वजन असे. पुष्कळ विद्यार्थी त्याच्याभोंवतीं जमत, त्याच्यावर प्रेम करीत, व त्याचा प्रत्येक शब्द शिरसावंद्य मानावयाला तत्पर असत. डेरोझिओ त्यांनां नेहमीं असा उपदेश करी, कीं, तुमच्या भिक्षुकवर्गाचें बंड मोडून टाका, व तुमच्या देवाच्या मूर्तीचा नायनाट करा. याचा परिणाम असा झाला, कीं, पुष्कळसे विद्यार्थी नेहमीं त्याच्या घरीं जमून जातिभेदाचा तीव्र रीतीनें निषेध करीत असत, व त्या वेळच्या भ्रममूलक गोष्टींचा आपणांला किती तिटकारा असतो, याची सत्यता पटविण्याकरितां ते डेरोझिओबरोबर जेवीत असत. अशा

रीतीनें त्यांच्या मतें जीं पाखंडमतें होतीं, त्यांविषयींचा तिरस्कार ते विद्यार्थी अधिकाधिक प्रमाणानेंच दाखवूं लागले.

एके दिवशीं के. एम्. बानर्जी, जो पुढें ख्रिस्ती मिशनरी झाला त्याच्या नेतृत्वाखालीं ते एका घरामध्यें जमले,व तेथें त्यांनीं गोमांसावर यथेच्छ ताव मारला! जेवण झाल्यावर सर्व तरुण विद्यार्थी आपापल्या हातांत गोमांसाचा तुकडा घेऊन रस्त्यांतून मिरवूं लागले, व त्यांनीं ते तुकडे त्या वेळच्या एका कट्टया हिंदुधर्माभिमानी गृहस्थाच्या घरामध्यें फेंकून दिले. यायोगें सर्वत्र एकच हाहाःकार उडून गेला! त्या विद्यार्थ्यांचा सर्व लोक तिटकारा करूं लागले, त्यांचा छळ झाला व पुष्कळांवर खटलेहि झाले. याचा परिणाम असा झाला, कीं, पूर्वीचा त्यांचा तो उत्साह एकदम विलयाला जाऊन त्याचा मागमूसहि उरला नाहीं. सुधारणेविषयींच्या त्यांच्या सर्व कल्पना मनांतल्या मनांत जिरून गेल्या.अशा प्रकारची स्थिति त्या विद्यार्थ्यांपैकीं बहुतेकांची झाली; पण जे थोडे बाकी राहिले,त्यांपैकीं कांहींजण ख्रिस्ती झाले,व दुसरे राममोहन यांनीं स्थापन केलेल्या ब्राह्मसभेला येऊन मिळाले. प्रथम जातिभेदाचें निर्मूलन केलें पाहिजे, अशी सुधारणेविषयीं या तरुण मंडळीची कल्पना होती. त्यांना वाटे, कीं, हिंदुस्तानच्या लोकांनीं आजपर्यंत धर्मावर फार भिस्त ठेविली आहे; ह्मणून लोकांच्या धार्मिक कल्पनांवर नव्हे, तर ईश्वरासंबंधाच्या व मानवजातीसंबंधाच्या कल्पनांवरहि आघात केले पाहिजेत.

राममोहनानें स्थापलेला हा जो धर्म तो सकृद्दर्शनीं जरी परधर्मापासून उत्पन्न झालेला दिसतो, तरी त्याचा पाया या देशाच्या धर्मसमजुतीला अनुसरून त्यानें घातला आहे, यांत संशय नाहीं. जो हा देश पुष्कळ दिवस निद्रितावस्थेंत होता, व ज्यांतील चैतन्य नष्ट होत चाललें होतें,त्या या देशामध्यें या धर्माच्या योगें नवजीवन

प्राप्त झालें. या धर्माविषयीं सर नारायण चंदावरकर एके ठिकाणीं ह्मणतातः—

"जेव्हां एकाद्या वैद्याला वाटतें, कीं, आपला रोगी आजारानें इतका पछाडला आहे, कीं, पुनः त्या आजारांतून बरें होण्याइतकें त्याच्यामध्यें त्राण उरलें नाहीं, तेव्हां त्याच्या आंगांत विद्युच्छक्तीचा संचार करून त्यामध्यें आंतून कांहीं चैतन्य उत्पन्न करण्याची जरुरी त्याला भासते, त्याचप्रमाणें राममोहनानें धर्माच्या बाबतींत केलें."

ब्राह्मधर्मतत्त्वांचा प्रसार करण्याकरितां व आपल्या देशबांधवांच्या कल्याणाच्या मार्गाचें प्रतिपादन करण्याकरितां राममोहनानें बंगालीमध्यें 'संवाद कौमुदी' नांवाचें साप्ताहिक पत्र सुरू केलें. धर्मसभेनें 'चंद्रिका' नांवाचें दुसरें विरोधी पत्र काढलें, व या दोन पत्रांमधून दोन्ही पक्षांचा कडाक्याचा वादविवाद होऊं लागला. योग्य आधार देऊन स्वमत प्रतिपादन करून राममोहनाचा पराभव करणें अशक्य वाटून धर्मसभेनें आपला हेतु साध्य करण्याकरितां राममोहनाचा पाडाव करण्याला दुष्ट बेत योजिले. राममोहन आणि त्याचे साथीदार यांच्याविरुद्ध गलिच्छ आरोप आणून धर्मसभेचा चिटणीस दारोदार हिंडून राममोहनाविरुद्ध लोकांचें मन वळविण्यामध्येंच तो आपली इतिकर्तव्यता समजूं लागला, व 'ब्राह्मसभा सोडून द्या, नाहीं तर तुह्मांला बहिष्कृत करीन,' अशी धमकी देऊं लागला. परंतु ह्या सभेचा उद्देश सफल झाला नाहीं. ब्राह्मसभेचे सभासद जरी थोडे होते, तरी ते छातीचे होते. त्याच्या दटावणीकडे मुळीं लक्ष्य न देतां ते ब्राह्मसभेला चिकटून राहिले. असें ह्मणतात, कीं, राममोहनाचा जीव घेण्याविषयींहि प्रयत्न करण्यांत आला होता.

प्रकरण पांचवें.

# राममोहनाचें धार्मिक ध्येय.

राममोहनाच्या धार्मिक मताबद्दल बऱ्याच जणांकडून त्याला दूषण देण्यांत येतें. धर्ममार्गांत त्याचें नेहमीं तडजोडीचें वर्तन असे, असें त्यांच्याकडून प्रतिपादण्यांत येतें. एकाच देवाची पूजा करावी असें जरी त्याचें मत होतें, तरी तो ब्राह्मणांकडून ब्राह्मसभेमध्यें वेद ह्मणवीत असे, व वेद आणि उपनिषदें—ज्यांमध्यें एकापेक्षां अधिक देवदेवतांची पूजा सांगितली आहे,—त्यानें आपल्या सभेचीं धर्मपुस्तकें केलीं होतीं. असे आरोप बहुतकरून ख्रिस्तीलोकांकडून त्याजवर केले जातात. त्यांनां वाटतें, कीं, त्याचा ख्रिस्ती धर्मावर पूर्ण विश्वास होता; पण आपल्या हिंदू बंधूंचें मन दुखवूं नये, ह्मणून तो वरूनवरून हिंदुशास्त्राविषयीं पूज्यभाव दाखवीत होता. कित्येक ब्राह्मसमाजीय देखील असें ह्मणतात, कीं, त्याचीं जीं मतें होतीं, त्याप्रमाणें तंतोतंत वागण्याइतका त्याच्यामध्यें करारीपणा नव्हता. हे सर्व आरोप अगदी निराधार आणि फोल आहेत.

ब्राह्मसभेसंबंधानें राममोहनानें जें ट्रस्टडीड ( व्यवस्थापत्र ) केलें आहे, त्यावरून त्याच्या मनाचें औदार्य, विचारप्रागल्भ्य, व्यावहारिक कुशलता व परमतसहिष्णुता दिसून येते. त्यांत ब्राह्मसमाजाच्या हेतुसंबंधानें ह्मटलें आहे, 'शाश्वत, अतर्क्य, निर्विकार, सर्व ब्रह्मांडाचा नायक व रक्षणकर्ता असा जो सनातन परमात्मा, त्याचीच उपासना करण्याकरितां हा समाज स्थापन झाला आहे. या मंदिरामध्यें एकाद्या विवक्षित नांवानें प्रचलित असलेल्या देवतेची पूजा कोणालाहि करतां येणार नाहीं.' पुढें या समाजामध्यें उपासना करण्याचा

कोणाला अधिकार आहे, त्याविषयीं असें ह्मटलें आहे कीं, 'जे कोणी विश्वासानें, धार्मिकतेनें, गंभीरतेनें येथें येतील त्या सर्व जातींच्या व धर्मांच्या लोकांकरितां हा समाज आहे.' उपासनेच्या पद्धती विषयी त्यामध्यें ह्मटलें आहे 'या इमारतीमध्यें किंवा इमारतीच्या आवारांत कोणत्याहि मूर्तीची, पुतळयाची किंवा चित्राची पूजा करण्यांत येणार नाहीं. कोणत्याहि प्रकारचा यज्ञ किंवा होम या ठिकाणीं होणार नाहीं. धर्माकरितां किंवा अन्न ह्मणून कोणत्याहि प्राण्याचा या ठिकाणीं जीव घेतला जाणार नाहीं. भुकेनें मरण्याचाच प्रसंग आल्याशिवाय या ठिकाणीं कोणत्याहि प्रकारचें खाणेंपिणें व्हावयाचें नाहीं. प्रार्थना, उपदेश किंवा गाणें होत असतांना या ठिकाणीं कोणत्याहि धर्माची निंदा किंवा थट्टा बुद्धिपुरस्सर होणार नाहीं. एकाच परमेश्वराविषयीं या जागेवरून मनन, चिंतन, प्रार्थना व उपदेश होईल, व धर्म, नीति, दया, परोपकार वगैरे सद्गुणांची वाढ होऊन निरनिराळया धर्मांच्या अनुयायांमध्यें ऐक्य होण्याला मदत होईल, असाच प्रयत्न या ठिकाणीं होत जाईल.'

हा जो ट्रस्टडीडमधील मजकूर त्यावरून वाचकांची खात्री होईल, कीं, धर्माच्या बाबतींत तडजोडीच्या धोरणाचें राममोहनानें मुळींच अवलंबन केलेलें नाहीं, किंवा ख्रिस्तीधर्माकडे त्याचा ओढा विशेष होता, हेंहि वरील गोष्टींवरून संभवत नाहीं.

यावर कोणी अशी शंका घेतील, कीं, ट्रस्टडीडमध्यें त्यानें अशा प्रकारचे उदार विचार प्रथित केले आहेत ही गोष्ट खरी; पण मग ब्राह्मसभेमध्यें ब्राह्मणांकडून वेदाचेंच विवरण होत होतें, व बायबल किंवा कुराण यांचें होत नसे, याचें कारण काय? याचें उत्तर असें, कीं, त्या वेळीं वेदाच्या अर्थाचें स्पष्टीकरण करण्याला एकटे ब्राह्मणच वेदामध्यें पारंगत होते. कोणत्या कां कारणानें होईना, ब्राह्मणे-

तरांनां वेद व वेदाचा अर्थ पारखा होता. बरें, वेदालाच त्यानें प्राधान्य कां दिलें, याचें उत्तर असें, कीं, त्याचा मुख्य उद्देश आपल्या देशबांधवांचें मन एकाच ईश्वराची पूजा करण्याकडे वळवावयाचें हा होता, व त्या वेळीं वेद सर्वांनां ग्राह्य होतील अशी त्याची खात्री झाल्यामुळें त्यानें वेदाचाच प्रथम आश्रय केला. पॉलनेंसुद्धां हेंच धोरण स्वीकारलें होतें. तो आपल्या एका पत्रांत ह्मणतो 'ज्यू लोकांनां माझ्या पक्षाला ओढण्याकरितां मी ज्यूप्रमाणें त्यांच्याशीं वर्तन ठेवतों.' राममोहनानेंहि तसेंच केलें, त्यांत वावगें काय झालें ? शिवाय, हिंदुशास्त्राविषयीं त्याची फार पूज्यबुद्धि होती. त्याचा असा विश्वास होता, कीं, जो कोणी हिंदुशास्त्राप्रमाणें वर्तन ठेवील, त्याला मुक्ति मिळेल. त्या वेळीं प्रचलित असलेल्या मूर्तिपूजेचा त्यानें जोरानें निषेध केला. मूर्तिपूजेनें शाश्वत अशा परमात्म्याकडे लक्ष्य लागणें फार कठिण आहे, अशी त्याची दृढ समजूत होती.

राममोहनाचा कल ख्रिस्तीधर्माकडे होता, पण हिंदूंचीं मनें दुखवूं नयेत ह्मणून त्यानें त्या धर्माचा स्वीकार केला नाहीं, असें जें ख्रिस्ती मिशनरींचें ह्मणणें आहे, तेंहि असेंच फोल आहे. डॉ० कार्पेंटर साहेबांचा पुढील उतारा पहाः—

"राजा राममोहन लंडनमध्यें असतांना तो शहरामधील व आजूबाजूंच्या युनिटेरियन देवळांमध्यें वारंवार उपासनेला जात असे, व दोन वेळां तर त्यांच्या उत्सवप्रसंगींहि तो हजर होता; परंतु कोणत्याहि विवक्षित धर्माशीं आपलें नांव संलग्न न होऊं देण्याविषयीं त्याचा कटाक्ष असे. त्याच्या मतांहून भिन्न असे जे इतर धर्म त्यांच्याहि मंदिरांमध्यें तो जात असे."

राममोहनाच्या मरणानंतर रे. डब्ल्यु. जे. फॉक्स ह्मणतातः—
" राममोहन हा मोठा सुधारणावादी होता. देशाभिमानानें प्रेरित

होऊन त्यानें मानवजातीचें अतिशय कल्याण केलें आहे. त्याचें आचरण नेहमीं पवित्र असे. लोककल्याणाकारितां त्यानें जे सतत झटून प्रयत्न केले, त्यांचा परिणाम आपल्यावर झाल्याशिवाय रहाणार नाहीं. ते गुण आपणांला खरोखर घेण्यासारखे आहेत. लोकांची अंधश्रद्धा नाहींशी करण्याकारितां त्यानें जे ग्रंथ लिहिले, ते खरोखर आदरणीय आहेत. मनुष्याचा मूळ जो शुद्ध धर्म–एकेश्वरीधर्म तोच सर्व धर्मांचा खरा पाया आहे, हें त्यानें आपणांला दाखवून दिलें नाहीं काय ? ”

राममोहन हा एकेश्वरी पंथाचा होता, व मरेपर्यंत त्याच्या मतामध्यें मुळींच बदल झालेला नाहीं. ख्रिस्त हा एक मोठा धर्मात्मा होऊन गेला ह्मणून राममोहनाला त्याविषयीं अत्यंत आदर वाटत असे, व त्यामुळें त्याचे सुंदर उपदेश त्याला फार बहुमोलाचे वाटत; पण शाश्वत देवाविषयींचे कुराणांतील देखील उपदेश राममोहनाला बहुमोल वाटत. एवढेंच नव्हे, तर खरें पाहतां कुराणांतीलच उदात्त तत्त्वांमुळें त्याचें लक्ष्य प्रथम मूर्तिपूजेवरून उडून एका सत्य देवाच्या उपासनेकडे लागलें. राममोहनाला कुराणाचें व आरबी आणि फारशी भाषेंतील इतर धर्मग्रंथांचें उत्तम ज्ञान होतें, ह्मणून त्याला ‘मौलवी राममोहन’ असें देखील ह्मणतात. खाजगी संभाषणांत तो वारंवार आपल्या आवडत्या सुफी धर्मांतील वचनें आधाराला घेत असे. मग ख्रिस्ती धर्मशास्त्रांची त्याला चांगली माहिती होती ह्मणून पाहिजे तर त्याला ‘ख्रिश्चन राममोहन’ असें ह्मणावें.

या बाबतींत इंग्लंडाला जाण्यापूर्वी राममोहनानें जें भविष्य केलें होतें, त्याचें स्मरण झाल्याशिवाय रहात नाहीं. आदिब्राह्मसमाजाचे अध्यक्ष बाबू राजनारायण बोस यांचे वडील बाबू नंदकिशोर बोस या आपल्या मित्राजवळ राममोहनानें असें ह्मटलें, कीं, “पहा, माझ्या

मरणानंतर निरनिराळ्या धर्मांचे लोक मी त्या त्या धर्मांचा होतों, असें विधान करून तें जगजाहीरहि करतील, परंतु मी आपणाला सांगून ठेवतों, कीं, मी अमक्याच एका जातीचा किंवा धर्मांचा नाहीं."

राममोहनाचें हें भविष्य पुढें खरें ठरलें. तो निवर्तल्याचें समजतांच त्याच्या धर्माविषयीं मोठा वाद पडला. कित्येक तो हिंदुधर्म मानी असें ह्मणत; कित्येक तो ख्रिस्ती होता असें ह्मणत; युनिटेरिअन तो आपल्या मताचा ह्मणून भांडत; वेदांती ह्मणत, कीं, तो तर अक्षरशः वेदांत मानणारा होता; आणि मुसलमान तो महंमदाचा अनुसारी होता ह्मणून भांडूं लागले. या सर्व पक्षांनां राममोहन आपणांकडे ओढून घेण्याला बरींच सबळ कारणें होतीं, हें मात्र खरें आहे.

या गोष्टींतील रहस्य हें, कीं, जगामध्यें जो जो धर्म आहे, त्या त्या धर्मांतील उदार व उदात्त तत्त्वें ग्रहण करून त्या तत्त्वांचा जयजयकार करण्यास राममोहनानें कधींहि मागें घेतलेलें नाहीं. तीं तत्त्वें जगजाहीर करणें हें आपलें कर्तव्य आहे, तशी ईश्वरी आज्ञा आहे, अशी त्याची पूर्ण खात्री होती. ह्मणून त्यानें हिंदु, मुसलमान, ख्रिस्ती वगैरे सर्व धर्मपुस्तकांतील वचनांचा सांगोपांग विचार करून त्याला जीं उत्तम वाटलीं त्यांचा त्यानें अंगिकार केला.

राजा राममोहन यानें आपल्या अनेक लेखांत आपण प्रतिमापूजनाचा त्याग करून एका सत्य, सनातन परमेश्वराच्या भजनीं कां व कसे लागलों, त्याचें वर्णन केलें आहे. तो ह्मणतो 'उपनिषदांची हीच शिकवण आहे, कीं, या विश्वाचा कर्ता एक परमेश्वर आहे, तो सर्वांशानें आह्मांला ज्ञात नसला तरी तो सत्यस्वरूप असून या विश्वाचा कर्ता, रक्षक व अंतीं नाशहि करणारा तोच आहे. देव एक आहे हें उपनिषदें कंठरवानें सांगत आहेत; आणि असा जो एक देवाधिदेव त्याची मानासिक पूजा शुद्ध रीतीनें कशी

करावी, हेंहि उपनिषदें सांगत आहेत.' तथापि वेद हे ईश्वरप्रणीत आहेत, ह्मणून ते आपणांला सर्वांशानें मान्य असले पाहिजेत, असें मात्र राममोहनाचें मत नव्हतें. त्याचें नेहमीं हें सांगणें असे, कीं, 'आपले धर्मग्रंथ आस्थेनें वाचा, त्यांची हेळसांड करूं नका, त्यांची काय शिकवण आहे ती पहा व तसें करीत असतांना आपल्याला जें सारासार विचारसामर्थ्य देवानें दिलें आहे त्याचा उपयोग करा आणि देव व परमेश्वर यासंबंधानें आपलें काय कर्तव्य आहे, याचा विचार करून शास्त्रांच्या आज्ञा पाळा.'

पुरातन काळीं आपल्या ऋषीमुनींनीं, साधुसंतांनीं ज्या शाश्वत, सनातन, निर्विकार अशा परमेश्वराची पूजा केली तीच पूजा राममोहनाला ग्राह्य झाली, ह्मणून तो खरा हिंदूच होय, आणि हिंदुत्वाच्या नात्यानें त्यानें हिंदुशास्त्रांची बाजू घेऊन त्यांमध्यें सांगितलेली पूजा मानवी मनाला उच्च व योग्य आहे असें ह्मणून ख्रिस्ती वगैरे मिशनरींबरोबर त्यानें मोठा वादविवाद केला. पूर्वी सांगण्यांत आलेंच आहे, कीं, प्रचलित मूर्तिपूजेचा राममोहनानें जोरानें निषेध केला; पण हिंदुशास्त्रांविषयींचा त्याचा आदर केव्हांहि कमी झाला नाहीं. ईशोपनिषदाच्या प्रस्तावनेंत तो ह्मणतो 'हिंदु लोकांतील प्रचलित मूर्तिपूजेच्या प्रकारामुळें जे हिंदु लोक एरवीं दुसऱ्यांनां आदर्शवत् होतील, त्यांची नैतिक अवनति झालेली पाहून मला अतिशय वाईट वाटतें. त्यांच्या अंगीं सहनशीलता आहे, ते मनाचे कोंवळे आहेत, ह्मणून त्यांची भवितव्यता फार सुंदर आहे. त्यांच्या शास्त्रांमध्यें एकाच अविनाशी परमेश्वराची पूजा सांगितली आहे, एवढेंच नव्हे, तर त्यांमध्यें शुद्ध अशीं पुष्कळ नैतिक तत्त्वें आहेत; ह्मणून मीं त्या शास्त्रांचें भाषांतर करून तीं उत्तमोत्तम तत्त्वें लोकांपुढें मांडण्याचें योजिलें आहे. पण तसें करीत असतांना सध्यांच्या भिक्षुकवर्गाकडून प्रचलित पद्धतीसंबंधानें जीं विधानें करण्यांत येत आहेत, तीं मला

खोडून टाकणें भाग आहे. माझी अशी खात्री आहे, कीं, केव्हां ना केव्हां तरी मूर्तिपूजेसंबंधाची आपली चुकी लोकांनां आढळून येईल, व त्यांचें लक्ष्य एका सनातन, सत्य ईश्वराकडे लागल्याशिवाय रहाणार नाहीं, व लोकांनीं आपल्याशीं जसें वागावें अशी आपली इच्छा आहे तसें आपण त्यांच्याशीं वागलें पाहिजे, या उदात्त तत्त्वाची सत्यता कळून आल्याशिवाय रहाणार नाहीं.'

कित्येक धर्मोपदेशकांची अशी समजूत असते, कीं, राजकीय आणि सामाजिक विषय यांचा समावेश ऐहिक गोष्टींमध्यें होतो, ह्मणून त्यांच्याशीं संबंध ठेवणें आपलें काम नाहीं; पण राममोहनानें सर्व जगाच्या असें निदर्शनाला आणून दिलें, कीं, ऐहिक सर्व गोष्टींचा धार्मिक मनुष्याच्या कर्तव्यामध्यें समावेश झाला पाहिजे. प्रत्येक गोष्ट त्यानें धार्मिकतेनें करावी. नुसतें एकांतस्थळीं बसून ध्यानामध्यें निमग्न होणें हा खरा धर्म नव्हे. जगाच्या संसर्गापासून दूर राहून रानावनामध्यें रहाणें हाहि धर्म नव्हे. आपापल्या योग्यतेप्रमाणें जगाची सुधारणा करणें प्रत्येकाचें कर्तव्य आहे. राममोहन नेहमीं ह्मणत असे, कीं, ईश्वराची भक्ति करण्याचा खरा मार्ग ह्मटला ह्मणजे मनुष्यमात्राच्या उपयोगी पडणें हा होय.

राममोहनाच्या धार्मिक मतांचा कांहीं लोकांवर कसा परिणाम झाला, हें १८२० मध्यें जी एक चमत्कारिक गोष्ट घडून आली तीवरून कळून येतें एका कोर्टामध्यें एक बंगाली गृहस्थ साक्ष देण्याकरितां आला. पण प्रथमारंभीं गंगेच्या उदकाची जी शपथ प्रत्येक बंगाली मनुष्याला घ्यावी लागे, ती घेण्याचें त्यानें नाकारलें. आपण राममोहनाचा अनुयायी आहों व आपला त्या शपथेवर विश्वास नाहीं, असें त्यानें कोर्टाला सांगितल्यावरून तशा प्रकारची शपथ घेतल्याशिवायच त्याची साक्ष घेण्यांत आली.

प्रकरण सहावें.

# मृत्यूनंतर ब्राह्मसमाजाची व्यवस्था.

राममोहन इंग्लंडमध्यें असतांना त्याचा वडील मुलगा राधाप्रसाद राय हा समाजाचा एक ट्रस्टी होता, व त्यानें बाबू द्वारकानाथ टागोर यांच्या मदतीनें समाजाची उत्तम व्यवस्था ठेविली. परंतु राममोहनाच्या मृत्यूनंतर आपल्या बापाच्या मालमत्तेची भानगड मिटविण्याकारितां त्याला दिल्लीला जावें लागलें. पुढें तो दिल्लीहून परत आल्यावर समाजाच्या कामांत मन घालीनासा झाला. ताराचंद चक्रवर्ती व चंद्रशेखर देव हे फार उत्साहि गृहस्थ होते, पण ते राममोहनाच्या पश्चात् बरद्वान येथें गेले, व तेथेंच तेथील राजाच्या आश्रयाला राहिले. राममोहनाच्या वजनामुळें जे लोक समाजाला येऊन मिळाले होते, तेहि हलकेहलके समाजाला सोडून गेले. बाबू द्वारकानाथ ठाकूर व रामचंद्र विद्यावागीश हेच काय ते दोघे गृहस्थ अखेरपर्यंत समाजाला चिकटून राहिले, व त्यांच्या परिश्रमानें राममोहनानें पेरिलेल्या बीजाचा रोपा बनला म्हणण्यास हरकत नाहीं. या दोघांच्या मदतीशिवाय तें बीं रुक्ष बनून गेलें असतें.

१८३३ मध्यें राममोहन निवर्तल्यानंतर समाजाची स्थिति फारच खालावली; परंतु वरील दोन गृहस्थांच्या श्रमामुळें लवकरच त्याची भरभराट होऊं लागली. द्वारकानाथ ठाकूर यांच्यामागें अनेक व्यवसाय असून त्यांचा संबंध प्रत्येक सार्वजनिक कामाशीं असल्यामुळें समाजाकडे लक्ष्य देण्याला त्यांना फार थोडा वेळ मिळत असे; परंतु समाजाची व्यवस्था पाहण्याला त्यांनीं आपल्या दिवाणाला सांगितलें होतें, व समाजाच्या खर्चाकारितां ते दरमहाचे दरमहा

८० रुपये देत असत. समाजाची अंतर्व्यवस्था पंडीत रामचंद्र विद्यावागीश हा पहात असे. तो राममोहनाच्या घरींच लहानाचा मोठा झाला होता, व राममोहनानें लावलेल्या रोप्याचें रक्षण करणें हें आपलें कर्तव्य आहे असें तो समजत असे. समाजाचें हें जड काम करणें त्याला प्रथम अवघड वाटूं लागलें. सेंट पीटरप्रमाणें धर्माच्या बाबतींत त्याच्या मनाची बरेच वेळां चलबिचल झाली. असें ह्मणतात, कीं, सतीचा कायदा बंद केल्यामुळें जी हाकाटी सुरू झाली तिच्या तुफानामध्यें हा सांपडून याची भयंकर स्थिति झाली होती, व हा कायदा बंद करण्याकरितां कर्मठ हिंदूंनीं जेव्हां विलायत सरकाराकडे अर्ज पाठविला, तेव्हां त्या अर्जावर यानें आपली सही केली होती. परंतु सेंट पीटरप्रमाणेंच त्याला पुढें पश्चात्ताप झाला, व राममोहनानें जो समाज मागें ठेविला होता, त्याची मनोभावें सेवा करून त्यानें आपला पश्चात्ताप व्यक्त केला. या समाजाला पुढें त्यानें आपलें सर्वस्व अर्पण केलें. क्षणभर जरी तो त्या वावटळीमध्यें वहावत गेला होता, तरी त्याची भरपाई त्यानें पुढें केली. पुढेंपुढें तर जेव्हां बहुतेकजण समाज सोडून गेले व समाजाच्या शत्रूंनीं केलेलें भविष्य खरें ठरण्याची वेळ आली, तेव्हां या गृहस्थानें आपली शिकस्त करून समाजाचें जड जूं आपल्या मानेवर घेऊन तें अखेरपर्यंत खालीं ह्मणून ठेविलें नाहीं. एकाद्या स्मशानामध्यें सायंकाळच्या वेळीं दिवा लावणें हें काम जितकें भयानक व उदासीनतेचें आहे, तितकें कठिण काम या गरीब ब्राह्मणाला करावें लागलें! पण थंडी, वारा, ऊन, ताप यांची मुळींसुद्धां पर्वा न करितां त्यानें तें केलें. ठरलेल्या वेळीं समाजाचें काम करण्याला त्यानें केव्हांहि हयगय केलेली नाहीं. नियमित वेळीं उपासना चालवावयाची, असा त्याचा बाणा असे. जे कोणी आस्थेनें समाजांत येत, त्यांना

धर्मबाबतींत तो आपला पोक्त सल्ला देत असे. सन १८४३ सालीं द्वारकानाथ ठाकूर यांचा वडील मुलगा देवेंद्रनाथ ठाकूर* समाजाला येऊन मिळाला, व १८४४ सालीं रामचंद्र विद्यावागीश यांचा बनारसला जात असतांना वाटेंत मुर्शिदाबाद येथें अंत झाला. देवेंद्र समाजांत आल्याबरोबर विद्यावागीश याचा अंत झाला. जणूं काय आपल्या धन्यानें आपल्या स्वाधीन केलेला हा ठेवा कोणातरी योग्य माणसाच्या स्वाधीन करण्याची वाटच विद्यावागीश पहात होता, व असा योग्य पुरुष मिळाल्याबरोबर त्यानें तो त्याच्या स्वाधीन करून आपण परलोकची यात्रा केली. मरणसमयीं आपली होती नव्हती तेवढी पुंजी म्हणजे ५०० रुपये त्यानें समाजाला देऊन आपली कृतज्ञताबुद्धि व्यक्त केली.

ब्राह्मधर्मतत्त्वांचा प्रसार करण्याकरितां हा जो समाज राममोहनानें स्थापन केला होता, त्याला प्रथम 'ब्राह्मसभा' असें म्हणत असत. पुढें त्याला 'कलकत्ता ब्राह्मसमाज' असें नांव देण्यांत आलें. १८६६त समाजांत दुफळी होऊन एकाचे दोन समाज झाले. तेव्हां सन १८६८ सालापासून या समाजाला 'आदिब्राह्मणसमाज' असें नांव मिळालें. या आदिब्राह्मणसमाजाचें चालकत्व सध्यां रविंद्रनाथ ठाकूर यांच्याकडे आहे.

---

* हे गृहस्थ महर्षि देवेंद्रनाथ ठाकूर या नांवानें प्रसिद्ध आहेत. प्रसिद्ध विद्वान् कवि रविंद्रनाथ ठाकूर यांचे हे तीर्थरूप होत.

# पंचम परिच्छेद.

## प्रकरण पहिलें.

## परदेशगमन.

युरोप खंडांत जाऊन तेथील लोकांच्या रीतीभाति, विद्या, धर्म व राजनीति यांची माहिती करून घेण्याची आणि विशेषेंकरून ज्या देशाच्या हातीं ईश्वरानें आपल्या देशाच्या नशिबाची दोरी देऊन ठेविली आहे, विद्या, कलाकौशल्य व स्वतंत्रता यांचें जो भांडार असून बेकन, न्यूटन, हाम्पडेन, वॉटसन इत्यादि महापुरुषांची जो जन्मभूमि आहे असा प्रदेश प्रत्यक्ष जाऊन पहाण्याची राममोहनाची पुष्कळ दिवसांपासून उत्कट इच्छा होती; परंतु त्यानें शिरावर घेतलेलीं अनेक महत्त्वाचीं कार्यें तडीला जाईपर्यंत त्याला हिंदुस्तान सोडतां आलें नाहीं, व त्यामुळें इंग्लंडला जाण्याची आपली इच्छा कांहीं काळपर्यंत तहकूब ठेवणें त्याला भाग पडलें. शिवाय राममोहनानें स्वधर्म सोडला म्हणून तो जातिबहिष्कृत झाला, तेव्हां वडिलोपार्जित मालमत्तेवर त्याचा हक्क पोहोंचत नाहीं, अशा मुद्यावर त्याच्यावर त्याच्या पुतण्यांनीं सरकारांत फिर्याद केली होती, त्यामुळेंहि त्याचें जाणें लांबणीवर पडलें. शेवटीं या फिर्यादीचा निकाल राममोहनातर्फे झाला, आणि त्याच्या मतांचाहि लोकांमध्यें बराच प्रसार झाला, तेव्हां इंग्लंडला जाण्याविषयीं त्याच्या मनानें पुनः उचल खाल्ली.

इ. स. १८३० मध्ये राममोहनानें इंग्लंडला जावें, असा योगहि घडून आला. इंग्लंडमध्यें ईस्ट इंडिया कंपनीला दिलेल्या

सनदेची मुदत संपत आली होती, व ती मुदत वाढवावयाची झाल्यास कोणत्या अटीवर वाढवावी, व सतीचा कायदा बंद करावा कीं काय, याविषयीं तिकडे वादविवाद होणार होता. इंग्लंडास जाऊन आपल्या देशबांधवांचें कल्याण करण्यास ही संधि योग्य आहे, असें राममोहनाला वाटलें. दैवयोगानें याच संधीला दिल्लीच्या पदच्युत बादशहाला इंग्लंडमधील अधिकाऱ्यांपुढें आपल्या गाऱ्हाण्यांची दाद लावून घेण्यासाठीं कोणी तरी हुषार वकील तिकडे पाठवावयाचा होता, व तशा मनुष्याच्या तो तपासांत होता. १८२७ मध्यें लॉर्ड आमहर्स्टनें त्याच्याशीं जो करार केला होता, त्या कराराच्या योगें बादशाहाला फार निकृष्टावस्था प्राप्त झाली होती. आजपर्यंत कंपनी दिल्लीपती बादशाहाला सर्व हिंदुस्तानचा चक्रवर्ती किंवा सार्वभौम कबूल करून आपणांला त्याचे अंकित ह्मणवून राज्य-कारभार करीत असे; परंतु सन १८२६ त तिनें बादशाहाला हा पोकळ मान देण्याचें बंद केलें आणि नाण्यावर वगैरे आपलें नांव घालून आपणांला सर्व देशाचे स्वामी ह्मणवूं लागली. यावरून आणि आपल्या राजधानीच्या आसपासच्या कांहीं मुलखाचा वसूल आप-णाला असावा ह्मणून बादशाहानें कोर्ट ऑफ डायरेक्टर्स याला अर्ज केला होता. त्याचा त्यांनीं व पुढें बोर्ड ऑफ कंट्रोल यांनीं विचार करून असें ठरविलें, कीं, बादशाहाला कराराप्रमाणें किंवा न्यायाच्या रीतीनें जेवढें पोहोंचावयाचें, तेवढें पोहोंचत आहे. या जबाबावरून बादशहानें इंग्लंडच्या राजाकडे अपील करण्याचा निश्चय केला, व राम-मोहनरायाला आपला वकील नेमून व आपल्या वतीनें सर्व बोलणें-चालणें करण्याचा पूर्ण अधिकार देऊन जाण्यापूर्वी ह्मणजे १८२९ च्या आगस्टांत त्याला राजा ही बहुमानाची पदवी दिली.

## परदेशगमन.

राममोहन आत्मचरित्रांत लिहितोः—

"इंग्लंडला जाऊन तेथील लोकांच्या रीतिभाति, त्यांचा धर्म व त्यांच्या राजकीय संस्था पाहण्याची माझी पुष्कळ दिवसांपासून इच्छा होती; पण माझ्या या मताला पाठिंबा देणारे मला बरेच मित्र मिळेपर्यंत मला माझी मनीषा तृप्त करितां आली नाहीं. १८३० च्या नोव्हेंबरांत मात्र तसा योग आला. इंग्लंडमध्यें कंपनीच्या ज्या सनदेचा विचार होणार होता, तिचा परिणाम पुष्कळ वर्षे हिंदुस्तानच्या भवितव्यतेवर टिकणारा होता. प्रिव्ही कौन्सिलपुढें सतीच्या कायद्याचा विचार होणार होता, व शिवाय दिल्लीच्या बादशहानें आपले हक्क इंग्लंडमधील अधिकाऱ्यांपुढें मांडण्याकरितां मला वकील नेमिलें, ह्मणून मी इंग्लंडला १८३१ च्या एप्रिलमध्यें आलों."

मॉंटगॉमरी मार्टिन हा 'बंगाल हेरल्ड' या इंग्रजी वर्तमानपत्राचा संपादक होता. पुढें १८२९ सालीं राममोहन व त्याचे दोघे मित्र त्या पत्राचे मालक झाले; पण कांहीं कारणामुळें तें पत्र बंद पडलें, तेव्हां दिल्लीच्या बादशहानें मॉंटगॉमरी मार्टिनला राममोहनाचा मदतनीस नेमिलें. हे दोघे १८२९ च्या सप्टेंबरच्या आरंभीं यूरोपाला जाण्याकरितां निघणार होते; परंतु राममोहनाला सतीच्या कायद्याला मदत करावयाची होती ह्मणून त्यांचें जाणें लांबणीवर पडलें. मध्यंतरीं सतीच्या बंदीचा कायदा पास झाला, व त्याविरुद्ध लोक इंग्लंडच्या राजाकडे अपील करणार हें जेव्हां राममोहनानें ऐकिलें, तेव्हां तेथें लवकर गेलेंच पाहिजे असें त्याला वाटलें, व तिकडे जाण्याची त्यानें जय्यत तयारी चालविली. १८३०च्या जानेवारीच्या८व्या तारखेला त्यानें लॉर्ड वुइलियम बेंटिंक यांनां पुढील अर्थाचें पत्र लिहिलें:—

"कांहीं महिन्यांपूर्वीं दिल्लीचे बादशहा अबुनसूर मोइनिद्दीन महंमद अकबर यांनीं मला ब्रिटिश राजाकडे जाऊन त्यांच्यातर्फे वकिली करण्याकरितां नेमून 'राजा' हा किताब दिला आहे. प्रथम

ती पदवी धारण करणें मला आवडलें नाहीं; पण एवढ्या मोठ्या सत्ताधीश राजापुढें दिल्लीच्या बादशहाचा वकील ह्मणून तुह्माला जावयाचें आहे, तेव्हां तुह्मीं ही पदवी धारण केली पाहिजे, असा बादशहाचा आग्रह पडल्यामुळें मीं ती पदवी स्वीकारण्याचें योजलें आहे. तेव्हां ती पदवी धारण करण्याला आपण परवानगी द्याल, अशी मला आशा आहे. १८२७च्या जूनच्या २६व्या तारखेला सर चार्लस् मेटकॉफ यांच्या शिफारशीमुळें जो कायदा सरकारानें पास केला आहे, त्या कायद्याअन्वयें बादशहाला आपल्या प्रजेला अशा प्रकारची पदवी देतां येते, तेव्हां बादशहाचें हें करणें कायद्याला अनुसरूनच आहे."

या पत्राला गव्हरनर जनरलचे प्रायव्हेट सेक्रेटरी स्टार्लिंग यांनीं तारीख १५ जानेवारी रोजीं उत्तर पाठवून पुढील जबाब दिला " राजा ही पदवी आपल्याला स्वीकारूं देण्यास किंवा दिल्लीच्या दरबारचे आपण वकील ह्मणून इंग्लंडाला जातां तें कबूल करावयाला सरकार तयार नाहीं !"

कंपनीच्या नोकरांच्या मार्फत प्रयत्न न करितां राममोहन थेट विलायतेला जाऊन बादशाहाकरितां कंपनीविरुद्ध गाऱ्हाणीं करणार होता, तेव्हां त्याच्या पत्राला वरीलप्रमाणें जबाब मिळाला, यांत नवल नाहीं. असा जरी जबाब मिळाला, तरी दुसऱ्या दिवशीं सतीच्या कायद्याबद्दल गव्हरनर जनरलचें अभिनंदन करणारी सभा झाली, तिला राममोहन हजर होताच.

सतीचा कायदा करण्याच्या कामीं राममोहनानें जी खटपट केली, त्यामुळें तो पुष्कळांच्या रोषाला पात्र झाला होता. शिवाय, आतां तो यूरोपाला जाणार असें समजतांच तर हिंदु लोकांत मोठा गवगवा झाला. तो म्लेंच्छांच्या व गोमांसभक्षकांच्या देशीं जाणार, असें ह्मणून लोक त्याचा अधिकच तिरस्कार करूं लागले. राममोह-

नाची परोपकारबुद्धि आणि जिज्ञासा न जाणतां हें पर्यटन करण्यांत त्याचा कांहीं अयोग्य हेतु आहे, अशा भलत्याच कल्पना ते करूं लागले. देशामध्यें लोक सर्वत्र खवळून गेले, व त्यांच्या वाटेमधील राममोहन हा कांटा काढून टाकण्याचा ते प्रयत्न करूं लागले. परंतु राममोहन मुळींच डगमगला नाहीं! ज्यानें धर्मसभेशीं युद्ध करून जय मिळविला, व ब्राह्मणांनीं केलेली निंदा आणि शाप यांनां जो दचकला नाहीं, तो अशा डुरकावणीला थोडीच भीक घालणार! त्याला ही गोष्ट समजली, तेव्हां मॉर्टिनला त्यानें कळविलें, कीं, माझा जीव घेण्याकारितां मारेकरी टपून बसले आहेत. तेव्हां मॉर्टिन त्याच्याच घरीं येऊन हत्यारांनिशीं राहूं लागला. बंदूक, तरवार वगैरे देऊन जिकडेतिकडे रखवालदार ठेविले. दररोज बंदुकांचे बार मारेकऱ्यांनां भिवविण्याकारितां निघूं लागले. राममोहन जेव्हांजेव्हां शहरांत जाई, तेव्हांतेव्हां मॉर्टिन त्याच्याबरोबर पिस्तूल वगैरे घेऊन जात असे. राममोहनहि नेहमीं आपल्याबरोबर हत्यार बाळगीत असे. त्याच्यावर एवढा जरी प्रसंग आला, तरी सतीच्या चालीविरुद्ध पुस्तकें लिहून तीं प्रसिद्ध करण्याला किंवा डफसाहेबाला शाळा काढण्याच्या कामीं मदत करण्याला तो यत्किंचित्‌हि डगमगला नाहीं!

इंग्लंडला जाण्यापूर्वी राममोहनानें रामनाथ ठाकूर, कालीनाथ मुनशी आणि आपला वडील मुलगा राधाप्रसाद याला ब्राह्मसभेचे ट्रस्टी नेमून विश्वंभरदास याला सेक्रेटरी नेमलें. राममोहनानें घालून दिलेल्या तत्त्वाबरहुकूम या गृहस्थांनीं समाजाची व्यवस्था चालविली. फक्त उपासनेचा दिवस शनिवार होता, तो बुधवार केला.

विलक्षण बुद्धीचा मनुष्य ह्मणून राममोहनाची कीर्ति तो इंग्लंडला जाण्याच्या आधींच तेथें पसरली होती, व त्याच्या विद्वत्तेविषयीं हिंदुस्तानांतील कांहीं विद्वान् इंग्रजांनीं इंग्लंडांतील आपल्या मित्रांनां

लिहिलें होतें. राममोहन इ. स. १८३० मध्यें नोवेंबरच्या १९ व्या तारखेला आल्बियन बोटीनें जावयाला निघाला. त्यानें आपल्याबरोबर राजाराम, रामरतन मुकरजी आणि रामहरिदास या तिघांना घेतलें होतें. राजारामाविषयीं येथें थोडी हकीकत सांगणें अवश्य आहे. हरिद्वार येथील एका मोठ्या यात्रेमध्यें डिक नांवाच्या एका सिव्हि·लियनला एक मूल सांपडलें. त्यानें त्याला जवळ बाळगून त्याचा प्रतिपाळ केला. पुढें इंग्लंडला जातांना त्यानें तें मूल राममोहनाच्या स्वाधीन केलें. डिकसाहेब परत हिंदुस्तानांत आले नाहींत, तेव्हां तें मूल राममोहनाच्याच ताब्यांत राहिलें. राममोहनाचें त्याजवर अत्यंत प्रेम होतें.

तें जहाज हिंदीमहासागरांत आल्यावर मोठा सोसाट्याचा वारा सुटून भयंकर तुफान झालें, व सर्वांनीं आपल्या जीविताची आशा सोडली. अशा भयंकर वेळीं राममोहन व त्याचे सोबती यांनीं ईश्वरावर पूर्ण हवाला ठेवून ते प्रार्थनेमध्यें निमग्न झाले. त्या प्रसंगाला अनुसरून रामरतन यानें एक गाणें रचलें, व तें चौघांनीं मिळून गाइलें. लौकरच तें संकट नाहींसें झालें. चार महिने व तेवीस दिवसांनीं म्हणजे १८३१ च्या एप्रिल महिन्याच्या ८ व्या तारखेला जहाज सुरक्षितपणें लिव्हरपूल बंदरांत जाऊन नांगरलें.त्याच दिवशीं राममोहन लिव्हरपूल येथें गेला. राममोहनाबरोबरच्या एका उतारूनें त्याच्या जलपर्यटनाचा वृत्तांत पुढीलप्रमाणें लिहिला आहेः–

"तारवावर राममोहन राय आपल्याच खोलींत जेवीत असे.निराळी चूल नसल्यामुळें प्रथम त्याला फार अडचण सोसावी लागली. त्याचे नोकर आजारी पडून त्याच्या खोलींत जाऊन पडले, ते तेथून ढळतचना; परंतु राममोहन रायाचा स्वभाव इतका दयाळू होता, कीं, त्यांना बाहेर काढावयाला सांगण्याऐवजीं तो आपणच उठून दुसऱ्या

ठिकाणीं गेला. बहुतकरून तो संस्कृत आणि हिब्रू वाचीत असे. दोनप्रहरीं आणि संध्याकाळीं तो बाहेर येऊन संभाषण करीत असे. त्याची वृत्ति सर्वकाळ संतोषित असे, आणि त्याच्यावर सर्व मनुष्यांची मर्जी इतकी बसून गेली होती, कीं, खलाशीहि आपल्या हातून घडेल तेवढी त्याची सेवा करण्याला तत्पर असत."

राममोहनाच्या आगमनाविषयीं मि. वुइलियम राथबोनला आगाऊ कळविण्यांत आलें होतें. आपल्या ग्रीन बँक येथील घरांत येऊन राहण्याविषयीं त्यानें राममोहनाला विनंति केली; परंतु स्वतंत्रपणें हॉटेलमध्यें रहाणेंच राममोहनाला पसंत वाटलें. ह्मणून तो रॅडले हॉटेलमध्यें उतरला. या ठिकाणीं त्या वेळचे बहुतेक सर्व प्रसिद्ध पुरुष त्याच्या भेटीला आले. याच ठिकाणीं अनेक पुस्तकांचा कर्ता वुइलियम रास्को याची व राममोहनाची भेट झाली. या विद्वान् मनुष्यानें राममोहनाच्या गाढ विद्वत्तेविषयीं ऐकलें होतें. शिवाय "येशूच्या आज्ञा ह्मणजे सुखाचा व शांतीचा मार्ग—Precepts of Jesus: a guide to peace and happiness" हें राममोहनानें लिहिलेलें पुस्तक त्याच्या उतारवयांत त्याला वाचावयाला मिळालें हें पुस्तक वाचून 'ख्रिस्ती लोकांची नीतिमत्ता (Christian Morality)' नांवाचें लहानपणीं त्यानें जें पुस्तक लिहिलें होतें त्याची त्याला आठवण होऊन राममोहनाची व आपली मैत्री व्हावी, अशी त्याला इच्छा झाली होती. थॉमस हॉगसन फ्लेचर नांवाचा त्याचा एक मित्र हिंदुस्तानांत जात असतांना त्यानें लिहिलेलीं पुस्तकें राममोहनाला बक्षीस देण्याकरितां त्या मित्राजवळ दिलीं, व त्यासोबत एक पत्रहि दिलें. त्यामध्यें असा मजकूर होता, कीं, "या देशामध्यें तुह्मी येऊन तुमची व माझी गांठ पडेल, अशी मला फार आशा वाटत होती; परंतु मी अर्धांगवायूनें पछाडल्यामुळें

तसा योग येईलसें वाटत नाहीं. तथापि तुमच्याविषयीं माझें प्रेम व माझा आदर यांची खूण ह्मणून मी हीं पुस्तकें आपणाकडे पाठवीत आहें. हीं पुस्तकें आपणाला पोहोंचलीं हें समजेपर्यंत तरी मी जिवंत राहिलों, तर त्यायोगें मला फार आनंद होईल !"

पुढें राममोहन इंग्लंडमध्यें गेल्यामुळें त्या दोघांची जेव्हां गांठ पडली, तेव्हां दोघांनांहि फार समाधान वाटलें. दोघांची भेट फार आनंदकारक आणि गहिंवर आणणारी होती. त्या वेळीं राममोहनानें असे उद्गार काढले, कीं, "तुमच्यासारख्या मनुष्याची कीर्ति यूरोप-भरच नव्हे, तर पृथ्वीवर सर्व ठिकाणीं पसरलेली आहे. तेव्हां असा मनुष्य पाहून मला फार आनंद झालेला आहे."

यावर रास्कोनें उत्तर दिलें "असा सुदिन पाहण्याचें माझ्या नशिबीं आलें, ह्मणून मी ईश्वराचे धन्यवाद गातों."

ही या मित्रांची शेवटचीच भेट ! लंडनांत असतांना राममोहनानें रास्कोच्या मरणाचें वर्तमान ऐकलें.

लिवरपूल येथें असतां डाक्टर ग्रंडी यांच्या युनिटेरिअन देवळांत एक वेळ राममोहन राय गेला होता. तेथें ईश्वरस्तवन आणि उपदेश हीं चाललीं होतीं, तीं ऐकून तो फार संतुष्ट झाला. उपासना संपल्या-वर सर्व लोकांनी आपापल्या घरीं जावें, तसें न करितां या हिंदु महा-पंडिताला पहाण्याकरितां त्यांनीं दारांत एकच गर्दी करून टाकिली, आणि राममोहन रायानें त्यांशीं हस्तांदोलन करून कांहीं भाषण केलें, तेव्हांच त्यांनीं त्याला संतोषानें जाऊं दिलें.

लिवरपूल येथें डॉ. स्पर्झहेम यांशीं राममोहनरायाचा परिचय होऊन ते दोघे अत्यंत मित्र झाले असतां राममोहन राय त्यांच्या

विद्येला फेनॉलॉजी* ह्मणावयाला सोडीत नसे! तो असें करी, तेव्हां तो डाक्टर इतकेंच ह्मणे, कीं, या शास्त्राचीं मूलतत्त्वें जर तुह्मांला समजलीं, तर त्याविषयीं तुमचें मत लागलेंच पालटेल.

रिफॉर्म बिलाचें तिसरें वाचन ऐकण्याविषयीं व हिंदुस्तानासंबंधीं पार्लमेंटमधील वादविवाद ऐकण्याविषयीं राममोहन फार उत्सुक होता, ह्मणून तो लवकरच लंडनला जाण्याकरितां निघाला. रास्कोनें त्याला लॉर्ड ब्रूहॅम यांची ओळख करून देणारें एक पत्र दिलें. वाटेंत मँचेस्टर येथील कारखाने पहाण्याकरितां तो उतरला होता. त्याला पहाण्याला लोकांचे थवेच्याथवे जमले होते. वाट मिळण्याकरितां पोलिसांची मदत घेण्यापर्यंतहि पाळी आली.

लंडन येथें आल्यावर लॉर्ड ब्रूहॅम, सर वॉल्टर हार्टन, सर हेन्री स्ट्राची आणि चार्लस् हॉब्स यांच्याशीं राममोहनाची ओळख झाली, व बोर्ड ऑफ कंट्रोलचे अध्यक्ष सर. जे. सी. आफहाउस यांनीं राममोहनाची त्या वेळचे राजे चौथे वुइलियम यांच्याशीं मुलाखत करून दिली. राज्याभिषेकोत्सवसमयीं निरनिराळया राष्ट्रांतील वकिलांकरितां ज्या जागा राखून ठेवण्यांत आल्या होत्या, त्यांपैकीं एक राममोहनाकरितां मुद्दाम राखून ठेवण्यांत आली होती. लंडनचा पूल उघडण्यांत आला तेव्हां इंग्लंडच्या राजानें एक मोठा खाना करविला, त्या खान्याच्या वेळीं राममोहनाला आमंत्रण केलें होतें. जुलईच्या ६ व्या तारखेला लंडन टॅव्हर्नमध्यें त्याच्या सन्मानार्थ कोर्ट ऑफ डायरेक्टर्सकडून ईस्ट इंडिया कंपनीतर्फे एक मेजवानी देण्यात आली. त्या वेळीं कंपनीचे चेअरमन व डेप्युटी चेअरमनहि हजर होते.

---

* फेनॉलॉजी ह्मणजे कोणत्याहि मनुष्याच्या मस्तकाच्या आकृतीवरून आणि रचनेवरून त्याच्या मनाचे गुणधर्म आणि शक्ति यांचें अनुमान करण्याची विद्या.

लंडनमध्यें असतांना पहिले कांहीं महिने राममोहन एका हॉटेल-मध्यें रहात होता; परंतु हिंदुस्तानचे हितेच्छु डेव्हिड हेअर यांच्या भावाच्या विनंतीमुळें राममोहन बेडफर्ड स्क्केअरमध्यें त्यांच्या घरीं राहूं लागला. त्या ठिकाणीं त्या वेळचे मुख्यमुख्य नामांकित गृहस्थ दिवसा ११ व ४ यांच्या दरम्यान राममोहनाला भेटावयाला येत. त्याला पाहण्याची बेंथॅम या प्रख्यात तत्त्वज्ञान्याला तर इतकी उत्कंठा लागून राहिली होती, कीं, राममोहन लंडन शहरीं आला त्याच रात्रीं तो त्याला भेटावयाला आला.

या तत्त्वज्ञान्यानें आपल्या भेटीला येण्यांत आपणाला किती मान दिला हें राममोहनानें पुरतें जाणलें. आपल्या आयुष्याचा अवघा काळ ज्या बेंथॅमनें प्रपंचसुखाचा केवळ परित्याग केला होता, आणि कोणाकडे नाचतमाशा पहाण्याला किंवा जेवणाखाण्यालाहि जावयाचें नाहीं असा नियम धरला होता, तो आपलें वैराग्य टाकून मुद्दाम राममोहनाची भेट घेण्याला आला,यावरून या असाधरण हिंदूविषयीं त्याच्या मनांत किती आदर वसत होता, हें स्पष्ट दिसून येतें. नंतर त्या दोघांची भेट झाली, तेव्हां मनुष्याच्या सुखाचीं जीं मुख्य दोन धोरणें—राज्यव्यवस्था व नीतिधर्म याविषयीं, हिंदु लोकांच्या स्थिती-विषयीं आणि कंपनीच्या राज्यपद्धतीविषयीं कांहीं संभाषण झालें. तो तत्त्वज्ञानी ह्मणाला "राममोहन राय तेहतीस कोटी देवांची पूजा टाकून अत्युत्तम असा जो धर्मविषय त्यांत विचाराचा अवलंब करा-वयाला आह्मांजवळ शिकला आहे. मनुष्यजातीचें कल्याण करण्यांत राममोहन आपला अति प्रियकर आणि उपयुक्त भागीदार आहे."

तेथील सर्व प्रकारचे व सर्व पंथांचे लोक राममोहनाला फार मान देत असत. युनिटेरिअन असोशिएयनमार्फत एक जंगी सभा भरून त्याचा मोठा सन्मान करण्यांत आला. सर जॉन बाउरिंग यांच्याकडे

त्याचें अभिनंदन करण्याचा ठराव सोंपविण्यांत आला होता. त्यांनीं एक सुंदर भाषण करून त्याच्या विद्वत्तेविषयीं फार तारीफ केली. त्या ठरावाला युनायटेड स्टेटसमधील हॉरवर्ड युनिव्हर्सिटीचे अध्यक्ष डॉक्टर कर्कलंड यांनीं जोराचा पाठिंबा दिला. नंतर रेव्हरंड रॉबर्ट ॲसलँड—त्या सभेचे चेअरमन—यांनीं अशी सूचना केली, कीं, सर्वांनीं उठून हा ठराव पास करावा. त्याप्रमाणें सर्वजण उठले व त्यांनीं तो ठराव सर्वांनुमतें पास केला. त्या प्रसंगीं राममोहनानें पुढीलप्रमाणें थोडक्यांत भाषण केलें:—

"या सभेमध्यें माझा जो सन्मान करण्यांत आला आहे, त्याला योग्य असें उत्तर देण्याइतकी आज माझी प्रकृति बरी नाहीं. मी बराच थकलेला आहें. परंतु डॉ. कर्कलंड, व डॉ. बाउरिंग यांनीं मला आपला मित्र असें ह्मटलें, व आपण सर्वांनीं मला या आपल्या संस्थे मध्यें बंधु या नात्यानें सामील करून घेतलें, त्याबद्दल मी आपला फार फार आभारी आहें. या आपल्या धर्माची वाढ करण्याच्या कामीं मी थोड्या अंशानें तरी कारणीभूत झालों कीं नाहीं, हें मला माहीत नाहीं; परंतु आपल्याप्रमाणेंच माझाहि एकाच ईश्वरावर भरंवसा आहे, व आपलीं जीं मतें त्याचसारखीं माझीं मतें आहेत. माझा हा जो विश्वास तो माझ्या स्वतःच्याच कल्याणाकरितां व शांतीकरितां आहे, अशी माझी दृढ समजूत आहे. तुमच्या संस्थेकरितां जर मीं कांहीं केलें असेन तर तें इतकें अल्प आहे, कीं, त्याबद्दल मी कोणत्याहि प्रकारें स्तुतीला पात्र ठरत नाहीं. मीं तुमच्याकरितां काय केलें, हें मला समजत नाहीं. हिंदुस्तानांत असतांना मला अनेक अडचणी सहन कराव्या लागल्या. प्रथम माझे आप्त जे ब्राह्मण ते माझ्या विरुद्ध उठले, व नंतर पुष्कळ ख्रिस्ती गृहस्थहि माझ्या आप्तांपेक्षांहि माझा अधिक द्वेष करूं लागले. मी ख्रिश्चन

लोकांना पुष्कळ सांगून पाहिलें; परंतु युनिटेरिअन ख्रिश्चानिटीच्या विरुद्ध त्यांनीं काहूर माजविलें, व मार्गांत अनेक अडचणी उत्पन्न केल्या. या ठिकाणींहि तशा प्रकारचे कांहीं लोक आहेत. परंतु हिंदुस्तानांत त्यांची संख्या अधिक आहे. साधीं तत्त्वें जरी त्यांच्यापुढें ठेविलीं, तरी ते त्यांचा तिटकारा करितात, व अनुयायांना भ्रमवून टाकणारे असे गूढ चमत्कार ते मोठ्या जोरानें प्रतिपादितात. त्याचा परिणाम असा झाला, कीं, त्यांच्या या अडथळ्यामुळें आमची प्रगति अगदीं अल्प प्रमाणावर होत आहे. या देशामध्यें एकेश्वरी धर्माची जी प्रगति आहे, त्या मानानें हिंदुस्तानांतील एकेश्वरी धर्माची प्रगति माझ्या हातून कांहींच झाली नाहीं, याबद्दल माझी मला लाज वाटते. तथापि हाच धर्म जर खरा व सार्वत्रिक आहे, तर याचा प्रसार कांहींहि अडचणी आल्या तरी सर्वत्र झाल्याखेरीज रहाणार नाहीं. बुद्धि, धर्मशास्त्र व सारासार विचार या त्रयींचा, पैसा, सत्ता व हटवाद या त्रयींशीं सारखा झगडा चालला आहे. परंतु माझी अशी खात्री आहे, कीं, आपणांला कधिनाकधीं तरी जय मिळाल्याशिवाय रहाणार नाहीं. मला आतां थकल्यासारखें वाटतें, ह्मणून आपण माझा जो सन्मान केला. त्याबद्दल आपले पुनः मनःपूर्वक आभार मानून मी रजा घेतों."

व्हिग आणि*कॉन्सर्वेटिव्ह ह्मणून इंग्लंडांत जे दोन राजकीय पक्ष असत त्या दोहोंतीलहि पुढाऱ्यांवर राममोहन रायाचें मोठें वजन असे, आणि हें वजन त्यानें आपला स्वार्थ साधण्यांत खर्चिलें नाहीं,

* कॉन्सर्वेटिव्ह किंवा ज्यास टोरी असेंहि ह्मणतात, ते लोक बहुधा राज्याचा आणि जुन्या चालींचा पक्ष धरून भांडत असत, आणि व्हिग हे बहुधा लोकांच्या हक्कांचा, मोकळिकीचा आणि राज्यपद्धतींत वारंवार सुधारणा करण्याचा कैवार घेत असत.

तर आपल्या देशाचें कल्याण करण्यांत त्या वजनाचा उपयोग केला. त्यानें जें कांहीं केलें त्या अवघ्याचा उद्देश ज्या भूमातेच्या उदरीं आपण जन्म घेतला, तिच्या बालकांचें ह्मणजे आपल्या बांधवांचें कल्याण करावें हा असे, आणि यावरून एका ग्रंथकारानें असें ह्मटलें आहे, कीं 'कांटेऱ्या झाडांमध्यें जसा एकादा चांफा असतो, तसा राजा राममोहन राय आपल्या स्वदेशीय लोकांत होऊन गेला.'

राममोहन इंग्लंडमध्यें असतांना तेथें प्रचलित असलेल्या निरनिराळ्या धर्मांची माहिती करून घेण्याची संधि त्यानें दवडली नाहीं. तो युनिटेरिअन लोकांच्या सभांना जात असे, व त्यानें कित्येक मुख्यमुख्य गृहस्थांबरोबर धार्मिक विषयांवर वादविवाद केला. हिंदुस्तानामध्यें त्यानें लिहिलेल्या पुस्तकांचीं भाषांतरें करून त्यानें तीं इंग्लंडमध्यें प्रसिद्ध केलीं. त्यानें आपल्या जलपर्यटनाचें व प्रवासाचें वर्णन लिहून ठेविलें, व इंग्लिश लोकांची संपत्ति, त्यांची सत्ता, त्यांच्या चालीरीति व इंग्लंडमधील स्त्रियांचें सौजन्य व सद्गुण यांविषयींहि लिहून ठेविलें होतें. एक मासिक पुस्तक काढून त्यामध्यें तें सर्व क्रमशः प्रसिद्ध करावें, अशी त्याची इच्छा होती. दुर्दैवानें ही इच्छा पार पडली नाहीं.

१८३२ च्या शेवटीं राममोहन लंडनहून फ्रान्समध्यें गेला, व तेथून यूरोपमधील दुसरे देश पहावे अशी त्याची इच्छा होती; परंतु त्याची ती इच्छाहि पूर्ण झाली नाहीं. १८३३ च्या जानेवारी महिन्याच्या ३१ व्या तारखेला लंडनमधील त्यानें आपल्या एका मित्राला एक पत्र लिहून कळविलें, कीं, फ्रान्समध्यें मी फार दिवस राहिल्यामुळें मला इटलीला जातां आलें नाहीं. शिवाय फ्रेंच भाषेचें ज्ञान असल्याशिवाय परकीयांबरोबर संभाषण करणें सोपें नाहीं असें मला आढळून आलें, ह्मणून इटली व ऑस्ट्रिया यांमधून प्रवास करूं

नये असें मला वाटलें. मी एका फ्रेंच गृहस्थाजवळ फ्रेंच भाषेचा अभ्यास करीत आहें.

फ्रान्समध्यें असतांना फ्रान्स देशाचा राजा लुई फिलीप याजबरोबर राममोहनाची मुलाखत झाली, व दोन वेळां त्याच्याबरोबर भोजनाचा मानहि राममोहनाला मिळाला. तेथील विद्वान् लोकांनीं राममोहनाची ओळख करून घेतली. तेथील एशियाटिक सोसायटी या संस्थेनें राममोहनाला आपला सन्मान्य सभासद केलें.

इंग्लिश पार्लमेंटमध्यें या वेळीं कांहीं महत्त्वाच्या प्रश्नांचा खल होत असल्यामुळें त्या वेळीं तेथें हजर रहाणें राममोहनाला अवश्य वाटल्यावरून तो फेब्रुवारींत तेथें गेला. यानंतर थोड्याच दिवसांनीं प्रसिद्ध मिस मेरी कार्पेंटर इचा बाप डॉ. कार्पेंटर यानें आणि राममोहनाच्या इतर मित्रांनीं त्याला ब्रिस्टल् येथें येण्याला बोलविलें. राममोहनाला तेथें जाण्याची फार इच्छा झाली. पण लंडनमध्यें त्याला अतिशय काम असल्यामुळें आगस्ट महिन्यापर्यंत त्याला तेथें जातां आलें नाहीं. १८३३ च्या जुलईच्या १० व्या तारखेला त्यानें मिस किडलला जें पत्र लिहिलें त्यामध्यें तो लिहितो "माझ्या देशबांधवांविषयीं माझें जें कर्तव्य तें करण्यामध्यें मी येथें इतका गढून गेलों आहें, कीं, ब्रिस्टल्ला येण्याचा दिवस अजून मला ठरवितां येत नाहीं." इंडियन बिल पास होईपर्यंत राममोहन लंडनमध्यें होता.

राममोहन इंग्लंडांत आपला वेळ कसा घालवीत असे, हें मिसेस् इस्लिन इच्या पुढील उताऱ्यावरून कळून येतें:—

"राजा हिब्रु व ग्रीक भाषेमध्यें दररोज बायबल वाचीत असे. मिस हेअर देखील वारंवार त्याला तें वाचून दाखवीत असे. तें वाचल्याशिवाय बहुतेक कोणतीहि रात्र सुनी जात नसे. तो नेहमीं प्रार्थनेमध्यें मग्न असलेला दृष्टीला पडे. त्याची ती प्रार्थना चालू

असतां मिस हेअरच्या येण्यानें त्याच्या प्रार्थनेचा भंग होत नसे. तो तिला सांगे, कीं, 'जेव्हां जेव्हां माझ्या मनामध्यें दुर्विकार उत्पन्न होतो, तेव्हां तेव्हां मी प्रार्थना करतों.' त्यावर तिनें ह्मटलें, कीं, 'तुमच्या मनामध्यें कधीं वाईट विचार येत असेल असें मला तर वाटत नाहीं.' त्यावर त्यानें उत्तर केलें, कीं, 'आपणांपैकीं कोणीहि या गोष्टीला अपवादक असणें शक्य नाहीं !' "

लंडनमध्यें प्रथमप्रथम राममोहन एका हॉटेलांत रहात असे; परंतु नंतर त्याचा हिंदुस्तानांतील मित्र डेविड हेअर याच्या भावांच्या घरीं तो राहूं लागला. या घराण्यांतील सर्व लोकांची राममोहना-विषयीं फार पूज्यबुद्धि होती. कोणत्याहि प्रकारचें न्यून त्यांनीं त्याला पडूं दिलें नाहीं. राममोहन ब्रिस्टूल्ला गेला, तेव्हां देखील त्याची शुश्रूषा करण्याकरितां डेविड हेअरची मुलगी मिस हेअर त्याजबरोबर गेली.

राममोहन लंडन येथें असतांना त्यानें आपला मानलेला मुलगा राजा रामराय यास रे. डी. डेव्हिडसन, एम्. ए. या गृहस्थाच्या घरीं शिकण्याकरितां ठेविलें होतें. त्याला भेटण्याला राममोहन वारंवार तेथें जात असे. राममोहनावर त्या घराण्याचा इतका लोभ जडला, कीं, त्यांनीं आपल्या नूतन जन्मलेल्या मुलाचें नांव 'राममोहन' असें ठेविलें. या मुलाचा राममोहनाला फार ळळा असे, व लंडनमध्यें असतांना तो नेहमीं त्याला बाळंतपणाच्या खोलींतच भेटावयाला जाई.

## प्रकरण दुसरें.

# अंतकाळ.

१८३३ च्या सपटेंबर महिन्याच्या ७ व्या तारखेला मिस हेअर इच्यासह राममोहन ब्रिस्ट्ल्जवळील स्टेपल ग्रोव्ह येथें आला. डॉ. कार्पेंटर याच्या पालकत्वाखालीं असलेली मिस कॅसल इच्या घरीं तो राहूं लागला. लंडनमध्यें असतांना डॉ. कार्पेंटर यांनीं मिस कॅसल व मिस किडल या दोघी बायांची राममोहनाशीं ओळख करून दिली होती. मिस किडल ही मिस कॅसलची मामी होती. मिस कॅसलचा बाप मिचल कॅसल हा एक संभावित व्यापारी होता. तो डॉ. कार्पेंटरचा एक धर्ममतानुयायी होता. तो व त्याची बायको वारल्यानंतर त्यांची मुलगी डॉ. कार्पेंटर साहेबांच्या पालकत्वाखालीं तिच्या आईबापांच्याच इच्छेनुसार राहूं लागली. कार्पेंटर साहेबांच्या मागें अनेक व्यवसाय असल्यामुळें त्यांनीं राममोहनाची व्यवस्था स्टेपल ग्रोव्ह येथें केली होती.

लंडनमध्यें अतिशय दगदगीमुळें राममोहनाला जो शीण आला होता तो घालविण्यास ही निवांत जागा उत्तम होय, असें वाटून त्याला आनंद झाला. या ठिकाणीं तो कोणत्याहि मोठ्या सभांना जात नसे. परंतु तेथल्या निरनिराळ्या देवळांमध्यें जाऊन उपासनेला हजर रहात असे, व शेजारपाजारच्या गृहस्थांबरोबर आल्हादकारक अशा विषयांवर संभाषण करीत असे. बहुतकरून प्रत्येक दिवशीं त्याची व डॉ. कार्पेंटरची भेट होत असे. राममोहनाशीं बोलण्याचे प्रसंग कार्पेंटरसाहेबांना जसजसे अधिक येत गेले, तसतशी त्याच्याविषयीं त्यांची पूज्यबुद्धि व प्रेम जास्तच वाढत गेलें.

## अंतकाळ.

डॉ. कार्पेंटरचा सहाध्यायी रे. ऑर. बी. ॲस्पंड यांनीं एके रविवारीं ब्रिस्टल् येथें उपासना चालविली, व मँचेस्टर न्यू कॉलेज-करितां मदत मागितली. त्या उपासनेला राममोहन हजर होता. त्यानें त्या कॉलेजाला मदत करण्याचें कबूल केलें; पण ती मदत मिळण्यापूर्वींच त्याचें देहावसान झालें.

ब्रिस्टल् येथें असतांना बरेच विद्वान् गृहस्थ राममोहनास भेटा-वयाला आले. प्रसिद्ध निबंधकार रे. जॉन फॉस्टर हा मिस कॅसल-च्याच घरामध्यें रहात असे. एके प्रसंगीं रे. जॉन फॉस्टर यांच्या व इतरांच्या प्रश्नांचीं उत्तरें देण्याकरितां राममोहन सारखा तीन तास उभा होता. 'त्या वेळीं त्यानें हिंदुस्तानच्या नैतिक व राजकीय स्थितीचें वर्णन केलें, त्यामुळें त्या लोकांनां या थोर पुरुषाची योग्यता कळून आली,' अशा प्रकारचा उल्लेख खुद्द कार्पेंटरसाहेबांनीं केलेला आहे. ही गोष्ट सपटेंबरच्या ११ व्या तारखेला ह्मणजे त्याच्या सन्मानार्थ एक सभा ब्रिस्टल् येथें झाली त्या दिवशीं घडली. नंतर ८ दिवसांनीं ह्मणजे ता. १९ रोजीं त्याला ताप आला. त्याच्या आजाराची हकी-गत इस्लिनसाहेबानें आपल्या डायरींत लिहून ठेवली आहे. ती अशीः-

**मंगळवार ता. १७.**—माझी आई संध्याकाळीं राममोहनाला भेटण्याकरितां एकदोन दिवसांसाठीं स्टेपलटन ग्रोव्ह येथें गेली.

**गुरुवार ता. १९.**—माझ्या आईला पहाण्यास मी स्टेपलटन ग्रोव्ह येथें आलों. राममोहनाला ताप आला आहे असें मला आढ-ळून आलें. मोठ्या आनंदानें त्यानें माझी भेट घेतली. मीं त्याला औषध लिहून दिलें. सायंकाळीं आठ वाजतां पुनः आलों, तेव्हां त्याची प्रकृति थोडी बरी दिसली; पण ताप होताच. जॉन हेअर व मिस् हेअर त्याच्याजवळ बसून होतीं.

**शुक्रवार ता. २०.**—राजाची प्रकृति बरी नाहीं. डोकें दुखूं लागलें, पण औषधोपचार केल्यावर कमी झालें. सायंकाळीं त्याला झोंप लागली, पण त्याचे डोळे बरेच उघडे होते. रात्रीं अकरा वाजतां जागा झाल्यावर त्याचे हातपाय थंड पडलेले आढळले, व नाडी फार अशक्त असून तिचे ठोके १३० पडत होते. थोडीशी दारू चोळल्यावर त्याच्या अंगांत ऊब आली, व थोडें बरें वाटलें; पण त्याची तळमळ सारखी चालू होती. मिस हेअरला नेहमीं शुश्रूषा करूं दे ह्मणून मीं त्याची विनंति केली; पण 'तसें करणें फार अयोग्य आहे' असें तो ह्मणाला. त्यावर मीं ह्मटलें ' आमच्या रीतीरिवाजाप्रमाणें तें योग्य आहे.' तेव्हांपासून मिस हेअर एकसारखी त्याच्या तैनातींत असते. माझी सल्लामसलत त्याला फार आवडली असें दिसलें, व मी येथेंच निजणार हें समजल्यावर त्याला आनंद झाला. मध्यरात्रीं मला त्याविषयीं फार काळजी वाटूं लागली, व दुसऱ्या दिवशीं सकाळीं त्याला बरें वाटलें नाहीं तर डॉ. प्रिचर्डला आणावयाचें, असें मीं माझ्या आईला सांगितलें.

**शनिवार ता. २१**—मिस हेअरनें रात्रीची सर्व हकीगत मला कळविली. मी सकाळीं त्याची प्रकृति पाहिली. त्याची नाडी बरी चालत होती, परंतु जीभ बरी नव्हती. मिस किडलनें डॉ. प्रिचर्डला आणावयाला सुचविलें व मलाहि तें योग्य वाटलें. मी ब्रिस्ट्ल्ला गेलों. दोन वाजतां कांहीं रोग्यांनां औषध दिलें व पांच वाजतां डॉ. प्रिचर्डला घेऊन आलों. डॉ. प्रिचर्डला पाहून राजाला समाधान वाटलें, व त्याच्या चेहऱ्यावरून तो बुद्धिमान् असावा असें राजानें मला ह्मणून दाखविलें. मी अकरा वाजतां निजावयाला गेलों. मिस हेअर जागत बसली.

**रविवार ता. २२**—सकाळपर्यंत राजा तळमळत होता. पहांटेला थोडीशी झोंप लागली. साडेअकरा वाजतां डॉ. प्रिचर्ड पुनः

आले. मीहि त्याच्याबरोबर आलों, पण तीन वाजतां परत गेलों. मि. हेअरसुद्धां आला होता. सायंकाळीं राजाला बरें वाटलें, यामुळें मलाहि बरें वाटलें. डॉ. प्रिचर्ड, मि. हेअर व मी जवळ असतांना तो ह्मणाला 'मी जरी मेलों तरी मला एवढें समाधान वाटेल, कीं, माझ्या आजारामध्यें मला उत्तम औषधोपचार झाला!' मेरी, माझी आई व मी मिस कॅसलच्या गाडींतून एका सभेला जाऊन परत आलों. मिस हेअर सारखी बसून होती. तिच्या हातून राजा योग्य वेळीं औषध घेत असे. मजपेक्षां तिचें अधिक वजन राजावर पडत असे.

**सोमवार ता. २३**—पांचांपूर्वीं थोडा वेळ आधीं मी उठलों. राजाची रात्र फार कठिण गेली. मधुनमधून डोळे उघडे राहून थोडथोडी झोंप येत असे. आणखी दुसऱ्या डॉक्टराचा सल्ला घ्यावा, ह्मणून मिस हेअरनें सुचविलें, तेव्हां डॉ. कॅरिक याला सायंकाळीं डॉ. प्रिचर्डसह आणविलें. डोक्याला फार विकार झालेला दिसल्यामुळें जळवा लावल्या. रात्रीं राजाला थोडें बरें वाटलें. गरम पाण्याचें स्नान घातल्यामुळें रात्रीं त्याला बरें वाटलें.

**मंगळवार ता. २४**—मि. हेअर, मिस हेअर व राजाराम रात्रभर बसलीं. मी रात्रीं ११ वाजतां निजावयाला गेलों व पांच वाजतां परत आलों. रात्रीपेक्षां त्याची नाडी बरी लागली. प्रिचर्ड आणि कॅरिक बारा वाजतां आले.

**बुधवार ता. २५**—राजाला थोडी झोंप लागली व पूर्वीच्या रात्रींपेक्षां थोडी अस्वस्थता कमी झाली. नाडी १२० होती. मि. हेअर रात्रीं बसून होता. तीन आणि चारच्या दरम्यान नाडी अधिकाधिक अशक्त होत असलेली वाटून त्याला फार भीति वाटली. हातपाय थंड पडूं लागले, पण पांघरूण घातल्यावर ऊब येऊं लागली. तो थोडें बोलत होता, पण जागें केल्यावर शुद्धीवर असे.

**गुरुवार ता. २६**—डॉ. कॅरिक अकरा वाजतां आला व डॉ. प्रिचर्ड येण्यापूर्वीच मिस हेअरनें आह्मांला राजाच्या खोलीमध्यें बोलाविलें. तोंडाला आंचके बसून राजाला झटके येत असलेले आह्मांला आढळले. एकदोन तास ते पेटके चालू होते. आह्मी आलों तें त्याला समजलें नाहीं. आह्मीं त्याचे केंस कापले व त्याच्या डोक्याला थंड पाणी लावलें. आंचके थांबल्यानंतर तो झोंपीं गेल्यासारखें दिसलें. तथापि डोळे उघडेच होते. डाव्या हाताला व डाव्या पायाला अर्धांगवायु झाल्यासारखें दिसलें. संध्याकाळीं डॉ. बर्नाडला आणावयाचें ठरविलें. मी सर्व दिवसभर येथेंच होतों, व माझ्या मनांत जास्तजास्तच धास्ती वाटूं लागली. दोनप्रहरीं त्याच्या अंगांत थोडी ऊब आली, व नाडीमध्यें थोडा जोर आला. पण साडेसहा वाजतां पुनः झटके सुरू झाले. डॉ. बर्नाडला येतां आलें नाहीं. मरणोन्मुख स्थितींत डॉ. प्रिचर्ड व डॉ. कॅरिक निघून गेले. बारांपूर्वीं कोणीहि निजावयाला गेलें नाहीं. मिस किडल बहुतेक वेळ राजाजवळ होती. मिस कॅसर बारंवार येत असे. मिस हेअर, मि जॉन हेअर व राजाराम यांपैकीं कोणीहि खोलीच्या बाहेर क्वचितच गेलें असेल. मधुनमधून माझी आई खोलींत जात असे.

**शुक्रवार ता. २७**—प्रत्येक क्षणीं राममोहनाची स्थिति कठिणकठिण होत चालली. त्याचा श्वासोछ्वास अधिकाधिक गुदमरूं लागला. वारंवार त्याचा उजवा हात हालूं लागला, पण डावा हात मरणाच्या पूर्वीं थोडेच तास आधीं हालूं लागला. रात्रीं शुद्ध चांदणें पडलें होतें. मिस्टर हेअर, मिस किडल व मी असे खिडकींतून बाहेर डोकावून पहात असतां एके बाजूला त्या मध्यरात्रीच्या सुमाराला शांत असा देखावा दिसत होता, तर आमच्या दुसऱ्या बाजूला या अलौकिक पुरुषाच्या प्राणोत्क्रमणाचा समय अगदीं नजीक येऊन

ठेपलेला दिसत होता. मिस हेअरची आतां सर्व आशा नष्ट झाली. म्हणून त्याची शुश्रूषा करण्याचें बंद करून ती स्फुंदतस्फुंदत जवळील खुर्चीवर खालीं मान घालून बसून राहिली. मिस किडलला बरें वाटावें म्हणून मी दीडाच्या सुमाराला निजावयाला गेलों. अडीच वाजतां मि. हेअर माझ्या खोलींत आला व सर्व आटोपलें म्हणून त्यानें मला सांगितलें. राजाचें मरण २ वाजून २५ मिनिटांनीं झालें * रामरतन गुडघे टेंकून राजाच्या हनुवटीला धरून बसला होता. मिस हेअर, राजाराम, मिस किडल, मि. हेअर, माझी आई, मिस कॅसल, रामहरि व दुसरे एकदोन चाकर तेथेंच होते. प्राणोत्क्रमणाच्या वेळीं हिंदुधर्मालाअनुसरून कांहीं विधि करावयाचा असल्यास कर,असें मि. हेअर यांनीं रामरतन याला सुचावल्यावरून त्यानें हिंदुस्तानीमध्यें प्रार्थना केली.स्त्रिया तेथून गेल्यावर आम्हीं चटईवर तें प्रेत सरळ ठेविलें, व त्या हिंदु नोकराशीं बोलूं लागलों. सुमारें साडेतीन किंवा चारांच्या सुमाराला आम्ही सर्वजण खोलींतून बाहेर आलों. मी बिछान्यावर पडलों, पण झोंप म्हणून आली नाहीं. राजाच्या मृत्यूनें मला सारखी तळमळ लागून राहिली. नास्त्याच्या वेळीं सर्व मंडळी दुःखांत होती. मिस हेअर अंथरुणांतच निजून होती. प्यू नांवाचा एक संगमरवरी दगडावर काम करणारा शिल्पकार एका इतालिअन मनुष्याला घेऊन आला व त्यांनीं राजाच्या डोक्याचा व चेहऱ्याचा ठसा ( cast ) घेतला. मि.हेअर व मी ब्रिस्टल्ला गेलों, व प्रेताची तपासणी दुसऱ्या दिवशीं करण्याची तजवीज करून आलों. त्याच्या प्रेताची तपासणी झाली, तेव्हां त्याच्या मेंदूला विकार झालेला आहे असें आढळून

* डेविड हेअर याची पुतणी मिस हेअर रात्रंदिवस राममोहनाच्या तैनातीस असे. ती म्हणते कीं ॐ हा शेवटचा शब्द राममोहनाच्या तोंडून निघाल्यावर त्याचें प्राणोत्क्रमण झालें.

आलें. डॉ. कार्पेंटर सकाळीं तेथें आले. बहुतेक सर्व दिवस आह्मी सर्वजण प्रेताच्या खोलींत होतों. तें प्रेत अझूनहि सुंदर व तेजस्वी दिसत होतें. सर्वांच्या अंगावर शहारे उत्पन्न करणारा असा तो त्या वेळचा देखावा होता.

आजारी असतांना जवळची मंडळी त्याजवर जें प्रेम करीत, तें प्रेम त्यानें अनेक वेळां व्यक्त करून दाखविलें, व मला ज्यांचा औषधोपचार चालू आहे त्यांवर माझा पूर्ण विश्वास आहे हें त्यानें बोलून दाखविलें. तेथील मंडळीला त्याच्या मरणामुळें जरी अतोनात दुःख झालें, तथापि त्याला आराम पडावा ह्मणून प्रत्येक बाबतींत त्याची योग्य बडदास्त ठेवण्यांत आली हें पाहून त्यांतल्या त्यांत थोडें समाधान वाटलें. आजारी असतां तो फारच थोडें बोले, पण वारंवार प्रार्थनेमध्यें निमग्न असलेला दृष्टीला पडे. त्यानें आपल्या मुलाला व इतरांनां सांगून ठेविलें होतें, कीं, मी या आजारांतून निभावत नाहीं.

आजारामध्यें राममोहनानें जवळच्या मंडळीला असें सांगून ठेविलें होतें, कीं, मी मेलों तर माझा प्रेतविधि ख्रिस्तीधर्माप्रमाणें न करितां एक स्वतंत्र जागा घेऊन तेथें माझा अंत्यविधि करावा. त्या जागेची व्यवस्था पहाण्याकरितां कोणातरी गरीब पण सात्त्विक गृहस्थाला तेथें फुकट राहूं द्यावें. मिस कॅसलनें आपल्या मालकीच्या जागेमध्यें एक सुंदरशी जागा त्या कामाकरितां दिल्यामुळें राममोहनाची ही शेवटची इच्छा पूर्ण झाली. या ठिकाणीं त्याचा अंतविधि ता. १८ आक्टोबर रोजीं दोनप्रहरीं दोन वाजतां करण्यांत आला. मनुष्याच्या खांद्यावर त्याचें प्रेत नेण्यांत आलें, त्या वेळीं क्रॉस वगैरे धरण्यांत आला नाही. त्याच्या प्रेतयात्रेबरोबर मिस हेअर, मिस किडल, जोसेफ हेअर, जॉन हेअर, मिस कार्पेंटर, मिस कॅसल, डॉ. कार्पेंटर, मिसेस् इस्लिन, मिस्टर इस्लन, हिंटन, कॅसल, मिसेस

बी स्मिथ, मेरी, मिस ईडासन, मिस फॉस्टर, डॉ. जेराई, मिस्टर हॅरीस, मिस्टर फॉस्टर, मि किडल, जी. सँडर्स, रामरतन व रामहरि या क्रमानें हे लोक गेले. तें प्रेत विटांनीं बांधलेल्या एका थडग्यामध्यें ठेवलें व थडग्याचें तोंड बंद करण्यांत आलें. त्या प्रसंगाला उचित अशा तयार केलेल्या कविता डॉ. कार्पेंटरसाहेबांनीं वाचल्या. पुढें आक्टोबरच्या २९ व्या तारखेला रामरतन व रामहरि हे हिंदुस्तानाला यावयाला निघाले.

प्रकरण तिसरें.

# मृत्युलेख.

राममोहनाच्या मरणामुळें यूरोपमध्यें व अमेरिकेमध्यें हाहाःकार उडाला. इंग्लंडमध्यें तर लोकांनां अतिशय दुःख होऊन अलौकिक पुरुषाच्या स्मरणार्थ निरनिराळया देवळांतून प्रार्थना करण्यांत आल्या.

ता. ६ आक्टोबर १८३३ रोजीं डॉ. कार्पेंटर यांनीं ब्रिस्टल् येथील आपल्या 'लेविन मीड चॅपल'मध्यें प्रार्थना केली. त्याच रविवारीं रे. राबर्ट ॲस्लांड यांनीं न्यूप्रेव्हल पिट मीटिंग हॅक्ने येथें प्रार्थना केली. १८३३ च्या आक्टोबरच्या २७ व्या तारखेला रे. वुइलियम हॅमिलटन ड्रॅमंड, डी. डी., यांनीं डब्लीन येथील प्रेसबिटेरिअन चर्च ऑफ स्ट्रॅंडस्ट्रीट येथें उपासना चालविली. १८३३ च्या नोव्हेंबरच्या १० व्या तारखेला रे. जे. स्कॉट पोर्टर यांनीं बेलफास्ट येथील देवळांत प्रार्थना केली. १८३३ च्या आक्टोबरच्या १४ व्या तारखेला रे. डब्ल्यू. डे फॉक्स यांनीं प्रिन्सबरी चॅपल, साउथ प्लेस येथें प्रार्थना केली. या प्रत्येकानें राममोहनाच्या गुणांचें वर्णन करून त्या समयाला अनुरूप असे उपदेश केले आहेत, व ते सर्व छापून प्रसिद्ध झाले होते. या पांचहि उपदेशांचा उल्लेख मेरी कार्पेंटर बाईनें आपल्या पुस्तकांतील शेवटच्या प्रकरणांत केलेला आहे. राजाच्या स्मरणार्थ बायकांनीं अनेक गाणीं रचून तीं म्हटलीं, वर्तमानपत्रकारांनीं राममोहनासंबंधीं दुःखप्रदर्शक लेख प्रसिद्ध केले, व त्याच्या मृत्यूमुळें केवळ हिंदुस्तानचाच नव्हे—

इंग्लंडचाहि नव्हे, तर अखिल जगाचा फारच मोठा तोटा झाल्याबद्दल कळकळीचे उद्गार काढले.

जो मनुष्य बोलल्याप्रमाणें वागतो, त्या मनुष्याचीं मतें कशींहि असोत, तो सर्व धर्मांच्या व सर्व देशांच्या लोकांनां आदरणीय होतो. अशा मनुष्याच्या योग्यतेची खरी किंमत त्याच्या शत्रूंनांहि कबूल करावी लागते. याच न्यायानें राममोहनाचा मृत्यु झाल्यानंतर पाश्चात्य लोकांनीं त्याजविषयींची आपली आदरबुद्धि व्यक्त करण्यामध्यें जणूं काय एकमेकांवर चढाओढ चालविली. पुढें जे उतारे दिले आहेत, त्यांवरून तिकडील स्त्रीपुरुषांच्या ठिकाणीं त्याजविषयीं किती आदरबुद्धि वसत होती, हें उघड होतें. मिस एकिन ही डॉक्टर चॅनिंग यांनां लिहिलेल्या आपल्या पत्रांत ह्मणतेः—

"राजाच्या ठिकाणीं वाखाणण्याजोगे पुष्कळ गुण होते. त्याच्या सहवासांत राहण्यामध्यें मोठा फायदा असे. त्याच्या ठिकाणीं अगाध ज्ञान वसत होतें. त्याची बुद्धि विशाल होती. जगावर त्यानें अतोनात उपकार केले आहेत. त्याच्या स्वभावामध्यें फार माधुर्य होतें, व त्याच्या बोलण्याचालण्यामध्यें नम्रपणा व सभ्यपणा होता. उच्च कुळांत जन्म झाला असतांहि, व विद्येनें त्याच्या गळयांत माळ घातली असतांहि, त्याच्या ठिकाणीं नम्र वृत्ति होती. स्त्रियांचे हक्क व हितसंबंध यांचें रक्षण करण्याकरितां त्यानें अविश्रांत श्रम केले. त्याच्या ठिकाणीं नीतिधैर्य होतें. या सर्व गोष्टींचें वर्णन कोणाला करितां येईल ?"

लंडनमधील प्रसिद्ध अमेरिकन डॉ. टी बूट, इस्लिनसाहेबाला पाठविलेल्या आपल्या पत्रांत ह्मणतातः—

"ज्ञानानें, सौंदर्यानें व भूतदयेनें मंडित असा राजासारखा कोणताहि मनुष्य भूतकालीं किंवा वर्तमानकालीं झालेला माझ्या ऐकण्यांत

नाहीं. तो भूतदयेचा मूर्तिमंत पुतळाच होता. त्याचीं मतें अतिशय उदार, स्वभाव अतिशय सौम्य व तो मनाचा मोकळा होता. त्याच्या औदार्याला तर सीमाच नव्हती. त्याची सभ्यता ही तर एक ईश्वरदत्त देणगीच होय ! आपल्या अतिशय परिचयांतील मित्रांशीं व अनुयायांशीं देखील त्याचें वर्तन अदबीचें असे. त्याच्या मृत्यूमुळें त्यानें लिहिलेल्या पुस्तकांविषयींचा माझा आदर दशगुणित झाला आहे, व तेव्हांपासून मी त्यांचें अध्ययन अधिक आस्थेनें करीत आहें, आणि त्यायोगें माझी अशी प्रामाणिकपणाची समजूत झाली आहे, कीं, त्याच्यासारखा अद्वितीय पुरुष मागें कधीं झाला नाहीं, आणि आतांसुद्धां माझ्या अवलोकनांत नाहीं ! त्याच्या पवित्र आत्म्याला शांति मिळो !"

त्याच्या मृत्यूनंतर जीं पांच व्याख्यानें झालीं ह्मणून वर सांगण्यांत आलें, त्यांपैकीं रे. डब्ल्यू जे. फॉक्स यांनीं दिलेल्या व्याख्यानांत ते ह्मणतातः–

" आतां आपणांला त्याचें तोंड पहावयाला मिळणार नाहीं. कवीनें कल्पिलेली मूर्ति नाहींशी होते, त्याप्रमाणें राजाचें अस्तित्व नाहींसें झालें आहे; परंतु त्याच्या गुणांचें जें तेज या देशामध्यें व दूरदूरच्या देशांमध्येंहि पसरलें आहे, त्याची विस्मृति आपणांला होणें शक्य नाहीं. तो जरी आतां आपल्यासमोर नाहीं, तरी त्यानें जी कामगिरी केली आहे, तिची आठवण हिंदुस्तानालाच नव्हे, तर यूरोप व अमेरिका या देशांनांहि चिरकाल राहील यांत संशय नाहीं."

मिस मेरी कार्पेंटर ' राजा राममोहन राय याचे इंग्लंडमधील शेवटचे दिवस ( The last days in England of the Raja Rammohan Roy. ) ' या पुस्तकामध्यें ह्मणतेः—" तो प्रसंग खरोखरच अंगावर शहारे आणणारा होता.

त्यायोगें सर्वांनां अतिशय दुःख झालें, व एकदम हिंदुस्तानांतील एका थोर रत्नाचा असा आकस्मिक रीतीनें अंत झालेला पाहून त्याच्या मित्रांनां फार हळहळ वाटली. या शतकामध्यें जीं प्रतिभासंपन्न माणसें होऊन गेलीं, त्यांमध्यें बरेंच वरच्या दर्जाचें स्थान राजाला मिळेल. तो दूर असतांनाच त्याच्याविषयीं आमच्या मनामध्यें आदरबुद्धि उत्पन्न झाली, व तो आमच्या देशांत आल्यावर आह्मी त्याला आमच्या घरामध्यें, आमच्या सहवासांत ठेवून घेतलें, हें आह्मांला मोठें भूषण वाटतें. आमच्या शहरामध्यें असतांना त्याचा सर्वत्र जयजयकार होत असतांहि त्याला भुलून न जातां देशसेवा करावयाची हें जें त्याचें ध्येय त्यापासून तो कधींहि ढळला नाहीं! त्याच्या ठिकाणीं जे सद्गुण होते, व त्याचा जो प्रेमळ स्वभाव होता त्याची आठवण अझूनहि आह्मांला ताजी वाटते."

एवढेंच नाहीं, तर प्रॉटेस्टंट मिशनऱ्यांनीं देखील राममोहनाच्या स्मरणार्थ व्याख्यानें दिलीं आहेत. रे. मि. के. एस् मॅकडोनाल्ड स्कॉटलंडच्या फ्री–चर्चचे पाद्री यांनीं सन १८७९ सालीं दार्जिलिंग येथें भाषण करितांना राममोहनानें लिहिलेल्या 'येशूच्या आज्ञा (The Precepts of Jesus)' या पुस्तकाचा उल्लेख करून ह्मटलें, कीं, "राजाच्या या पुस्तकाला चोहोंकडून विरोध झाला, व विशेषतः ज्या लोकांकडून याविषयीं सहानुभूति मिळावयाला पाहिजे त्याच लोकांकडून या पुस्तकाला विरोध उत्पन्न व्हावा, ही गोष्ट शोचनीय आहे. एकंदरींत राजा हा एक महान् धर्मसुधारक होऊन गेला, यांत मुळींच संशय नाहीं. तो ज्या काळामध्यें होऊन गेला, त्या मानानें त्याचीं उदार मतें फारच पुढें गेलेलीं होतीं. त्याच्या देशबांधवांनां व हिंदुस्तानच्या सामाजिक व धार्मिक कल्याणाविषयीं सहानुभूति बाळगणारांनां त्याची मोठ्या प्रेमानें आठवण व्हावी, हें अगदीं उचित होय."

## राजा राममोहन राय.

पाश्चात्य लोकांनां या प्रकारें राममोहनाविषयीं हळहळ वाटत असतांना, आपला किती तोटा झालेला आहे याचा गंधहि हिंदुस्तानांतील पुष्कळांनां नव्हता! हिंदुस्तानांतील लोक मूर्तींची पूजा करण्यामध्यें व ती सजविण्यामध्येंच मग्न होऊन जाऊन एका शाश्वत सनातन परमेश्वराची जी उपासना तीच खरी उपासना होय हें त्यांच्या ध्यानींमनींहि आलें नाहीं. यामुळें ज्या या महात्म्यानें अज्ञानपटल दूर करून एक सनातन सत्य प्रकाशामध्यें आणण्याचा प्रयत्न केला, त्या सत्पुरुषाची त्यांनां आठवणहि झाली नाहीं, तर त्यांत नवल तें कसलें!

प्रकरण चवथें.

# स्मारकें.

रामोहनाविषयींचा आपला आदरभाव मिस कॅसल इनें अधिक स्पष्टतेनें दाखविला. आर. ए. ब्रिग्स् यानें राजाची काढलेली तसबीर तिनें विकत घेतली, व ती ब्रिस्टल् फिलॉसॉफिकल इन्स्टिट्यूशन या संस्थेला नजर केली. असें ह्मणतात, कीं, या चित्रामध्यें राममोहनाचा चेहरा व इतर अवयव हुबेहूब जसेच्या तसेच वठले आहेत. एशियाटिक जर्नल या पत्रामध्यें त्या चित्राचें वर्णन आलेलें आहे व त्याचाच उल्लेख डॉ. कार्पेंटरसाहेबांनीं आपल्या व्याख्यानामध्यें पुढीलप्रमाणें केला आहे.

"राजाची आंगकाठी फार सुंदर होती. तो सुमारें सहा फूट उंच होता. त्याचे सर्व अवयव मजबूत असून योग्य प्रमाणामध्यें होते. पुढेंपुढें वयाच्या मानानें किंवा मेदवृद्धीमुळें त्याचे अवयव कांहींसे बेढब दिसत होते, व पूर्वींची तरतरी थोडीशी कमी झालेली दिसत होती. त्याचें तोंड रमणीय दिसत होतें; चेहरा भव्य व वीराच्या चेहऱ्याप्रमाणें दिसत असे. कपाळ उंच व विशाल होतें, डोळे काळे व तेजस्वी होते, नाक चांगलें बांकदार असून जेथल्या तेथें रेखाटलेलें, ओंठाची पूर्णपणें वाढ झालेली होती. एकंदरींत राजाला पाहिल्यानें असा ग्रह होत असे, की, तो मोठा बुद्धिमान् व उपकारशील पुरुष असावा. ब्रिग्सूनें काढलेली त्याची तसबीर सगळ्यांत चांगली असून वाखाणण्याजोगी आहे. ती सध्यां ब्रिस्टल येथील प्रदर्शनांत मांडलेली आहे."

राजा राममोहन राय.

राममोहनाची मृत्युवार्ता ऐकून हिंदुस्तानांतील त्यांचे मित्र व अनुयायी हे त्याचे उपकार स्मरून मोठ्या कृतज्ञबुद्धीनें त्याची आठवण करूं लागले. बाबू द्वारकानाथ ठाकुर हे इ. स. १८४३ त जेव्हां इंग्लंडमध्यें गेले, तेव्हां त्यांनीं राजाच्या प्रेताची पेटी स्टेपलटन ग्रोव्ह येथून काढून आर्नोज व्हेल येथें नेऊन त्या थडग्यावर एक सुंदर स्मारक उभारिलें, व त्यावर खालील मजकूर खोदविला–

" जो फार श्रद्धाळू असून ज्याचा विश्वास आमरण एका ईश्वरावर होता, ज्यानें एकाच सनातन परमेश्वराची एकनिष्ठपणें शेवटपर्यंत सेवा केली असा जो राजा राममोहन राय, त्याच्या अस्थि या थडग्याखालीं आहेत. त्याची बुद्धि मोठी विशाल असून त्याला पुष्कळ भाषा पूर्णपणें अवगत होत्या. त्या वेळचे जे मोठमोठे विद्वान् होऊन गेले, त्यांमध्यें त्याची गणना होत होती. त्यानें हिंदुस्तानांतील लोकांची सामाजिक, नैतिक व शारीरिक स्थिति सुधारण्याकरितां जे अविश्रांत परिश्रम केले, मूर्तिपूजेचा निषेध करण्याकरितां आस्थेनें जे प्रयत्न केले, सतीची चाल बंद करण्याकरितां जे आटोकाट श्रम घेतले, ईश्वराचा महिमा वाढविण्याविषयीं व मनुष्यजातीचें कल्याण करण्याविषयीं जी तळमळ व आस्था सतत दाखविली, त्यायोगें तो आपल्या देशबांधवांनां चिरस्मरणीय होऊन राहिला आहे. त्याचे अनुयायांनां त्याच्या मरणानें दुःख झालें आहे, व अशा पुढाऱ्याबद्दल त्यांनां अभिमान वाटत आहे. त्याचा जन्म बंगालमध्यें राधानगर शहरीं

१७७२ त झाला व त्याचा अंत ब्रिस्टल् शहरीं ता. २७ सप्टेंबर १८३३ सालीं झाला."

वरील गोष्ट घडून आल्यानंतर कित्येक वर्षेंपर्यंत राममोहनाची आठवण ताजी राहण्यासारखें त्याचें दुसरें कांहींहि स्मारक झालें नाहीं. हिंदुस्तानांत येण्यापूर्वी इ. स. १८६६ मध्यें मिस मेरी कार्पेंटर इनें 'इंग्लंडमधील राजाचे शेवटचे दिवस' या नांवाचें एक पुस्तक प्रसिद्ध करण्यामध्यें तिचा हेतु हा होता, कीं, त्याचे सर्व लेख एकत्र करून ते छापून कोणीं तरी प्रसिद्ध करावे, व त्याचें एक विश्वसनीय चरित्रहि कोणीं तरी लिहावें. इ. स. १८७५ त या परोपकारी बाईनें आपल्या पुस्तकाची दुसरी आवृत्ति काढली, व त्याच्या प्रस्तावनेंत म्हटलें, कीं, 'राजाच्या लेखांची किंमत अजूनहि त्याच्या देशबांधवांना कळून येत नाहीं, याबद्दल मला फार वाईट वाटतें, व कोणीहि हें काम अजून हातीं घेत नाहीं, म्हणून माझी निराशा झाली आहे.'

पुढें आदि ब्राह्मसमाजाच्या दोघां जुन्या सभासदांनीं राममोहनाचे सर्व ग्रंथ एकत्र छापण्याचें योजिलें व त्याप्रमाणें त्याचे संस्कृत व बंगाली लेख १८८० सालीं छापून प्रसिद्ध केले. १८८१ च्या जानेवारींत बाबू नरेंद्रनाथ चतर्जी यांनीं राममोहनाचें चरित्र बंगालीमध्यें छापून प्रसिद्ध केलें.* त्याच्या पुण्यतिथीनिमित्त दरवर्षी कलकत्त्यास व इतर ठिकाणीं सभा होतात, व त्याच्या चरित्रासंबंधीं उपदेश होत असतो. बंगाली भाषेमधील कसलेला लेखक बाबू

---

* हें चरित्र बंगाली लोकांत अतिशय प्रिय असून त्याच्या सात आवृत्ति निघाल्या आहेत, ही एकच गोष्ट त्याच्या लोकप्रियतेची साक्ष पटवावयास पुरेशी आहे. शेवटल्या आवृत्तींतील कांहीं भाग प्रिन्सिपाल व्रजेंद्रनाथ यांनीं लिहून या बहुमोल ग्रंथांत भर घातली आहे. चरित्रलेखक १९१३ सालीं निवर्तला.

अक्षय कुमार दत्त यानें आपल्या 'हिंदुस्तानचे निरनिराळें धर्मपंथ (Religious sects of Hindustan)' या पुस्तकामध्यें असें सुचविलें आहे, कीं, सर वुइलियम बेंटिंक यांच्या कलकत्त्यामधील पुतळयाच्या उजव्या बाजूस राममोहनाचा पुतळा उभा करावा. ही गोष्ट कोणी धनिक मनांत आणील तेव्हां खरें!

ब्राह्मसमाजाचे एक आचार्य बाबू प्रतापचंद्र मुझुमदार इंग्लंडमध्यें असतां ब्रिस्टल्मधील राजाची समाधि पहावयाला गेले होते. जो जो कोणी हिंदी मनुष्य विलायतेला जाईल, त्यानें त्यानें राजाच्या समाधीचें दर्शन घेणें हें आपलें कर्तव्य समजलें पाहिजे. कारण, राजा हा धार्मिक सुधारकच नसून त्यानें आपलें सर्व जीवित देशाची सामाजिक, बौद्धिक, नैतिक व राजकीय स्थिति उन्नत करण्यामध्यें खर्च केलें. उदार पाश्चात्यांनां राजाची मरणभूमि पवित्र वाटूं लागली आहे. त्या ठिकाणीं १८८३ च्या सप्टेंबरच्या २७ व्या तारखेला त्याची ५० वी पुण्यतिथि साजरी करण्यांत आली, व त्या प्रसंगीं हिंदुस्तानचे एक हितचिंतक प्रो॰ मॅक्स मुल्लर यांनीं राममोहनाचें चरित्र सांगतांना व त्याच्या ग्रंथांची माहिती करून देतांना ह्मटलें 'हिंदुस्तानामध्यें त्याचें नांव धर्मस्थापकांच्या ग्रंथामध्यें दाखल होऊन राहिलें आहे.—In India his name has been enrolled in the books of prophets.' पुढें प्रोफेसर साहेब ह्मणतात–' मी राजाला थोर पुरुषांच्या पंक्तीला बसवितों, याचें कारण हें, कीं, राजा हा निःस्वार्थी, प्रामाणिक आणि छातीचा मनुष्य होऊन गेला. त्याचे हे गुण त्याच्या लहानपणीं देखील दिसून आले. सोळा वर्षांचा असतांनाच आपले आईबाप ज्या रीतीनें देवाची पूजा करीत असत, तसें करण्याचें त्यानें नाकारिलें.'

## स्मारकें.

आपल्यां मताप्रमाणें वागण्याकरितां राजाला कसकसा त्रास भोगावा लागला हें सांगितल्यानंतर प्रोफेसरसाहेब पुढें ह्मणाले 'एकाद्या थोर पुरुषाचें नांव अमर कसें होतें, हें तुह्मांला पहावयाचें असल्यास एकाद्या मोठ्या लायब्ररीमध्यें जा, किंवा एकाद्या समाधीची किंमत समजण्याची तुमची इच्छा असेल तर वेस्ट मिन्स्टर ॲबेमध्यें जा. एकाद्या मनुष्यानें केलेलें कृत्य किंवा लिहिलेलें पुस्तक अमर राहिलें, कीं, त्याचें नांव अमर झालेंच समजावें! त्याची आठवण बुजणें कधींहि शक्य नाहीं.'

याप्रमाणें पाश्चात्य लोकांनां जर त्याची मरणभूमि इतकी पवित्र वाटते, तर आपण जे त्याचे देशबंधु त्यांनीं त्याची जन्मभूमि जें राधानगर त्याच्या ठिकाणीं त्याचें योग्य स्मारक करून त्याच्या जन्मदिवशीं वर्षांतून एक दिवस जमून तो दिवस आनंदांत घालवून त्याजविषयीं आपली कृतज्ञता व आदरबुद्धि व्यक्त करणें आपलें कर्तव्य नाहीं काय? राममोहनाच्या तेथील घराच्या पडक्या भिंती अजूनहि दिसत आहेत, व जर कोणी तेथें त्याचें योग्य स्मारक करावयास तयार असेल तर त्या जागेचा सध्यांचा मालक ती जागा आदिब्राह्मसमाजाच्या ताब्यांत देण्यास तयार आहे, असें ह्मणतात.

मुंबई शहरांत दरवर्षी प्रार्थना समाजाचा जो वार्षिक उत्सव होतो, त्याचा कार्यक्रम राममोहनाच्या स्मरणार्थ अशा रीतीनें योजिला जातो, कीं, त्या नऊ दिवसांमध्यें सप्टेंबरची २७ वी तारीख ह्मणजे राजाची मृत्यूची तारीख यावी. त्या दिवशीं त्याची पुण्यतिथि पाळण्यांत येते, व कोणी तरी अधिकारी गृहस्थ त्याच्या चरित्राच्या अनुरोधानें उपदेश करीत असतात. या वर्षापासून मात्र उत्सव मार्च महिन्यामध्यें करण्याचें ठरलें आहे.

# राजा राममोहन राय.

१८९६ मध्यें या महात्म्याच्या ६३ व्या सांवत्सरिक तिथीनिमित्त प. वा. न्यायमूर्ति रानडे यांनीं जें व्याख्यान दिलें त्यामध्यें ह्मटलें आहे, कीं " देवांच्या संबंधानें जे सांवत्सरिक उत्सव करण्यांत येत असतात ते देवांच्या संबंधानें जन्मदिवसानिमित्त असतात; परंतु थोर पुरुषांसंबंधीं पाहतां त्यांच्या जन्मदिवसांचा विसर पडलेला असतो, त्यांचा मागमूसहि रहात नाहीं. परंतु पुण्यतिथि मात्र सर्व जगभर मोठ्या सन्मानानें पाळण्यांत येत असतात. ख्रिस्ती, मुसलमान, पार्शी, बौद्ध आणि हिंदु या सर्वांमध्यें याच चालीचा सार्वत्रिक प्रघात आहे. हें सारें आकस्मिकपणानें घडत असेल असें नाहीं. देवांच्या व अवतारी पुरुषांच्या जयंत्या त्यांच्या जन्मदिवशीं करण्यांत याव्या, व थोर पुरुष इहलोक सोडून जातात तोच दिवस स्मरणीय मानण्यांत यावा, हा जो भेद आहे त्याला एक चांगलें समर्पक कारण आहे, व तें हें, कीं, या जन्मांत मोहाचे व पापाचे प्रसंग अनेक असतात व त्यांपासून मृत्यु सोडवणूक करीपर्यंत कोणाहि मनुष्याला असें ह्मणतां यावयाचें नाहीं, कीं, या जन्माची सार्थकता झाली, जीविताचा हेतु सफल झाला. इहलोकीं आपण जो आयुष्यपंथ क्रमीत असतों, त्याचा हेतु फार गंभीर असतो.

" आपलें नियमन करून जीवनक्रमाला योग्य दिशा लावावयाची असते, व नियमन करणें किती कठिण असतें, याचा अनुभव आपणां सर्वांनां आहेच. संसारयात्रेला निघालेल्या लक्षावधि लोकांत उद्दिष्ट स्थळीं जाऊन पोहोंचणारांची संख्या किती अल्प असते ? मार्गांत मोहाचे प्रसंग अनेक व ज्या कांहीं अडचणी अनुभवाव्या लागतात त्यांनींच पुष्कळांची गाळण होते. राममोहनामध्यें आस्था, सत्यशीलता, दिव्यदृष्टि, तीव्र कल्पना व आकर्षणशक्ति हे गुण होते. त्यामुळें त्याला मोठेपण लाभलें. तेव्हां अशा श्रेष्ठतम पुरुषाची आपण पुण्यतिथि साजरी करणें हें आपलें कर्तव्य होय."

## स्मारकें.

कलकत्ता येथें नुकतीच ‘ राममोहन राय लायब्ररी ’ बंगालच्या गव्हरनरसाहेबांच्या हस्तें उघडण्यांत आली. त्या वेळीं भाषण करतांना लॉर्ड कार्मायकेल ह्मणालेः—

“ मी हिंदुस्तानांत आल्यापासून राममोहन रायाविषयीं पुष्कळ वाचलें व ऐकलें. ते चांगले आणि थोर गृहस्थ होते. त्यांच्या कार्यांचे परिणाम अद्याप दिसून येत आहेत, व त्यामुळें या पुढील कालांतहि त्याचा उपयोग होणार आहे. हिंदी लोकांत आधुनिक शिक्षणाचा प्रसार झाला पाहिजे, या मताचे राममोहन राय हे अगदीं पहिले पुरस्कर्ते होत. ज्या सामाजिक प्रश्नांचा आज आपणांला विचार करावा लागत आहे, ते बहुतेक त्यांच्या दूरदर्शी बुद्धीला अवगत होते, आणि हे प्रश्न ज्ञानाचा प्रसार झाल्याखेरीज नीटपणें सुटणार नाहींत, असा त्यांचा विश्वास होता. अगदीं थोड्या लोकांच्या ज्ञानसंपन्नतेनें अखिल जनतेची उन्नति होईल, यावर त्यांचा भरंवसा नव्हता. त्यांनां पक्कें ठाऊक होतें, कीं, सुधारणा आपोआप होत नसते. ही सुधारणा होण्याला औद्योगिक परिस्थिति पुष्कळशी बदलली पाहिजे, व तो बदल घडून येण्याला सामान्यजनतेंत ज्ञानप्रसार झाला पाहिजे; आणि या विश्वासानें त्यांनीं लोकशिक्षणाच्या कार्यांत आपलें आयुष्य खर्च केलें. असा थोर मनाचा पुरुष आपणांत झाला ह्मणून हिंदी लोकांनां अभिमान वाटला पाहिजे, आणि अशा पुरुषानें आह्मां इंग्रजांशीं मिळून वागण्याचें धोरण ठेवलें होतें ह्मणून आह्मीं धन्यता मानली पाहिजे. अशा पुरुषाचें अत्यंत योग्य स्मारक ग्रंथसंग्रहाच्या रूपानें असावें हें युक्तच आहे. राममोहन रायांनीं हिंदुस्तानाच्या धोरणाचा परिचय इंग्लंडला करून दिला, आणि इंग्लंडाच्या संबंधापासून होणारे फायदे हिंदुस्तानाला समजावून दिले. सती जाण्याची चाल बंद करून त्यांनीं आपलें नांव अजरामर करून

ठेवलें आहे; परंतु दुसऱ्याहि बाबतींत आपल्या देशबांधवांसाठीं त्यांनीं फार मोठें काम केलें आहे."

हीं व अशींच राजाचीं दुसरीं स्मारकें आहेत; पण राममोहनाच्या स्मारकांविषयीं एक ब्रह्मबंधु ह्मणतात " अद्याप आह्मांलाच–ब्राह्म-समाजाच्या सभासदांना–त्याची खरी योग्यता नीटशी कळून आलेली नाहीं; निदान आमच्या कृतीवरून तरी असें दिसतें. आधीं आह्मी गुरु–ईश्वरांत आह्मांत–कोणी मध्यस्थ मानीत नाहीं. राजा राममोह-नाला त्या अर्थानें गुरु नका मानूं; पण त्यानें केवढें धर्मकार्य, सत्कृत्य केलें हें मनांत आणून तरी त्याच्याविषयीं अत्यंत पूज्यबुद्धि पाहिजे ती आमच्यांत आहे काय ? ज्यानें आह्मांला नीट मार्गाला, वर्तनाला लाविलें त्याच्याकारितां आह्मी कांहीं करितों काय? एका बाजूला जुने लोक तर गुरूची पूजाच करितात, त्याला डोकीवर घेऊन नाचतात, अयोग्य असे ढंग माजवितात! तर उलटपक्षीं आमच्या ब्राह्मसमाजाचा दुसऱ्या प्रकारचा अतिरेक दिसून येत आहे! ह्मणजे समाजसंस्थापक कोण काय इतकें साधारण जरी अवगत असलें, तरी तें तेवढ्याच पुरतें माहीत! आह्मीं दर वर्षी त्याच्या पुण्यतिथीचा उत्सव करतों, पण त्याचें स्मारक काय करतों? कलकत्त्याला तर त्याचें कांहीं अद्याप स्मारक झालेलें नाहीं. आपल्याइकडे हा राममोहन आश्रम आहे. राममोहन सेमिनरी ह्मणून बांकीपुराला आहे, एवढेंच! पण निरपेक्षबुद्धीनें मुद्दाम त्याचें स्मारक ह्मणून कांहीं आहे काय, ह्मणून पाहिलें तर काय दिसते? एका आश्रमाची आपल्याला इकडे उणीव भासत होती. एका उदार बंधूंनीं आश्रम बांधून दिला व त्याला नांव कांहीं तरी द्यावयाचें तें राममोहनाचें दिलें, झालें. तसेंच तिकडे शाळेची गरज होती, ती शाळा निघाली व नांव दिलें राममोहन-राय सेमिनरी, असेंच नाहीं तर काय! पण खरोखर कांहींच हित-

संबंध न ठेवतां केवळ राममोहनाला अर्पण म्हणून कोठें कांहीं आहे काय ?

"राममोहनाचें मोठेपण आम्ही ब्राह्मसमाजाच्या मंडळीनेंहि अजून पाहिलें नाहीं. याचें एक कारण उघड आहे. कालतः आम्ही जितके दूर गेलों असतां तें मोठेपण अधिक प्रमाणावर दिसून येईल, तितकें अद्याप आपण गेलों नाहीं. पण यांत आपला दोष नाहीं. सध्यांच्या कालमानानें त्याचें महत्त्व जितकें आपल्या अंगीं बाणलें पाहिजे तें जर हलगर्जीपणा किंवा अशा कांहीं कारणामुळें बाणलें नसेल, तर मात्र आपण दोषी होऊं. हा मुंबईला राजाबाई टॉवर आहे. उंच आहे, दिसावयाला सुंदर आहे. पण त्याच्या अगदीं जवळ जाऊन उभे रहा, म्हणजे एकावर एक दहा दगड मांडून जेवढी उंची होईल तेवढ्याच उंचीचा भाग आपल्या नजरेंत भरेल; जास्त नाहीं. तेंच दूर जाऊं लागा म्हणजे हळुहळू त्याचें समग्र रूप ध्यानांत येईल. तसेंच आणखी दोनशें वर्षे जातील तेव्हां राममोहनाची कृति डोळ्यांत अधिक भरेल. आपण आज त्याचे अंकीं मूल मातेच्या अंकावर चढून बसतें त्याप्रमाणें बसलों आहों. पण कालगतीनें त्याच्यापासून लांब गेल्यावर काय काय दिसेल याची आपणांला कल्पना करितां येते. कारण, त्याचें बीज त्याच्या चरित्रांतच आहे. बाकीच्या त्याच्या सर्व गोष्टी दोनतीन हजार वर्षांनीं विसरून जाण्यासारख्या आहेत; पण मुख्यतः दोन गोष्टी मला चिरस्थायी दिसतात. एक तर राष्ट्रीयता व सार्वत्रिकता याच्यांत साधारण लोकांच्या व्यवहारांत भेद दिसून येतो, तो राममोहनाच्या मनांत व वर्तनांत कोठें नव्हता. त्यानें दोन्ही गोष्टींची संगती कशी सुरेख लावून दिली होती! राममोहन मोठा राष्ट्रभक्त होता, पण आपल्या मनाचा भाव अमुक एका रीतीनें

ठेवला पाहिजे, कीं, त्या रीतीनें ठेवला ह्मणजे या दोन गोष्टी एक होऊन जातात, हें राममोहनाला पक्केपणीं कळलेलें होतें. ज्ञान,भक्ति कर्म इत्यादि जीवनाचे सर्व भाग व्यापून टाकणारा असा सार्वत्रिक धर्म त्यानें मनांत आणिला. तो मोघम, केवळ कल्पनेच्या लहरींत तरंगणारा नसून सगळ्या विशिष्ट गोष्टींत जाऊन भिनणारा आहे. कोणताहि भाव जो व्यक्तींत, तोच कुटुंबांत, तोच राष्ट्रांत, तोच साऱ्या जगांत असा खरोखरी प्रकार आहे."

## षष्ठ परिच्छेद.

## सिंहावलोकन.

१. आयुष्यांतील कांहीं प्रसंग.
२. गुणवर्णन.
३. उपसंहार.

# षष्ठ परिच्छेद.

## प्रकरण पहिलें.

## आयुष्यांतील कांहीं प्रसंग.

साधारणपणें असा नियम आहे, कीं, मोठे लोक सामान्य माणसांमध्यें फारसे मिळूनमिसळून वागत नाहींत. त्यांचे जे निकट परिचयाचे व जिव्हाळ्याचे मित्र असतील, त्यांच्याबरोबरच त्यांचें संभाषण होतें. परंतु राममोहनाची गोष्ट तशी नव्हती. आज तो एकाद्या राजाच्या सहवासांत असे, तर उद्यां एकाद्या शेतकऱ्याबरोबर मन मोकळें करून बोलत असलेला दृष्टीस पडे. आज तो मोठमोठ्या तत्त्ववेत्त्यांबरोबर तत्त्वज्ञानाविषयीं वादविवाद करी, तर उद्यां तो एकाद्या लहान मुलाबरोबरच खेळतबागडत असलेला दृष्टीला पडे. हरिनाभीचे प्रसिद्ध पंडित आनंदचंद्र शिरोमणि यांनीं एकदां त्याला एका मजुराबरोबर बसून त्याच्या व इतर मजुरांच्या स्थितीविषयीं चौकशी करीत असतांना पाहिलें. गरीबांविषयीं त्याला फार कळवळा असे. त्यांची कड उचलणें तो आपलें मुख्य कर्तव्य समजत असे. एकदां एका गरीब मनुष्याच्या डोक्यावर एक जड ओझें उचलून ठेवतांना त्याला पाहण्यांत आलें; दुसऱ्या एका प्रसंगीं बरद्वानचा राजा तेजचंद्र त्याला भेटण्याला आला त्याच वेळीं त्याचा एक मित्रहि भेटण्याला आला होता. राममोहनानें दोघांचाहि सारखाच सत्कार केला.

राममोहनाला लहान मुलें फार आवडत असत. तो त्यांच्याबरोबर खेळत असे. मुलांनां झोंके घेण्याकारितां त्यानें मुद्दाम आपल्या घरामध्यें एक झोंपाळा बांधला होता. प्रथम मुलांनां कांहीं वेळ

झोंके देऊन राममोहन ह्मणत असे, कीं, मुलांनों, चला, तुमची पाळी संपली. आतां माझी पाळी आली आहे. असें ह्मटल्याबरोबर तीं मुलें भराभर खालीं उड्या टाकीत असत, व राममोहन झोंपाळ्यावर बसून मुलें त्याला झोंके देत असत. याप्रमाणें गाढ विद्वत्तेचा आणि लहान मुलांमधील भोळ्या भावाचा राममोहनामध्यें संयोग झालेला होता.

राममोहन एवढा विद्वान् व मोठा तत्त्वज्ञानी होता, तथापि तो मोठा विनोदी असे. कोणताहि प्रश्न त्याला केला, कीं, त्याचें उत्तर हें तयारच. एकदां तो झोंपाळ्यावर बसला असतांना त्याच्या एका मित्रानें त्याला विचारलें, कीं, येथें पुष्कळ खुर्च्या असतांना तुला बसावयाला झोंपाळाच कां आवडतो ? हंसून राममोहनानें उत्तर केलें "ब्राह्मणाच्या मुलाला लौकरच इंग्लंडला जावयाचें आहे. तेव्हां जलप्रवास करण्यापूर्वी बरीच तालीम केली पाहिजे !"

एकदां एक ब्राह्मण फार आजारी पडला. तेव्हां त्यानें एका देवीपुढें साष्टांग नमस्कार घालून तिची मदत मागितली. ती देवी त्याच्या स्वप्नांत येऊन तिनें त्याला सांगितलें, कीं, या गांवांतील अमक्याअमक्या शूद्राचें अन्न तूं ग्रहण केलेंस तर तूं बरा होशील. हें ऐकून तो ब्राह्मण बुचकळ्यांत पडला. शूद्राच्या हातचें अन्न घ्यावें तर आपल्याला ज्ञातिबहिष्कृत व्हावें लागेल, अशी त्याला भीति वाटली. त्यानें पुष्कळ पंडितांचा सल्ला घेतला, पण कोणींहि योग्य सल्ला दिला नाहीं. शेवटीं तो राममोहनाकडे आला. 'तूं श्रीमंत आहेस का ? तूं त्या शूद्राला कांहीं विनंती केल्यास तो ती मान्य करील काय ?' हे दोन प्रश्न राममोहनानें त्याला विचारले. होकारार्थी उत्तर मिळाल्यावर राममोहनानें त्याला ओढ्या प्रांतांतील * जगन्नाथ शहरीं जावयाला सांगितलें.

* जगन्नाथाच्या देवळामध्यें प्रसाद ह्मणून कोणाचेंहि अन्न घेण्यास हरकत नाहीं.

## आयुष्यांतील कांहीं प्रसंग.

टाकीचा प्रसिद्ध जमीनदार कालीनाथ मुनशी राममोहनाला फार पूज्य मानी, व महत्त्वाच्या गोष्टींत त्याचा सल्ला घेई. एकदां एक ढोंगी मनुष्य एक शंख घेऊन कालीनाथाकडे गेला, व त्यानें त्याला सांगितलें, कीं, 'या शंखामध्यें असें कांहीं सामर्थ्य आहे, कीं,ज्याच्या-जवळ ह्मणून तो असेल त्याला कोणत्याहि प्रकारची ददात पडणार नाहीं व त्याच्या घरीं ऋद्धिसिद्धि पाणी भरतील.' हें ऐकून तो शंख विकत घेण्याचें कालीनाथानें ठरविलें, व त्याबद्दल ५०० रुपये किंमत ठरली. तो जमीनदार नंतर त्या मनुष्याला घेऊन राममोहनाकडे गेला, व मोठ्या आनंदानें त्याला सर्व वृत्तांत कळवून त्यानें त्याचें मत विचारलें. राममोहनानें त्याला पुढीलप्रमाणें उत्तर दिलें:—

"ज्या संपत्तीच्या अभावामुळें सर्व जगाला दुःख होतें व विपदा-वस्था प्राप्त होते, व जी प्राप्त करून घेण्याकरितां सर्वांचे प्रयत्न चालू आहेत, ती संपत्ति ५०० रुपयांला जर कायमची मिळते आहे, तर यापेक्षां अधिक फायद्याचा सवदा तो कोणता? परंतु प्रश्न असा आहे, कीं, इतक्या बहुमोलाची वस्तु तो एवढ्या थोड्या किंमतील विकतो कां? तो आपल्याच ताब्यांत तो शंख कां ठेवीत नाहीं? ह्मणजे त्याच्या घरामध्यें नेहमीं आबादानी राहून त्याला कोणत्याहि गोष्टीची उणीव भासणार नाहीं. तेव्हां ५०० रुपये प्रत्यक्ष संपदादेवी-पेक्षां जास्त आहेत कीं काय?"

हें त्याचें उत्तर ऐकून तो जमीनदार शुद्धीवर आला व एक शब्दहि न बोलतां निघून गेला. तो सवदा आपणांला कबूल नाहीं, असें अर्थात् त्यानें त्या शंखवाल्याला सांगितलें.

राममोहन जबरा खाणारा होता. एकदां तो हुगळी येथील आपल्या मित्राकडे गेला, व एका नारळाच्या झाडावर नारळ लटक-लेले पाहून ते खाण्याची इच्छा त्यानें प्रदर्शित केली. त्याच्या मित्रानें

नेहमींप्रमाणें त्याला एक नारळ दिला; पण राममोहन ह्मणाला "मला एक नारळ ह्मणजे कांहींच नव्हे, सगळे नारळ दे," व त्यानें ते सर्व खाऊन टाकले !

जे लोक त्याच्या चुका दाखवून देत, त्या लोकांवर न रागावतां उलट त्याला आनंदच होई. त्यानें आपल्या एका कवितेमध्यें असें ह्मटलें होतें, कीं, 'बंधू हो, तुह्मी आपला चेहरा आरशामध्यें पाहून किती दिवस सुख मानून घ्याल ?—ह्मणजे तुह्मी संसारांतच किती दिवस गढून राहणार ? तुह्मी आपल्या भवितव्यतेविषयी कांहींच का विचार करणार नाहीं?' त्या वेळेस डोक्यावर लांब केंस ठेवण्याची बंगालमध्यें चाल होती, व आपल्यासमोर आरसा ठेवून आपले केंस दररोज विंचरण्याची राममोहनाला सवय होती. एका प्रसंगीं त्याच्या कवितेला उद्देशून त्याच्या एका मित्रानें थट्टेनें ह्मटलें "बाबूमहाशय, आपल्या कवितेमध्यें केलेला उपदेश तुमच्याशिवाय इतरांना लागू आहे कीं काय?"

त्यावर राममोहन ओशाळला व ह्मणाला "भाऊ, तुझें ह्मणणें अगदीं बरोबर आहे. यावरून हें उघड होतें, कीं, दुसऱ्याला उपदेश करणें फार सोपें आहे, पण त्याप्रमाणें स्वतः वागणें फार कठीण आहे."

या प्रसंगीं पुढील गोष्टीची आठवण होणें स्वाभाविक आहे. एकदां एका तत्त्ववेत्त्याला या जगामध्यें सर्वांत सोपी गोष्ट कोणती ह्मणून विचारलें असतां त्यानें उत्तर दिलें 'दुसऱ्याला उपदेश करणें,' व 'अतिशय कठीण गोष्ट कोणती ह्मणून विचारलें' तेव्हां तो ह्मणाला त्या 'उपदेशाप्रमाणें स्वतः वागणें ही होय!'

लोकांनीं राममोहनाचा अपमान केला, किंवा कोणीं त्याला अपशब्द बोलला, तरी तो तें सहन करून मनाचा थोरपणा व्यक्त करी. एका हिंदुधर्माच्या जुन्या कट्टया अभिमान्यानें एक गाणें रचलें व

त्यामध्यें त्यानें राममोहनाची अतिशय निंदा करून त्याला घाणे-रड्या शिव्या दिल्या. राममोहनाच्या एका आप्तानें तें पाहून त्याचा सूड उगविण्याचा निश्चय केला. राममोहनाला हें कळल्यावर त्यानें आपल्या त्या आप्ताला बोलावून आणलें व तो ह्मणाला " अनेक अडचणी सहन करून व अनेक विपत्ति भोगूनच इंग्रजांनां हिंदुस्तान मिळालें आहे. वाईटांतूनच चांगलें निघतें व आपत्ति व संकटें यांच्यानंतर सुखप्राप्ति होते, ही गोष्ट आपण लक्ष्यांत ठेविली पाहिजे. चांगल्या उजेडाच्या रस्त्यानें कोणीहि जाईल. परंतु काळोखामधूनहि जो आपला मार्ग काढतो, त्यालाच महत्पद प्राप्त होतें. लोकांनां वाटेल तें त्यांनां बोलूं दे. त्याच्याकडे लक्ष्य देणें बरोबर नाहीं. सदाचाराचा मार्ग न सोडणें एवढाच आपला प्रयत्न असावा."

राममोहन क्षुद्रबुद्धि मनुष्याचा मनस्वी तिरस्कार करी. एकदां तो बिशप मिड्लटन् याला भेटावयाला गेला होता. संभाषण चालू असतां बिशप त्याला ह्मणाला " तूं जर ख्रिस्ती होशील तर तुझी सत्ता व दर्जा मी अधिक वाढवीन." यायोगें राममोहन इतका नाखुष झाला, कीं, त्यानें पुनः कधींहि बिशपची गांठ ह्मणून घेतली नाहीं !

नास्तिक मनुष्याचा राममोहनाला फार राग येई. त्याच्या वेळीं कांहीं संशयवादी व नास्तिक होते. एके प्रसंगीं एका मनुष्यानें राममोहनाला कळविलें, कीं, 'अमका अमका मनुष्य प्रथम एकेश्वरी मताचा होता, पण आतां तो नास्तिक बनला आहे.' राममोहनानें ह्मटलें 'कांहीं दिवसांनीं तो पशू बनेल!'

एकेश्वरी धर्माचें प्रतिपादन करून राममोहनानें कांहीं लोकांनां एका सत्य, सनातन परमेश्वराचीच पूजा करण्याला लाविलें. एकदां एका संशयवाद्याची त्यानें ईश्वराच्या अस्तित्वाविषयीं पुढीलप्रमाणें खात्री करून दिली—

**प्रश्न**—ही सृष्टि अस्तित्वांत कशी आली व ती कशी राहिली आहे?

**उत्तर**—एका अवर्णनीय, अतर्क्य अशा शक्तीच्या योगें ही सृष्टि निर्माण झाली आहे. या शक्तीनें सर्वांना व्यापून टाकिलें आहे. मनुष्यानें आपल्या बुद्धिसामर्थ्यानें तारायंत्र, आकाशवाहन, वाफेचें यंत्र व दुसरीं यंत्रें शोधून काढलीं; पण ज्या महान् शक्तीनें मनुष्यामध्यें प्राणवायू निर्माण केला, ती शक्ति अचिंतनीय आहे.

**प्रश्न**—मूळ शक्ति कशी ओळखतां येते?

**उत्तर**—प्रथम तुम्ही स्वतःला ओळखण्याला शिका, म्हणजे मग ती शक्ति पूर्ण शक्तिमान्, सामर्थ्यवान् आहे हें तुम्हांला समजेल. त्या परमथोर शक्तीनें सर्व विश्व व्यापून टाकिलें आहे. मनुष्याच्या शरीररचनेचे व्यापार अव्याहत चालू आहेत. यावरून तिचें अस्तित्व स्पष्ट होतें. मानसिक कल्पनांवरूनहि ती स्पष्ट होते. या रीतीनें योग्य विचार केला असतां ती शक्ति कळून येते.

एकदां द्वारकानाथ टागोर यांच्या ओळखीच्या एका ब्राह्मणाला देवपूजेकरितां फुलें हवीं होतीं. द्वारकानाथानें त्याला राममोहनाच्या बागेमध्यें जा म्हणजे पुष्कळ फुलें मिळतील, असें सांगितलें. त्या ब्राह्मणानें मोठ्या रागानें उत्तर केलें "काय,त्या पाप्याच्या बागेमधून मीं फुलें आणावीं असें तुम्ही मला सांगतां!" तथापि त्याच बागेमध्यें जाण्याविषयीं द्वारकानाथानें त्याचें मन वळविलें. राममोहनाच्या बागेमध्यें एक विवक्षित भाग सोडून कोठेंहि जाण्याला कोणालाहि मना नव्हती. त्याला न जुमानतां त्या विवक्षित भागामध्येंच जाऊन हा ब्राह्मण तेथील फुलें तोडूं लागला. रखवालदारानें तसें न करण्याविषयीं त्याला सांगितलें. तेव्हां त्यानें रागानें उत्तर केलें "माझ्यासारख्या उच्च ब्राह्मणानें पाप्याच्या बागेमध्यें पाय ठेविला त्यामुळें ही बाग

पवित्र झाली, असें मानण्याऐवजीं हीं फुलें तोडूं नकोस, असें म्हणण्याचें धारिष्ट तरी तूं कसें करितोस!" कांहीं अंतरावरून त्याचें हें भाषण राममोहनानें ऐकिलें. तेव्हां त्यानें त्या ब्राह्मणाजवळ येऊन मोठ्या सौम्यपणानें विचारिलें "तुम्ही मला इतके अधार्मिक समजतां तेव्हां माझ्या हातून अशी कोणती वाईट गोष्ट घडली आहे?" दोघांत बराच वादविवाद झाला. दोघेहि शास्त्रांतील आधार काढून वादविवाद करूं लागले. असें म्हणतात, कीं, त्यांचा वादविवाद सर्व दिवसभर सारखा चालला होता. दोघेहि उपाशींच होते. शेवटीं राममोहनानें प्रतिपादिलेल्या तत्त्वांसंबंधीं त्या ब्राह्मणाची खात्री होऊन त्यानें ती फुलांची परडी फेंकून दिली व त्याच्या पायां पडून त्यानें त्याला आपला गुरु म्हटलें. राममोहनानें त्याला आपल्या घरीं नेऊन दोघे त्या ठिकाणीं एकत्र जेवले. त्यांचें संभाषण नंतर छापून प्रसिद्ध करण्यांत आलें.

दुसऱ्या एका प्रसंगीं एक ब्राह्मण त्याच्या बागेमध्यें आला आणि आपलें उपरणें एका झाडाच्या बुंध्याशीं ठेवून फुलें तोडूं लागला. मध्यंतरीं एका मनुष्यानें तें उपरणें थट्टेनें लपवून ठेविलें. फुलें तोडून झाल्यानंतर तो ब्राह्मण घरीं जावयाला निघाला व ठेविलेल्या जागीं उपरणें पहातो तों तें तेथें नाहीं! तेव्हां संतापानें तो मोठमोठ्यानें शिव्या देत सुटला. राममोहनानें आपल्या घरांतून हें ऐकिलें व तपास करितां त्याला सर्व प्रकार कळून आला. नंतर तो त्या ब्राह्मणाकडे आला व म्हणाला "भाऊ, इतका उतावीळ होऊं नकोस. तुझें एक उपरणें गेलें त्याच्याऐवजीं तुला दुसरें मिळेल." असें म्हणून राममोहन त्याच्याबरोबर दुसऱ्या विषयांवर बोलूं लागला. या अवधींत त्याचें तें उपरणें आणण्यास एका मनुष्याला त्यानें खूण केली. तें उपरणें आणल्यावर त्यानें तें त्या ब्राह्मणाला देऊन म्हटलें "आतां तरी तुझें समाधान झालें ना!"

ब्राह्मणानें उत्तर केलें " माझें जें तें मला मिळालें. तेव्हां मीं समाधान तें कां मानावयाचें!"

राममोहनानें त्याला प्रश्न केला "हीं फुलें कोणाचीं ?"

त्यानें उत्तर दिलें "ईश्वराचीं."

" हीं तूं कोणाला देणार ?"

" ईश्वराला."

तेव्हां राममोहन त्याला ह्मणाला " तर मग जीं फुलें ईश्वराचीं आहेत तींच त्याला दिल्यानें तो संतुष्ट तो कसा होणार !"

यावर उत्तर देतां न आल्यामुळें ब्राह्मण स्वस्थ बसला.

राममोहनाची स्मरणशक्ति व ग्रहणशक्ति फारच दांडगी होती. एके प्रसंगीं एक विद्वान् पंडित त्याजकडे आला व 'अमक्या एका तंत्रावर तुझ्याशीं मला वाद करावयाचा आहे' असें ह्मणाला. तें तंत्र राममोहनानें केव्हांहि वाचलें नव्हतें. तेव्हां त्यानें त्या पंडिताला दुसऱ्या दिवशीं त्याच वेळीं ये ह्मणून सांगितलें. पंडित गेल्यावर त्यानें सावा बझार राजघराण्यांतून तें तंत्र आणिलें व त्याचा मन लावून अभ्यास केला. या थोड्या अवधींत त्यानें सर्व तंत्र वाचलें. एवढेंच नव्हे, तर तें सर्व पूर्णपणें अवगत करून घेतलें. नेमलेल्या वेळीं तो पंडित आला, तेव्हां दोघांमध्यें कडाक्याचा वाद झाला. त्या पंडितानें जे जे प्रश्न विचारले, त्याचीं उत्तरें राममोहनानें समग्र दिलीं. त्याचें हें विलक्षण बुद्धिसामर्थ्य व वाद करण्यामध्यें हातखंडा पाहून त्याची तारीफ करून तो पंडित आपल्या घरीं गेला.

राममोहनाच्या चित्ताची एकाग्रता व एकाद्या गोष्टीचा पिच्छा पुरविण्याची संवय हीं फार वाखाण्याजोगीं होतीं. एके सकाळीं राधानगर येथें असतांना स्नान आटोपल्यावर तो अभ्यास करण्याच्या खोलीमध्यें गेला, व रामायण वाचण्याला त्यानें सुरुवात केली.

त्यापूर्वी त्यानें तें कधींहि वाचलें नव्हतें. आपणांला कोणींहि व्यत्यय करूं नये अशी प्रथम त्यानें घरांतील सर्वांनां ताकीद दिली होती. जेवणाची वेळ झाली पण त्याच्याजवळ जाण्याची कोणाची छाती झाली नाहीं. पुष्कळच वेळ झाला ह्मणून त्याच्या आईनें एका ह्मातान्या गृहस्थाला त्याला बोलवावयाला पाठविलें. तो गृहस्थ खिडकींतून डोकावून पहात असतां 'मला आणखी थोडा वेळ व्यत्यय करूं नका' असें खुणेनें राममोहनानें त्याला सुचविलें. एका बैठकीलाच त्यानें सर्व रामायण संपविलें, असें ह्मणतात!

राममोहनाचा दररोजचा कार्यक्रम पुढीलप्रमाणें असेः—

तो दररोज मोठ्या पहाटेला उठे व फिरावयाला जाई. सूर्योदय होण्यापूर्वी तो परत घरीं येत असे. नंतर स्नान करी. स्नानापूर्वी दोन पहिलवान त्याला तेल लावीत व अंग चोळीत. नंतर एकजण त्या दिवसाचीं वर्तमानपत्रें वाचून दाखवीत असे. नंतर तो सकाळची न्याहारी करून तालीम करीत असे. दहा वाजतां जेवून दोन वाजेपर्यंत संभाषण करीत असे किंवा आपल्या यूरोपियन मित्रांच्या भेटीला जात असे. तीन वाजतां चहा घेत असे. पांच वाजतां फराळ करून फिरावयाला जाई. दहा वाजतां संध्याकाळचें जेवण करून आपल्या मित्रांशीं थोडा वेळ बोलत बसून नंतर मध्यरात्रीपर्यंत लिहीत असे. त्या वेळीं तो एकांतांत असे. पुनः सकाळीं चार वाजतां नियमानें उठत असे. घरामध्यें असतांना मुसलमानी पद्धतीचा त्याचा पोषाख असे. तो बोडका कधीं बसत नसे.

## प्रकरण दुसरें.

# गुणवर्णन.

राममोहन सरकारी नोकरीवर असतांना त्याच्या सभोंवतीं जी परिस्थिति होती, तिचा विचार केल्यास असें दिसून येईल, कीं, त्या वेळीं त्याला सहज गबर होतां आलें असतें. इंग्रजी अंमल नुकताच सुरू होता. हिंदु लोकांच्या रीतिभाती इंग्रजांना माहीत नव्हत्या; ह्मणून देशाच्या खऱ्या स्थितीविषयीं त्यांच्यामध्यें पूर्ण अज्ञान होतें, व त्यामुळें त्यांना हिंदी अधिकाऱ्यांवरच नेहमीं अवलंबून रहावें लागे. अशा वेळीं उच्च अधिकारावर जे हिंदी अंमलदार होते, त्यांनीं आपली बरीच तुंबडी भरून घेतली. राममोहनाच्या वेळचे बरेच गृहस्थ या रीतीनें क्रोडोपती झाले होते. त्याचीहि इच्छा असती, तर तो देखील कोट्यधीश झाला असता. कारण, त्याच्याइतका हुशार, विद्वान्, वजनदार गृहस्थ त्या वेळीं नव्हता. त्यानें कोणाची थोडीशी शिफारस केली, कीं, त्याला मोठी जागा मिळत असे. द्वारकानाथ ठाकूर याला त्यानें नोकरीला लाविलें होतें. लवकरच तो धनाढ्य होऊन बसला. द्रव्याच्या लालुचीनें राममोहन मोहित झाला नाहीं. संपत्ति मिळविण्याच्या कामीं दुसऱ्यांनीं ज्या वाममार्गाचें अवलंबन केलें, तो मार्ग त्याला कधींहि पसंत पडला नाहीं. कारण त्याची सात्त्विक वृत्ति तशीच प्रखर होती. लोकांनीं एकाच सत्य परमेश्वराचें चिंतन करून धर्मशील व्हावें, अशी त्याची मनापासून इच्छा होती. पारमार्थिकतेचा लोकांना विसर पडत चालला होता, तिचें पुनरुज्जीवन करण्याचें बरेंचसें श्रेय त्याला दिलें पाहिजे.

## गुणवर्णन.

राममोहनाचें अंतःकरण फार मृदु होतें. दसऱ्याच्या दिवशीं मूर्तीला घेऊन वाजतगाजत मोठ्या डामडौलानें त्याच्या शेजारीं नदीवर नेत असतांना त्याच्या डोळ्यांतून अश्रु येत व पुष्कळ दिवसांपासून जडलेल्या या मूर्तिपूजेचा प्रकार पाहून त्याला खेद वाटत असे.

त्याचें मन किती उदात्त होतें हें त्यानें ब्राह्मसमाजाचें जें ' ट्रस्ट डीड' केलें आहे, त्यावरून दिसून येतें. ज्या वेळीं हिंदु लोक इतर देशच्या लोकांनां म्लेंच्छ ह्मणत व शास्त्रांचे अधिकारी फक्त ब्राह्मणच होत असें समजत,ज्या वेळीं मुसलमान लोक इतर धर्मांच्या लोकांनां काफर ह्मणत व त्यांचा धिक्कार करीत, ज्या वेळीं ख्रिस्ती लोक हिंदु लोकांच्या धर्मविधींचा जोरानें निषेध करीत व त्यांनां जंगली ह्मणत, अशा वेळीं देखील त्यानें आपल्या ट्रस्टडीडमध्यें असें लिहिलें, कीं, 'हें देऊळ ह्मणजे सर्व देशच्या, सर्व धर्मांच्या, सर्व जातींच्या लोकांकरितां आहे. '

त्याच्या प्रतिस्पर्ध्यांनीं त्याच्यावर जे जोराचे हल्ले केले, त्यांनां मोठ्या शांतपणें व मनाचा समतोलपणा ठेवून त्यानें जीं उत्तरें दिलीं, त्यांवरून देखील त्याच्या मनाचा मोठेपणा दिसून येतो. सर्व धर्मांविषयीं त्याचा सारखा आदर असे, व कोणत्याहि धर्मांतील उत्तम वचनें आपल्या लेखांमध्यें व व्याख्यानांमध्यें तो स्वमत प्रतिपादनार्थ घेत असे. ब्राह्मसभेच्या सिद्धांतांपैकीं एक सिद्धांत असा होता, कीं, वेदीवरून उपदेश करतांना कोणत्याहि धर्माची कोणींहि निंदा करितां कामा नये.

आपल्या पूर्वजांची जी सात्त्विक वृत्ति ती जागृत ठेवण्याविषयीं त्याला फार उत्कंठा लागून राहिली होती; परंतु त्या वृत्तीचें वर्धन करण्याकरितां पूर्वींच्या लोकांच्या हातून ज्या चुका झाल्या, त्यांची

पुनरावृत्ति न होऊं देण्याविषयीं तो खबरदारी घेत असे. त्या वेळीं प्रचलित असलेल्या शाक्त व वैष्णव या दोन पंथांमध्यें वरचेवर फार जोराचे तंटेबखेडे होत. या भांडणांमुळें त्याच्या स्वतःच्या कुटुंबाच्या व मामाच्या कुटुंबाच्या शांतीचा वारंवार भंग होई. परंतु राममोहन या बखेड्यांपासून नेहमीं दूर राही. शाक्तांचा कर्मनिष्ठपणा व वैष्णवांची लाक्षणिकता ( गूढार्थकता ) या दोन्हींपासून तो अलिप्त असे. त्यानें आपल्या देशबांधवांची धर्मशीलता वाढविण्याचा प्रयत्न केला; एवढेंच नाहीं, तर ईश्वराची भक्तिहि करण्याला शिकविलें. स्वतः उदाहरण घालून देऊन त्यानें लोकांना असें शिकविलें, कीं, ईश्वरावर प्रेम करणें व त्याला प्रिय अशीं कृत्यें करणें हीच त्याची भक्ति होय. ईश्वराविषयीं त्याचें प्रेम निष्कपट व साधें होतें. आपणावर ईश्वराचा विशेष अनुग्रह झाला, किंवा केव्हांकेव्हां ईश्वर आपल्या अंतःकरणांत उदित होऊन आपणाला विशेष प्रकारें ज्ञान सांगतो, असें त्याला कधींहि वाटत नसे. पण अतिशय लीनतेनें ईश्वराची सेवा करण्यामध्यें त्याला मोठा आनंद वाटे.

मुळींसुद्धां गाजावाजा न करतां तो ईश्वराची भक्ति मोठ्या नम्रतेनें करीत असे. याविषयीं पुष्कळ लहानसहान गोष्टी प्रचलित आहेत. इंग्लंडमध्यें असतांना डॉक्टर वॅट्साहेबांनीं मुलांकरितां जीं गाणीं केलीं होतीं तीं राममोहनाला फार आवडत असत. डॉ. कार्पेंटर ह्मणतात "तो जेव्हां जेव्हां उपासनेला जाई, तेव्हां तेव्हां या गाण्यांपैकीं कांहीं गाणीं वाचावयाचा त्याचा नित्याचा परिपाठ असे. या गाण्यांपैकीं पुढील गाणें तर त्याच्या विशेष आवडीचें होतें:—

'Lord! how delightful 'tis to see
A whole assembly worship thee!
At once they sing, at once they pray,
They hear of Heaven and learn the way.'"

लहान मुलांकरितां केलेल्या कविता देखील त्याला मनापासून आवडत. यावरून त्याचें अंतःकरण किती शुद्ध व साधे होतें, हें दिसून येतें.

राममोहन एकेश्वरी मताचा पुरस्कार करूं लागला म्हणून त्याला अनेक शत्रु उत्पन्न झाले. विषारी सर्प म्हणून हिंदु लोक त्याचा तिरस्कार करूं लागले, व त्यानें सुरू ठेविलेल्या सर्व चळवळींना विरोध करूं लागले, व दररोज त्याचा अनन्वित रीतीनें छळ करूं लागले. त्यानें त्रयीच्या तत्त्वाचा निषेध केला म्हणून ख्रिस्ती लोक त्याचे शत्रु झाले. इंग्रज मुत्सद्द्यांच्या राज्यपद्धतीविरुद्ध त्यानें चळवळ चालविली म्हणून डॉ. विल्सनसारखे विद्वान्हि त्याचा द्वेष करूं लागले. अशी स्थिति असतांहि न डगमगतां स्वतः एकट्याच्या हिंमतीवरच सुरू केलेलें सुधारणेचें काम त्यानें चालू ठेविलें, आणिबाणीच्या प्रसंगींहि जीवावर बेतली असतांनासुद्धां त्यानें आपलें धैर्य खचूं दिलें नाहीं. साधारण असा नियम आहे, कीं, निराशेचे प्रसंग प्राप्त झाले असतां मोठमोठ्यांचीहि मात्रा चालत नाहीं. परंतु राम-मोहनावर निराशेचा पगडा कधींहि बसलेला त्याच्या आयुष्यामध्यें दिसून येत नाहीं.

राममोहनाविषयीं जी माहिती उपलब्ध आहे,तीवरून एक दिवस-सुद्धां त्याचें धैर्य खचल्याचें दिसून येत नाहीं. त्याच्या ठिकाणीं हें जें सामर्थ्य होतें हा कशाचा परिणाम? ईश्वराच्या ठिकाणीं त्याचा दृढ विश्वास होता म्हणूनच. तो सदासर्वदा आपला सांगाती आहे, मित्र आहे, सखा आहे, असें त्याला वाटे, व सर्व जगानें जरी आपणाला टाकिलें व आपला धिक्कार केला तरी माझा हरि मला कधींहि सोडणार नाहीं, अशी त्याची खात्री होती. वेदांताचें त्यानें जें भाषांतर

केलें, त्याच्या प्रस्तावनेंत तो ह्मणतो "माझ्या सदसद्विवेकबुद्धीला अनुसरून मी ज्या या मार्गाचें अवलंबन केलें आहे, त्या योगें मी माझ्या आप्तांच्या देखील रोषास पात्र झालों आहें. कारण, माझ्या या मताविषयीं त्यांचा दुराग्रह असणें आनुवांशिक संस्कारामुळें साहजिकच आहे. परंतु मी हें सर्व निमूटपणें सहन करणार. कारण, माझा दृढविश्वास आहे, कीं, असा एक सुदिन प्राप्त होणार, कीं, त्या दिवशीं माझ्या या प्रयत्नाला न्याय मिळाल्याशिवाय राहणार नाहीं. लोक कांहींहि ह्मणोत, 'माझीं हीं मतें परम थोर असा जो परमात्मा त्याच्या घरीं रुजू आहेत,' हा जो माझा विश्वास तो कशानेंहि ढळणें शक्य नाहीं." त्यानें जें अल्प आत्मचरित्र लिहिलें आहे, त्यामध्यें तो ह्मणतो "हिंदुस्तानामध्यें छापण्याची कला निघाली तिचा फायदा घेऊन लोकांच्या चुका दाखविण्याकरितां मीं अनेक पुस्तकें व हस्तपत्रकें बंगालीमध्यें व इंग्रजीमध्यें छापून प्रसिद्ध केलीं. याचा परिणाम असा झाला, कीं, माझ्या विरुद्ध चोहींकडून एकच काहूर माजून गेलें, व दोनतीन स्कॉच मित्रांशिवाय प्रत्येकानें माझी सोबत सोडिली." अशा वेळीं देखील एकहि दिवस त्याचें धैर्य खचलें नाही. ईश्वराच्या ठिकाणीं त्याचा निष्ठावंत भाव होता ह्मणूनच त्याला हीं सर्व संकटें सोसण्यास सामर्थ्य आलें.

त्याच्यामध्यें ज्याप्रमाणें निष्ठावंत भाव होता, त्याचप्रमाणें त्याचा स्वार्थत्यागहि फार मोठा होता. १८१४ मध्यें ज्या वेळीं तो कलकत्त्याला आला त्या वेळीं सर्व आयुष्यभर त्याचा चरितार्थ सुखानें चालेल इतकी संपत्ति त्याच्याजवळ होती; परंतु पुस्तकें छापून तीं फुकट वांटल्यामुळें लवकरच त्याला दारिद्र्य आलें. १८३० मध्यें त्याची इतकी स्थिति झाली, कीं, इंग्लंडला जाण्याकरितां त्याच्याजवळ पैसा नव्हता, ह्मणून त्याला दिल्लीच्या बादशहाची मदत घ्यावी

लागली. ईंग्लंडमध्यें असतांना देखील त्याला बरेंच कर्ज झालें, व त्या योगें डॉक्टर विल्सनच्या ह्मणण्याप्रमाणें त्याला मरण लवकर आलें.

लोकांच्या हक्कांच्या संरक्षणाकरितां त्याच्याइतकी खटपट त्या वेळीं कोणींहि केली नाहीं. त्याच्या ठिकाणीं देशाभिमान जागृत होता ह्मणूनच त्यानें सतीची चाल बंद करण्याविषयीं इंग्रजी शिक्षणाला सुरुवात, व बंगाली भाषेची वाढ करण्याविषयीं अतोनात खटपट केली.

आपल्या देशबांधवांकरितां मुद्रणकलेला स्वातंत्र्य मिळवून देण्याकरितां त्यानें जिवापाड श्रम केले. इंग्लंडमध्यें असतांना हिंदी लोकांनां सरकारी नोकऱ्या देण्याची किती अवश्यकता आहे, हें त्यानें तेथील लोकांच्या दृष्टोत्पत्तीला आणून दिलें. हिंदी लोकांवर इतर देशचे लोक जे आरोप आणीत, त्यांचें खंडण तो वारंवार करीत असे. अशा अनेक रीतीनें त्यानें देशाची मोठी कामगिरी बजावून स्वतः बरीच झीज सोसलेली आहे.

तो मोठा स्वातंत्र्यप्रिय होता. ज्या ज्या योगें मनुष्यत्वाला कमीपणा आणणारें असें कांहीं त्याच्या दृष्टीला पडे, त्या त्या वेळीं तो त्याचा धिक्कार करीत असे. शूद्रांनां वेदाध्ययनाचा अधिकार नाहीं, याविरुद्ध त्यानें मोठी चळवळ केली.

हिंदी स्त्रियांवर जो जुलूम होत असे त्याचा प्रतिकार त्यानें मोठ्या जोरानें केला. तो फार भिडस्त असे. ज्यांनां ज्यांनां ह्मणून त्याची माहिती आहे, त्यांनां त्याचा हा गुण पाहून फार नवल वाटत असे.

एके प्रसंगीं त्याचा एक परमस्नेही द्वारकानाथ ठाकूर यानें ब्राह्मसभेच्या एका नियमाचें उल्लंघन केलें; त्याचा तो दोष दाखविण्याकरितां राममोहनानें आपल्या दुसऱ्या एका मित्राला सांगितलें, इतका तो भिडस्त होता.

या त्याच्या स्वभावामुळेंच आपलीं व्याख्यानें तो दुसऱ्याला वाचावयाला सांगत असे, व कांहीं लिहिलेलीं पुस्तकें त्यानें दुसऱ्याच्या नांवानें प्रसिद्ध केलीं आहेत.

राममोहन फार दयाळू अंतःकरणाचा होता. जगांतील कोणाहि मनुष्याच्या संकटाविषयीं त्याला कळवळा वाटत असे, व त्याच्याशीं संबंध येणाऱ्या सर्वांनां तो फार ममतेनें वागवीत असे. त्याचें खासगी वर्तन आदर्शवत् होतें. त्याच्या आप्तांकडून त्याचा जरी अनन्वित छळ झाला, तरी त्यानें उलट त्यांच्यावर उपकारच केले. शेवटपर्यंत त्याचा आपल्या आईविषयींचा आदर कमी झाला नाहीं. डॉ. कार्पेंटर त्याच्या आईविषयीं ह्मणतात "अंधश्रद्धेच्या पगड्यामुळें व आपल्या आप्तांच्या चिथावणीनें तिला राममोहनाचीं मतें पसंत नव्हतीं. तथापि राममोहनाचें तिजवर अतिशय प्रेम होतें. शेवटीं तिच्या कृत्याबद्दल तिला पश्चात्ताप झाला व राममोहनाच्या मतांविषयीं तिची खात्री झाली; तथापि मूर्तिपूजेचें जड जूं एकदां जें तिच्या मानेवर लादलें होतें, तें तिला झुगारून देतां आलें नाहीं." जगन्नाथाला जाण्यापूर्वी तिनें राममोहनाजवळ असे उद्गार काढले, कीं, "राममोहना, तुझीं मतें बरोबर आहेत, आणि हीं सोंवळींओवळीं वगैरे कर्में सर्व मिथ्या आहेत, ही गोष्ट खरी; पण आमची अबलांची जात, आणि तशांत मी तर फार वृद्ध झालें; तेव्हां माझ्या या उतारवयांत आतां पूर्वीचा धर्म सोडून तुझ्या धर्माचा स्वीकार करण्याला मी असमर्थ आहें."

प्रकरण तिसरें.

# उपसंहार.

साधारणपणें असा नियम आहे, कीं, एकादें मोठें सत्कृत्य करण्याची अतिशय उत्कंठा एकाद्याला लागून राहिली, तर तें साधण्याकरितां तो इतर गोष्टींची हयगय करितो; त्याचप्रमाणें राममोहनाची स्थिति झाली. इंग्लंडमध्यें आरंभिलेलें कृत्य शेवटाला नेण्याचा त्याला इतका ध्यास लागून राहिला होता, कीं, त्यानें त्याकारितां लाखों रुपये कर्ज काढिले. इंग्लंडमध्यें तो मरण पावल्यानंतर डॉ. एच्. एच्. विल्सन यांनीं दिवाण राम कमाल सेन यांनां लिहिलेल्या आपल्या पत्रामध्यें म्हटलें आहे " राजाला शारीरिक रोगानें ज्याप्रमाणें पछाडलें होतें, त्याप्रमाणें मानसिक चिंतेनेंहि पछाडलें होतें, असें दिसतें. तो पैशाच्या मोठ्या अडचणींत सांपडला व त्यामुळें त्याला आपल्या मित्रांपासून मोठमोठाल्या रकमा कर्जाऊ काढाव्या लागल्या. त्यामुळें त्याला बराच शीण आला. कारण इंग्लंडमधील लोकांची स्थिति अशी आहे, कीं, ते आपला पैसा गमावण्यापेक्षां जीव देखील देतील. दुसरी गोष्ट अशी, कीं, राममोहनाचा इंग्लंडमधील खासगी कारभारी स्टॅनफर्ड आर्नॉट यानें आपल्या पगारापैकीं पुष्कळ बाकी दाखवून राजाला अशी दहशत घातली, कीं, 'तूं जर माझे पैसे दिले नाहींस, तर इंग्लंडमध्यें तूं प्रसिद्ध केलेल्या सर्व पुस्तकांवर मी माझा वारसा सांगेन.' आपण अशा प्रकारच्या क्षुद्र बुद्धीच्या मनुष्याच्या कचाट्यांत सांपडलों आहों, ही गोष्ट राजाला फार उशिरां कळून आली. "

लोकांचे पैसे उसने घेण्यामध्यें राममोहनाचा कोणताहि वाईट हेतु नव्हता. त्याला अशी पक्की खात्री होती, कीं, लोकांचें कर्ज आप-

णाला खात्रीनें देतां येईल. कारण,इंग्लंडमध्यें त्यानें जीं पुस्तकें लिहून प्रसिद्ध केलीं, तीं विकून त्याला दुसऱ्याचें कर्ज केव्हांच फेडतां आलें असतें. पुढें चांगले दिवस येतील या आशेवरच त्यानें कर्ज काढलें; पण विधात्याची इच्छा त्याला काय ठाऊक? इतका लौकर त्याचा अंत होईल असें कोणास वाटलें होतें!

कित्येकजण असें ह्मणतात,कीं,प्रथम ऐहिक मानापमानाच्या गोष्टीं-विषयीं तो जसा बेपर्वा होता, तशी त्याची स्थिति नंतर राहिली नाहीं. ते ह्मणतात,कीं, तो कलकत्त्याला असतांना हिंदुस्तानचे गव्हरनर जन-रल यांची देखील त्यानें पर्वा केली नाहीं; पण तोच इंग्लंडमध्यें गेल्यावर इंग्लंड व फ्रान्स या देशच्या राजांच्या आमंत्रणाला भुलला.सकृत्दर्शनीं वरील ह्मणणें खरें आहे असें वाटण्याचा संभव आहे. कारण बुद्ध, नानक, चैतन्य व तुकाराम वगैरे साधूंनीं ऐहिक गोष्टींतून आपलें मन काढून तें केवळ परमार्थाच्याच मार्गाला लाविलें होतें. जीझस् ख्राइस्ट याला त्याची आई जेव्हां भेटावयाला आली, तेव्हां तिच्याशीं बोलण्याचें त्यानें नाकारलें व ह्मटलें " कोण माझा भाऊ! व कोण माझी आई! " व आपले बाहु पसरून आपल्या शिष्यांनां उद्देशून तो ह्मणाला "ही माझी आई व हे माझे भाऊ! कारण जे कोणी ईश्वराची आज्ञा प्रमाण मानून त्याच्या इच्छेप्रमाणें चालतात, तेच माझे भाऊ, बहिणी व आई होय." वरील साधूंनीं ज्याप्रमाणें केलें, त्याचप्रमाणें राममोहनानें करावयाचें होतें, ऐहिक ऐषआरामाला व संपत्तीला भुलून जावयाचें नव्हतें, व कोणाचीहि–मग तो सार्व-भौम राजा कां असेना–पर्वा बाळगावयाची नव्हती.पण या ठिकाणीं ही गोष्ट लक्ष्यांत ठेविली पाहिजे, कीं,वरील जे धर्मसंस्थापक त्यांच्या व राममोहनाच्या कामगिरीमध्यें महदंतर आहे. वरील साधूंचा हेतु लोकांची नुसती धार्मिक स्थितीच सुधारण्याचा होता. परंतु राम-

## उपसंहार.

**मोहनाला 'तें काम तर अवश्यमेव करावयाचें होतें, व इतर कामांपेक्षां या कामालाच त्यानें प्राधान्यहि दिलें होतें; पण या गोष्टी बरोबरच लोकांची प्रापंचिक स्थितीहि त्याला सुधारावयाची होती, या गोष्टीकडे कानाडोळा करून चालावयाचें नाहीं. लोकांच्या ऐहिक स्थितींत सुधारणा व्हावी, ह्मणून त्याला मोठमोठ्या श्रीमंत लोकांची व राजांची मदत घेणें भाग पडलें.**

**कित्येजण असें ह्मणतात, कीं, राममोहनानें मूर्तिपूजेचा निषेध केल्यामुळें पुष्कळ हिंदु लोकांच्या धर्माला धक्का बसला. याविषयीं सर नारायण चंदावरकर ह्मणतातः—**

" राममोहन रायानें केलें तसें करणें ह्मणजे जर पाप ठरत असेल तर आह्मीहि त्याच्याबरोबर दोषाला पात्र होऊं; परंतु मजविषयीं ह्मणाल, तर माझी मनोदेवता मला असें सांगत नाहीं, कीं, मूर्तिपूजेच्या विरुद्ध बोलणें ह्मणजे हिंदूधर्मावर हल्ला करणें होय. पुरातन काळापासून मूर्तिपूजा ह्मणजे ईश्वराच्या पूजेचें आवश्यक लक्षण मानिलें जात आहे काय ? ज्यांनां धर्माच्या इतिहासाची थोडीतरी माहिती आहे, ते नाहींच असें ह्मणतील. आमच्या भागवद्धर्मी ऋषींनां मूर्तिपूजा ही खऱ्या पूजेला आडकाठी आहे असें नेहमीं वाटत असे. त्यांनीं मूर्तिपूजेचा निषेध करून असें स्पष्ट सांगितलें आहे, कीं, **आत्म्याचें परमात्म्याशीं सख्य करण्याच्या वाटेमध्यें मूर्तिपूजा बाधक होते.** आपणांला या गोष्टीकडे कानाडोळा करून चालावयाचें नाहीं. कित्येकजण असें ह्मणतील, कीं, ईश्वराविषयीं विचार करीत असतांना जिच्यावर आमची दृष्टि बसेल अशी एकादी मूर्ति आमच्यापुढें पाहिजे, ह्मणून मूर्तिपूजेची आवश्यकता आहे; परंतु वस्तुस्थिति अशी आहे, कीं, ईश्वराविषयीं उदात्त कल्पना एका बाजूला राहून मूर्तिपूजकाची प्रवृत्ति नेहमीं ईश्वराला मनुष्यामधील व्यंगें व अपूर्तता अर्पिण्याकडे सदा असते.........

......ईश्वराच्या निराकार स्वरूपाची कल्पना आपल्यामधून नाहींशी होण्याइतके आपण हिंदुलोक निकृष्ट स्थितीला पोहोंचलों आहों काय? आपले थोर वंशज ईश्वराचा विचार करीत असतांना मूर्तीसारख्या क्षुद्र गोष्टीची मदत घेत नव्हते. तथापि ईश्वराविषयींच्या प्रेमानें त्यांचीं अंतःकरणें सदा भरलेलीं असत. मूर्तिपूजा ही ईश्वराच्या पूजेचा अगदीं क्षुद्र प्रकार आहे व तो पुष्कळ दिवसांपासून आपणांला जडलेला आहे."

मूर्तीपूजेविषयीं डॉ. सर रामकृष्ण भांडारकर ह्मणतातः—

"खरा जो एक परमात्मा त्याची प्रतिमा करून तिची पूजाअर्चा करावी यामध्यें मोठे दोष आहेत. प्रथमतः मनुष्य किंवा पशू किंवा वृक्ष यांचा आकार त्या समर्थ, सर्वव्यापी परमात्म्यास अर्पिणें ह्मणजे त्यास अत्यंत लघुता आणणें, असें आहे. त्या मूर्तीची पूजा करणें ह्मणजे अनाद्यनन्त, सर्वव्यापी, मंगलस्वरूप, आनंदमय परमेश्वराची पूजा करणें, असें सर्वथा होत नाहीं. मूर्तीचें स्वरूप जसें संकुचित तसा वृत्तींचाहि प्रकार संकुचित होतो. आपल्या वृत्तीला उन्नतभाव जर द्यावयाचा आहे, तर अनंत, अवर्णनीय आणि अतर्क्य ज्याचा महिमा, सर्व विश्व व्यापून जो राहिला आहे, आह्मां सर्व मनुष्यांच्या अंतःकरणांत जो वास करितो, ज्याचें आनंदमय स्वरूप सूर्यचंद्रतारका-विशिष्ट आकाशमंडल आणि पृथ्वीवर समुद्र, भूमि, पर्वत, नद्या, असंख्य प्राणी मिळून प्रकाशित करितात, जो आह्मां सर्वांचा परम सखा, जो सर्वांच्या अंतःकरणांमध्यें राहून बऱ्यावाईटाचें ज्ञान करून देतो, त्याच्या या स्वरूपाची पुनःपुनः अंतःकरणांत भावना केल्याच्या योगेंच तो देतां येईल; नुसती मनुष्यासारखी किंवा दुसऱ्या कोणत्याहि प्राण्या-सारखी पाषाणाची किंवा धातूची मूर्ति इजकडे पाहिल्यानें वृत्तीला उन्नत भाव प्राप्त व्हावयाचा नाहीं..................प्रतिमाच डोळयांपुढें ठेवून भजनपूजन करणें यापासून पुष्कळ अनिष्ट परिणाम होतात. प्रतिमा

पुरुषाची किंवा स्त्रीची असली ह्मणजे खऱ्या देवाच्या महिम्याचें आणि उन्नतीचें विस्मरण होऊन मनुष्याच्या धर्मांचें त्या देवाचे उपासक त्यावर आरोपण करितात. मग पुरुष असला तर त्यास बायको कल्पितात व स्त्री असल्यास तिला नवरा कल्पितात, आणि मग त्याजला आह्मां मनुष्यांसारखी शय्या सज्ज करितात; आणि उपासक तमाखु खाणारे असल्यास पानसुपारी व तमाखूच्या पिकदाणीचीहि देवाच्या गृहीं तयारी करून ठेवितात! याप्रमाणें देवाची केवळ विटंबना होते!"

शिळेची किंवा धातूची प्रतिमा करून आणि तिजला देव असें कल्पून तिचें अर्चन, वंदन करणें हा कांहीं 'ईश्वरोपासनेचा खरा मार्ग नव्हे.' पण हें तत्त्व सर्वथा नवीन असें कोणीं समजूं नये. कबीराच्या पंथांत मूर्तीची पूजा नाहीं. त्यांच्या मंदिरांत मूर्ति ठेवीत नाहींत.

**कबिरन भक्ति बिगाडिया कंकर पत्थर धोय।**
**अंदरमें बिख राखि कै अमृत डारै खोय॥**

कबीर हा शब्द येथें बहुवचनांत आहे. याचा अर्थ सामान्य मनुष्य अथवा देवाचे उपासक असा घेतला पाहिजे. उपासकांनीं खडे आणि दगड हे धुऊन भक्तीचा बिघाड करून टाकिला. आंत विष घालून अमृत बाहेर टाकून दिलें आहे. तसेंच कबीराचें एक प्रसिद्ध पद आहे, त्यांत 'दगडावर शेंदूर लावून त्यास मोठा देव ह्मणतात, त्यास नारळ देऊन तो फोडतात, आपण त्यांतलें खोबरें खाऊन देवास नरोटी देतात,' अशा प्रकारची मूर्तिपूजेची निंदा आहे. कबीर पंथाशीं जुळणारे असे दुसरें कांहीं पंथ आहेत, त्यांतहि मूर्तिपूजेचा अव्हेर आहे. आपल्या इकडेहि '**पाषाणाचा देव बोलेचि ना कधीं, हरि भवव्याधि केविं घडे॥**' इत्यादि खेचरानें नामदेवास मूर्तिपूजेचा निषेधक असा उपदेश केला, तो सर्वांस अवगत आहे. आणि भगवत्-

गीतेंत ह्या सर्व भूतांच्या ठायीं वास करणारा आणि त्याच्या द्वारें भिन्न भिन्न व्यापार चालविणारा जो परमात्मा त्यालाच शरण जा, तो शांति आणि शाश्वत पद देईल असा उपदेश केला आहे, त्यावरूनहि सर्व भूतस्थ देवाचीच उपासना उपदिष्ट केली आहे, असेंच होतें. तेव्हां मूर्तिपूजेचा परित्याग जो ब्राह्मधर्मानें केला आहे, त्यास या देशांत चालू अशीं जीं मतें व आचार यांचा आधार नाहीं असें नाहीं.

**या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ।**
**यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥**

सर्व प्राणी जेव्हां अज्ञानरूपी रात्र अनुभवितात, तेव्हां इंद्रियनिग्रही मनुष्य ज्ञानरूप जागृति अनुभवितो; आणि सर्व प्राण्यांनां जो जागृतीचा अनुभव ह्मणून वाटतो, ती अज्ञानरूप रात्र आहे, असें तो विवेकी जाणतो. या भगवद्गीतेंतील सत्याची कसोटी राममोहनाच्या चरित्रामध्यें पूर्णपणें दृष्टोत्पत्तीस येते. ज्या वेळीं इतर लोक स्वस्थ बसले होते, त्यावेळीं या सत्पुरुषानें परिस्थितीचा विचार करून, पुढचें-मागचें धोरण संभाळून, लोकांकडून त्याचा छळ झाला तरी त्याची पर्वा न करितां त्याला सत्य ह्मणून जें वाटलें त्याचें ग्रहण करून लोककल्याणाविषयीं अनंत यत्न केले. लोकांनां त्याचें करणें योग्य वाटलें नाहीं, तरी आपल्या कार्यापासून तो च्युत न होतां त्यानें तें नेटानें सतत चालविलें. "तो मोठा योगी तसाच भोगीहि होता. कलकत्त्याला त्याचीं दोन घरें होतीं. एकांत योग्याची संपत्ति तर दुसऱ्यांत अगदीं नवीन तऱ्हेच्या इंग्रजी सामानसुमानानें अपूर्व शोभा आणलेली. शोभा व सौंदर्य यांचा तो भोक्ता होता. कवित्वहि त्यानें बरेंच केलें आहे. तो ज्ञानी, कर्मी, रसिक होता. राममोहन ह्मणजे जणूं तत्कालिन एक सहस्रदलच फुललें, कीं ज्याची प्रत्येक पाकळी उमलून गेली होती." त्यानें साक्षात् धर्मानुभव

घेऊन आह्मांसहि धर्म शिकविला. सर्व सत्याचा उगम परमेश्वरापासून होतो, या गोष्टीवर त्याचा पूर्ण विश्वास होता; ह्मणून सत्याची सेवा करणें ह्मणजे देवाची सेवा करणें होय, हें त्याला पूर्णपणें अवगत होतें. त्यानें सत्यासाठीं अहोरात्र परिश्रम केले, अनेक प्रकारें झीज सोसली, मनस्वी छळ सहन केला. विश्वामध्यें जें अनेक प्रकारचें कार्य चाललें आहे, त्याचें विवेकपूर्वक निरीक्षण केलें.

त्याचा जो अनन्वित छल झाला, व त्याला जे हाल काढावे लागले, त्यावरून आपल्या मताप्रमाणें वागण्याचें त्याच्या अंगीं धैर्य नव्हतें, हें ह्मणणें वस्तुस्थितीला धरून नाहीं. त्याला जें योग्य वाटे तें करण्याला त्यानें कधींहि कसूर केली नाहीं. त्यानें आपल्या समाजाला यूरोपिअन पेहराव चढविला नाहीं याचें कारण त्याला त्याची आवश्यकता भासली नाहीं. त्याच्या हाडांमासांमध्यें हिंदुत्वाचें रक्त भिनलेलें होतें,ह्मणून हिंदुधर्माविषयीं त्याचे ठिकाणीं मूर्तिमंत अभिमान असणें साहजिकच आहे. ह्मणून बायबल किंवा कुराण यांमधील वचनांपेक्षां वेद व उपनिषदें यांमधील वचनें लोकांना अधिक ग्राह्य होतील, ह्मणून त्यानें तीं ब्राह्मसभेमध्यें सुरू केलीं.खरोखर पहातां हिंदुधर्मशास्त्रें ह्मणजे हिरे, माणकें यांच्या खाणी होत. परंतु या खाणी खोदून त्यांतील अशुद्ध धातू एकीकडे करून शुद्ध धातूंचें शोधन करावयाला पाहिजे. या खाणींवर दुसऱ्या धर्मांच्या अनेक गृहस्थांनीं वेळोवेळीं झडप घालून त्यांतील शुद्ध तत्त्वें आपल्या धर्मांत घेतलीं आहेत. पण आह्मां हतभागी हिंदुलोकांना कशी भुरळ पडली आहे पहा! या आमच्या सुवर्णाच्या खाणींकडे देखील आह्मी पहात नाहीं, मग त्या खोदण्याचें तर एका बाजूसच राहिलें. आमच्या या बहुमोल खाणींतलें सोनें इतर देशांमधून तावूनसुलाखून आमच्या देशांत आल्यानेंच आह्मी तृप्त होऊन बसतों! परंतु स्वतः कोणत्याहि

प्रकारची जबाबदारी अंगावर घेत नाहीं. आळसामुळें व उत्साहाच्या अभावीं हिंदुस्तानचें अतोनात नुकसान होत आहे. धार्मिक बाबतींतच आमची अशी दुर्दशा उडाली आहे असें नव्हे, तर इतर सर्व बाजूंनींहि आमचा ऱ्हास होत आहे. आमचा कापूस इंग्लंडला पाठवून त्याचे आयते कपडे तिकडून आणणें आह्मांला बरें वाटतें; पण या देशांतच कारखाने काढून आह्मांस ते चालवितां येत नाहींत. अनेक देशी पेढ्या आह्मी स्थापन करतों, पण आमच्या गैरविश्वासामुळें त्या तेव्हांच डबघाईस येतात! राममोहनानें या सोन्याच्या खाणी आपणांकरितां उघडल्या आहेत. त्यानें त्या सोन्यामधील भेसळ काढून टाकून शंभर नंबरी सोनें आपणांपुढें ठेविलें आहे. सोनें कॅलिफोर्नियामधून येवो किंवा पन्नामधून येवो तें प्रत्येकाला बहुमोल हें आहेच; पण तें स्वतःच्या देशांत विपुल असतांना कोण शहाणा दुसऱ्या देशाकडे त्याकरितां धांव घेईल? आपल्या या भरतभूमीमध्येंच उदात्त तत्त्वें मिळत असतांना आपणांला दुसऱ्यांच्या तोंडाकडे पाहण्याची काय गरज? आपल्याच शास्त्रांतून घेतलेलीं वचनें आपल्या लोकांनां अधिक लवकर ग्राह्य होणार नाहींत काय? बरें, यदाकदाचित् दुसऱ्या धर्मांतून कांहीं तत्त्वें घेतलीं तरी त्यांनां इकडे साजेल असें रूप दिलें असतां तें बरें नाहीं काय? खुर्चीवर बसून शास्त्रांचें विवरण केल्यानें हिंदुलोकांनां जर बरें वाटत नाहीं, तर वेदीवर तें करणें बरें नाहीं काय? इंग्रजी गाणीं जर आमच्या कानांला गोड वाटत नाहींत तर आमच्या साधूंचीं प्रेमळ व मधुर पद्यें देशी भाषेंत ह्मणणें योग्य नाहीं काय? जसा देश तसा वेष! ज्या देशाची जी परिस्थिति तीप्रमाणें त्यानें वागावें, यांत नवल तें काय? राममोहनानें उपनिषदें व वेद आपल्या ब्राह्मसभेमध्यें सामील केले, हें योग्यच होय.

# उपसंहार.

राममोहनानें ज्या धर्माची स्थापना केली, तो सर्व जातींच्या व सर्व धर्मांच्या लोकांसाठीं होता व त्याचीं तत्त्वें सर्व काळच्या व सर्व देशांच्या विचारी लोकांनां मान्य होण्यासारखीं आहेत. राममोहनानें सर थॉमस मूर याला समाजाविषयीं हकीकत लिहितांना ह्मटलें आहे, कीं, 'ही ब्राह्मसभा सर्व देशच्या व सर्व धर्मांच्या लोकां-करितां आहे; मग ते हिंदु असोत, मुसलमान असोत, प्रॉटेस्टंट असोत किंवा रोमन कॅथलिक असोत. शिवाय राममोहनानें गायत्री-मंत्राचें भाषांतर इंग्रजींत केलें, त्यावरून वरील आरोप अगदीं निरा-धार आहे हें सिद्ध होतें.

सत्याची कांस धरण्याकारितां राममोहनानें आपलीं सर्व सुखें आपली संपत्ति, आपलें कुटुंब व आपले मित्र या सर्वांवर पाणी सोडलें. त्याला तीन वेळ त्याच्या आईबापांनीं घरांतून हांकून लाविलें; त्यामुळें स्वतःकारितां व स्वतःच्या कुटुंबाकारितां त्याला निराळी सोय करावी लागली. त्याला पुष्कळ शत्रु उत्पन्न झाले व त्यांनीं त्याचा मनस्वी छळ केला; परंतु त्यानें आपलें धैर्य ढळूं दिलें नाहीं. कलकत्त्यामध्यें असतांना तर त्याच्या जीवास मुळींच सुरक्षितता नव्हती. मधमाशांनीं वेष्टित अशा मधमाशीच्या पोळ्या-प्रमाणें त्याची स्थिति होती. मधमाशीप्रमाणें तीक्ष्ण नांगी मारणाऱ्या त्याच्या शत्रूंचें निवारण करण्यास त्याला कोणी साहाय्यकर्ता नव्हता. सर्व धर्मांच्या लोकांनीं त्याचा छळ मांडिला. तो हिंदूंचा त्याचप्रमाणें ख्रिस्ती लोकांचाहि कट्टा वैरी बनला होता. मूर्तिपूजेचें समर्थन करणाऱ्या वर्तमानपत्रांनीं त्याला शिव्यांची लाखोली वाहिली. शक्य तितक्या सभ्यतेनें व शांतपणानें त्यानें त्यांच्या प्रश्नानां उत्तरें दिलीं, व मोठ्या सोशीकपणानें त्या सर्व शिव्या सहन केल्या. त्याच्या जीवावर देखील गदा आली होती, पण तो मुळींच घाबरला नाहीं.

मोठ्या धैर्यानें त्यानें सत्पक्षाचें अवलंबन केलें. आपल्या आयुष्यांतील उच्चत्तम ध्येय साधण्याकारितां त्याला प्रिय अशा ज्या गोष्टी त्या सर्वांवर त्यानें पाणी सोडलें. कोणीहि मदतीस नसतां राजरोसपणें आपल्या शत्रूंशीं दोन हात करून त्यानें यश संपादन केलें.

"राममोहनराय यानें स्वदेशांत लोकांची धर्मसुधारणा करावी ह्मणून फार यत्न केले. ईश्वराच्या गुणांचें मनन करून आपल्या उत्पन्नकर्त्याची आराधना आत्मभावानें करण्यास त्यांनां प्रवृत्त करावें, असा त्याचा मानस होता. हिंदूंतून मूर्तिपूजा नाहींशी करून टाकावी आणि सर्वशक्तिमान् जगन्नियंता परमेश्वर, सुख आणि परमार्थ यांविषयीं सुप्रकाशक विचार त्यांच्यामध्यें प्रसृत करावे, हेंच तो आपल्या जिण्याचें सार्थक मानीत असे; आणि त्याच्या सिद्ध्यर्थ त्यानें आपली बुद्धि, काळ आणि धन या अवघ्यांचा खर्च केला. त्याला जितके अडथळे आले तितक्या सर्वांचें त्यानें मोठ्या धैर्यानें आणि गांभीर्यानें निवारण केलें. या कार्यार्थ त्यानें द्रव्याचा जो व्यय केला, तो मोठ्या औदार्याचा होता. त्याची संपत्ति ह्मणावी तर ती ह्मणजे फार मोठी होती असें नाहीं, तरीहि तिचा बहुत मोठा अंश त्यानें त्या कार्यास लाविला. राममोहनासारखी उत्कंठा बाळगून श्रम घेणारा असा दुसरा सुधारणारा विरळाच झाला असेल. गृहस्थपणा, विद्वत्ता, लोकप्रीति, लीनता, उत्कंठा आणि स्वतंत्रता हे सर्व गुण याच्या ठायीं जसे एकत्र झाले होते, तसे दुसऱ्या थोड्याच सुधारणारांमध्यें झाले असतील. असा हा योग्य आणि प्रतापी पुरुष होऊन गेला. यानें हिंदूंच्या मनास अनुचित धर्मबंधनांतून मुक्त करून त्यांच्या ठायीं न्याय, सत्य, परोपकार, नीति, ईश्वरभक्ति इत्यादिकांविषयीं अधिक शुद्ध आणि उच्च विचार बिंबवून देण्यास जे यत्न व उपाय केले, त्या सर्वांची गणना करणें कठिण आहे. याच हेतूनें नीतीवर व धर्मावर लहानलहान पुस्तकें पदरच्या खर्चानें छापून त्यानें तीं स्वदेशीय लोकांनां फुकट वांटलीं."

## उपसंहार.

या महान् सत्याकडे त्यांचे डोळे उघडिले, आणि अगदीं प्राकृत भाषांच्या द्वारें खरें धर्मसार समजण्याला मार्ग मोकळा करून दिला. परंतु अद्याप झालें हें कांहींच नाहीं. सुप्रकाशाचा उदय मात्र झाला आहे. ज्यांला सुविद्या प्राप्त झाली आहे, त्यांची संख्या फार थोडी; आणि त्यांतूनहि पुष्कळांच्या मनांत प्रकाश आणि अंधकार, सत्य आणि असत्य यांचा एकत्र गोंधळ झालेला दिसतो. सामान्य जन अद्यापि अज्ञानसागराच्या लहरींतच डुबकळ्या खात आहेत. तथापि असो, सुप्रकाशाच्या किरणांनीं क्षितिज तर प्रकाशित करून टाकिलेंच; त्यापेक्षां तीं आज नाहींतर उद्यां तरी चहूंकडेस पसरतील आणि अज्ञान देवभोळेपणाचा जो घट्ट थिजलेला पर्वत आहे तो लवकरच विरघळून टाकितील.

"आतां शेवटीं ईश्वराजवळ आमची एवढीच प्रार्थना आहे, कीं, राजा राममोहन रायासारखे सुप्रकाशक आणि स्वदेश कल्याणेच्छु पुत्र आपल्या या भारतवर्षिणी जननीच्या उदरीं पुष्कळ जन्मोत, आणि आपले कोट्यवधि देशबंधु अज्ञानतिमिर आणि देवभोळेपणा यांच्या अनुचित दास्यापासून त्वरित मुक्त होऊन खरा, सर्वशक्तिमान् आणि अद्वैत असा जो परमात्मा त्याला ओळखून भजूं लागोत!"